

THE EARL OF MAYO.

अर्ल ऑफ मेयो.

जन्म १८२२. मृत्यु १८७२.

AWARDED BY THE DECCAN VERNACULAR TRANSLATION SOCIETY.

# THE EARL OF MAYO.

Translated from *Mayo*, by Sir W. W. Hunter, K. C. S. I.; C. I. E., in the Rulers of India Series, with the permission of the Clarendon Press, Oxford

By

**VISHNU VASUDEV NATEKAR,**
Assistant Deputy Educational Inspector, Nasik.

Printed at the " Indira Press ",
POONA.



1913.

*Price Rs. 1-8.*

डेक्कन व्हर्न्याक्युलर ट्रान्सलेशन सोसायटीनें बक्षीस दिलेलें

# अर्ल ऑफ् मेयो

## यांचें चरित्र.

हिंदुस्तानांतील राज्यकर्ते ह्या ग्रंथमालेंतील
सर विल्यम हंटर, के. सी. एस्. आय्;
सी. आय् ई., ह्यांच्या "मेयो" नामक मूळ
ग्रंथावरून, ऑक्सफर्ड येथील क्लारेंडन
प्रेसच्या चालकांच्या परवानगीनें
भाषांतररूपानें


**विष्णु वासुदेव नाटेकर,**
असिस्टंट डेप्युटि एजुकेशनल इन्स्पेक्टर, नाशिक,


यांनीं केलें

तें


पुणें येथें इंदिरा छापखान्यांत छापिलें.





सन १९१३.

**किंमत १॥ रुपया.**

हें पुस्तक पुणें येथें त्र्यंबक हरी आवटे यांनीं आपल्या
**इंदिरा** छापखान्यांत छापलें,
आणि विष्णु वासुदेव नाटेकर यांनीं नाशिक एथें
प्रासिद्ध केलें.

DEDICATED

WITH

PERMISSION

To

The Hon'ble

E. S. MONTAGU, M. P.,

THE PESENT UNDER SECRETARY

OF STATE FOR INDIA.

हिंदुस्तानचे हल्लींचे

अंडर सेक्रेटरी ऑफ् स्टेट

नामदार ई. एस्. मॉंटेग, एम्. पी.,

ह्यांस,

त्यांच्या परवानगीनें

अर्पण केला आहे.

---

Dr. Sir Ramkrishna Gopal Bhandarkar's

# OPINION.

Mr. Vishnu Vasudeo Natekar read to me portions of his translation of "*Mayo*", a volume of the *Rulers of India* series, about a year ago. My general impression is that it is a good translation, worthy of being published. I made certain suggestions to him which he has carried out. He has translated another volume of the series, "Elphinstone", and the Deccan Vernacular Society awarded him a prize of Rs 200. A prize of this value is awarded only to a work of merit, and the volume on *Mayo* is likely to be as good.

Poona,
7th September 1904 } Sd. *R. G. Bhandarker*

## डॉक्टर सर रामकृष्ण गोपाळ भांडारकर
## यांचा अभिप्राय.

“ हिंदुस्तानचे राज्यकर्ते ” ह्या पुस्तकमालेपैकीं **‘मेयो’** ह्या ग्रंथाच्या आपल्या भाषांतराचे कांहीं भाग रा. **विष्णु वासुदेव नाटेकर** ह्यांनीं सुमारें वर्षापूर्वीं मला वाचून दाखविले. माझ्या मनावर सामान्यतः असा परिणाम झाला आहे कीं, हें भाषांतर चांगलें असून छापण्यास योग्य आहे. मीं त्यांना कित्येक सूचना केल्या असून त्या त्यांनीं अमलांत आणिल्या आहेत. ह्याच ग्रंथमालेपैकीं **‘एल्फिन्स्टन’** ह्या आणखी एका ग्रंथाचें भाषांतर त्यांनीं केलेलें असून डेक्कन **व्हर्न्याक्युलर ट्रान्सलेशन सोसायटीनें** त्या पुस्तकास २०० रुपयांचें बक्षीस दिलें आहे. एवढें मोठें बक्षीस फक्त विशेष चांगल्या ग्रंथांसच दिलें जातें; आणि **‘मेयो’** हा ग्रंथही ‘एल्फिन्स्टन’ सारखाच चांगला होण्याचा संभव आहे.

**पुणें.**
ता. ७ सप्टेंबर १९०४

**रा. गो. भांडारकर.**

# प्रस्तावना.

इंग्रजी ग्रंथाधारें मराठी भाषेंत आजपर्यंत मीं दोन-तीन पुस्तकें लिहिलीं. त्यांना लोकाश्रय चांगला मिळून तीं डेक्कन व्हर्न्याक्युलर ट्रान्सलेशन सोसायटीकडून-ही व शाळाखात्याकडूनही पसंत ठरल्यामुळें त्याच धोरणावर आणखी कांहीं प्रयत्न करण्यास हुरूप आला.

अशा उद्देशानें विषयाची योजना करूं लागलों, तेव्हां "हिंदुस्तानांतील राज्यकर्ते" ( Rulers of India) ही हंटर साहेबांची ग्रंथमाला पुन्हा नजरेपुढें आली; व तींतील *आणखी एकादें पुस्तक मराठींत उतरावें, असें वाटूं लागलें. मोठमोठ्या पुस्तकालयांतून हंटर साहेबांच्या मालिकेंतील सुमारें २५ इंग्रजी ग्रंथ एकजात सुंदर बायंडिंगाचे, सुरेख कागदावर उत्कृष्ट टायपांनीं छापलेले ओळीनें लाविलेले आढळतात. ही फक्त हंटर साहेबांच्या एका मालेची गोष्ट; अशा तऱ्हेच्या अनेक विद्वानांच्या अनेक मालिका इंग्लिश भाषेंत असल्यामुळें त्या भाषेंत प्रचंड ग्रंथसमूह व्हावा हें साहजिक आहे. मोठमोठ्या पुस्तकालयांतून इंग्लिश पुस्तकांचीं कपाटें उघडिलीं असतां हें पुस्तक घ्यावें कीं तें घ्यावें, अशी वाचकांची जी त्रेधा उडते ती ह्याच कारणानें. असा सुप्रसंग

---

* ह्याच मालिकेंतील एका ग्रंथावरून " एल्फिन्स्टन यांचें चरित्र " हें एक पुस्तक मजकडून पूर्वींच प्रसिद्ध झालें आहे.

महाराष्ट्र वाङ्मयासंबंधानें येईल तो सुदिन ! तथापि अलीकडील ग्रंथवृद्धीचें प्रमाण लक्षांत आणिलें असतां तो दिवस उशिरानें कां येईना, पण येईल; असा सुमार दिसतो.

असो. ह्याप्रमाणें हंटर साहेबांच्याच मालिकेंतील पुस्तक भाषांतरास घेण्याचा विचार झाल्यावर कोणतें पुस्तक निवडावें, हा प्रश्न उरला. हीं २०।२५ पुस्तकें त्या त्या पुरुषांचीं चरित्रें खरींच; परंतु हिंदुस्तानचा किंवा त्याच्या विवक्षित भागाचा त्या त्या काळचा तो इतिहासही होय. एतद्देशीय* पुरुषांचीं चरित्रें ह्या मालिकेंत चारपांचच आहेत; व जीं आहेत त्यांजबद्दल मराठी वाचकांस थोडी फार माहिती असते. ह्या मालिकेंत बहुतेक भरणा इंग्लिश पुरुषांचा आहे. तेव्हां त्यांपैकीं ज्याचा कल हिंदुस्तानच्या हिताकडे विशेष दिसत होता, अशा पुरुषाचें चरित्र हातीं घ्यावें, असा मनाचा साहजिक कल झाला. अशा दृष्टीनें मालिकेंतील ग्रंथ चाळून पाहातां अनेक कारणांनीं अर्ल् आफ् मेयो हाच ग्रंथ हातीं घ्यावासें वाटलें. स्थानिक स्वराज्याचा पाया यांच्याच कारकीर्दींत घातला गेला; जमाखर्चाच्या बाबतींत सुधारणा ह्यांच्याच कारकीर्दींत झाल्या; लष्करी खर्चांतही काटकसर झाली; आणि सार्वजनिक शिक्षणाचें पाऊल पुढें पडलें.

हाच ग्रंथ हातीं घेण्याचें दुसरें एक कारण असें कीं, खुद्द हंटर साहेबांच्या एकाद्या कृतीचें भाषांतर आपल्या

---

* अशोक, अकबर, महादजी शिंदे, आणि रणजितसिंग.

हातून व्हावें; अशी फार दिवस इच्छा होती. असे ग्रंथ ह्या मालिकेंत दोनच—डलहौसी व मेयो हे आहेत. त्यांतल्या त्यांत मनाची प्रवृत्ति दुसऱ्याकडे झाल्यामुळें तोच हातीं घेतला.

ह्या पुस्तकांत उपोद्घातासुद्धां ९ प्रकरणें असून प्रत्येक प्रकरणांतील विषयाचें स्वरूप ध्यानीं यावें म्हणून प्रकरणांतील ठळक ठळक गोष्टी आरंभीं दिल्या आहेत. एकंदर प्रकरणांपैकीं दुसरें प्रकरण—चरित्रनायक—हें बरेंच विस्तृत आहे. तथापि त्यावरून इंग्लंडांतील कुटुंबस्थिति, मुलांच्या शिक्षणाचा प्रकार, इत्यादि बऱ्याच नवीन गोष्टी इकडील वाचकांस कळून येणार आहेत. इतर प्रकरणांतील माहिती हिंदुस्तानसंबंधी असल्यामुळें तिचा उमज वाचकांस सहज पडण्यासारखा आहे.

पुस्तकाच्या हस्तलेखाचा कांहीं भाग विद्वद्वर्य **डॉ. सर रामकृष्ण गोपाळ भांडारकर** यांनीं आपला अमूल्य वेळ खर्चून ऐकिला, व अनेक उपयुक्त सूचना करून अभिप्रायही दिला; ह्याबद्दल मी त्यांचा अति आभारी आहें. तसेंच **डे. व्ह. ट्रा. सोसायटीनें** पुस्तक परीक्षण करून द्रव्यद्वारें चांगलें उत्तेजन दिल्यामुळें पुस्तकाच्या प्रसिद्धीचें श्रेय बहुतांशीं सोसायटीलाच आहे. शेवटीं **नामदार ई. एस्. मॉंटेग, एम्. पी.,** आपले सांप्रतचे **अंडर सेक्रेटरी ऑफ् स्टेट**—यांनीं पुस्तक आपणांस अर्पण करण्याविषयीं मोठ्या आनंदानें परवानगी दिल्यामुळें त्यांचाही मी फार आभारी आहें. सार्वजनिक शिक्षणाच्या बाबतींत हिंदुस्तानचें पाऊल अलीकडे

बरेंच पुढें पडत चाललें असून हिंदुस्तानसरकारच्या शिक्षणविषयक योजनांना विलायतसरकारकडून दुजोरा मिळत आहे. ह्या शिक्षणप्रसाराच्या कामीं **नामदार मॉंटेग** साहेब ह्यांचा बराच संबंध असल्यामुळें, माझें स्वतःचें आयुष्य शिक्षणखात्यांत गेलें असल्यामुळें, आणि पुस्तकप्रकाशनाच्या ह्या सुमारास नामदारांचा हिंदुस्तानांतील दौरा सुरू असल्यामुळें, पुस्तक त्यांस अर्पण करण्याची स्फूर्ति झाली; हें येथें दर्शविणें अप्रासंगिक होणार नाहीं.

जवळ जवळ एक तप अज्ञातवासांत पडलेला हस्तलेख पुस्तकरूपानें प्रसिद्ध करण्याचा प्रयत्न ज्याच्या कृपेनें सिद्धीस गेला त्या जगन्नियंत्याचें शेवटीं सविनय स्मरण करून हा लेख पुरा करितों.

नाशिक, १।८।१३. वि. वा. नाटेकर.

# विषयानुक्रम.

# प्रकरण पहिलें.

## उपोद्घात.

[ डलहौसी व मेयो यांच्या मध्यंतरींच्या काळांतील स्थिति.—बंडाच्या काळांतील एतद्देशीय राजांचें आचरण.—बंडामुळें संस्थानिकांच्या संबंधानें ब्रिटिश सरकारच्या वर्तनांत झालेला फेरफार.—दत्तकाची संस्थानिकांना परवानगी मिळते.—ह्या स्थित्यन्तरामुळें सार्वभौम सरकार व संस्थानिक ह्यांजवर पडलेली जबाबदारी.—रयतेची स्थिति सुधारण्यासंबंधानें लॉर्ड मेयो यांचे विचार.—ते आले तेव्हांची परराष्ट्रसंबंधी स्थिति.—तिच्यासंबंधाचें त्यांचें राजधोरण.—त्यांची आभ्यंतरव्यवस्था.—आगगाडीच्या सडकांसंबंधानें त्यांच्या कारकीर्दींतील उपाय.—ह्या संबंधानें पूर्वीच्या स्थितीशीं तुलना.—स्थानिक सरकारांना जमाखर्चासंबंधानें त्यांनीं दिलेले विशेष अधिकार.—तेणेंकरून खर्चांत काटकसर करण्यास स्थानिक सरकारांना मिळालेलें उत्तेजन.—एणेंकरून ह्याहूनही महत्त्वाचे घडून येणारे परिणाम.—स्थानिक स्वराज्यासंबंधीं त्यांचे विचार.—ह्या चरित्रास ह्यांच्याच मोठ्या चरित्राचा घेतलेला आधार. ]

# प्रकरण दुसरें.

## चरित्रनायक.

[ ह्यांच्या वंशाची पूर्वपीठिका.—ऐर्लंडांत यांच्या घराण्याची स्थापना.—ऐर्लंडचा त्यांस अभिमान.—१८ व्या शतकांतील ह्या घराण्याची स्थिति.—त्यांचें बालपणचें ठिकाणः हेज.—तेथील कुटुंबस्थिति.—त्यांच्या शिक्षणाची वडिलांनीं लाविलेली व्यवस्था.—ख्रिस्ती धर्माधिकाऱ्यांचें हेज येथें दळणवळण.—हेज येथील राहाणी.—यांच्या वडिलांसंबंधानें एका मुलाचा अभिप्राय.—त्याचाच आईसंबंधानें अभिप्राय.—मुलांच्या वर्तनावर मातापित्यांच्या वर्तनाचा परिणाम.—मेयो यांस इतिहासाची गोडी लागते.—त्यांच्या बालपणासंबंधीं आणखी एक उतारा.—ह्या कुटुंबाचें परदेशीं प्रयाण.—इतालींतील हकीगत.—

त्यांच्या वरिष्ठ प्रतीच्या शिक्षणाची वगैरे हकीगत.–पामर्स्टन येथें त्यांचा मुक्काम.–पुढील एकदोन वर्षांची हकीगत.–त्यांचा रशियांत प्रवास.–रशियन लोकांची त्या काळची स्थिति.–तिचे परिणाम.–नियंत्रित व्यापाराची तेथील पद्धति.–इतर बाबींतील सरकारची ढवळाढवळ.–रशियन शेतकऱ्यांची बंगाल्यांतील शेतकऱ्यांशीं तुलना.–रशियन शेतकऱ्यांसंबंधानें त्यांचा एकंदरींत अभिप्राय.–रशियांतील स्थितीपासून त्यांनीं घेतलेलें शिक्षण.–तेथील देहान्त शिक्षेसंबंधीं उतारा.–रशियांतून परत आले तेव्हांची ऐर्लंडची स्थिति.–दुष्काळांतील कामगिरीचा मोबदला.–त्यांचे राजकीय विचार.–पार्लमेंटाच्या सभासदांची निवड.–निवडीचा निकाल.–त्यांना शेतकीसंबंधीं प्रत्यक्ष शिक्षण.–पार्लमेंटांतील त्यांचें पहिलें भाषण.–पार्लमेंटांतील कामासंबंधीं एकाचा अभिप्राय.–त्यांनीं आपल्या पक्षाची बजाविलेली कामगिरी.–त्यांची ऐर्लंडच्या चीफ सेक्रेटरींच्या जागीं योजना.–पार्लमेंटांत पुनः निवड.–त्या सभेपुढें त्यांनीं आणिलेले कायद्यांचे मसुदे.–क्रिमियाचें युद्ध.–ह्यांचे बंधु युद्धावर गेले असतां त्यांनीं आपल्या मातुःश्रीचें केलेलें समाधान.–त्या युद्धाचा किरकोळ बाबींवरही घडलेला परिणाम.–पार्लमेंटांतील कामाबद्दल आणखी एक अभिप्राय.–ह्याच बाबतींत आणखी अभिप्राय.–ह्याच बाबतींत प्रधानमंडळापैकीं एकाचा अभिप्राय.–अधिकारी ह्या दृष्टीनें त्यांच्या आंगीं असलेले गुण.–पार्लमेंटांत ऐर्लंडसंबंधीं प्रतिपक्षाचे पुढारी ह्या नात्यानें त्यांचें काम.–सदर कामाचें स्वरूप.–१८६७ त त्यांजवर पडलेला कामाचा बोजा.–फेनियन लोकांच्या धामधुमींत त्यांचें वर्तन.–मातापित्यांचा मृत्यु.–सरकार तर्फेचे पुढारी ह्या नात्यानें त्यांच्या एका भाषणाविषयीं अभिप्राय.–ह्या संबंधानें स्वतःचें मत.–ऐर्लंडसंबंधानें चांगलीशी कामगिरी बजावण्याविषयीं त्यांची निराशा.–ह्याचीं कारणें.–त्यांना हिंदुस्तानच्या ग. ज. ची जागा मिळण्याचा संभव.–ते जागा पतकरितात.–मि. डिझरायली यांचा त्यांजबद्दल अभिप्राय.–त्यांची पार्लमेंटांतील २१ वर्षांची कारकीर्द.–त्यांचा कॉन्सर्व्हेटिव्ह पक्षास उपयोग.–त्यांचा होत गेलेला उत्कर्ष.–स्वपक्षाशीं त्यांचा मतभेद.–त्यांचें मुलांबाळांकडे लक्ष.–तोच विषय.–त्यांना खेडेगांवांत राहण्याची व शारीरिक खेळांची आवड.–त्यांचें शिकारीकडे लक्ष.–त्यांच्या सरकारी कामकाजांचा पुनः विचार.–व्हाइसरायच्या कर्तव्यासंबंधानें त्यांनीं इंग्लं-

ांत चालविलेली तयारी.—त्यांच्या नेमणुकीवर आक्षेप.—त्यांच्या स्तुतीचा लेख.—त्यांच्या नेमणुकीसंबंधीं आक्षेपांवर त्यांचें म्हणणें.—दुसऱ्याचें मन न दुखविण्याचा त्यांचा स्वभाव.—मि. डिझरायलीं-चा त्यांना आधार.—हाताखालच्या कामगारांचा पक्ष धरण्याचा त्यांचा गुण.—ऐर्लंडास शेवटचा रामराम.—इकडे येतांना पारिस येथें मुक्काम.—तेथील दरबाराची पाहणी.—जलप्रवासांतील विश्रांति.—इजिप्तमधील हकीगत.—एडनसंबंधीं उल्लेख.—मुंबई बंदरांत आगमन.—तेथील मुक्कामांतील हकीगत.—मंद्रास येथें आगमन.—तेथून प्रयाण.—चार्ज देणें घेणें.—त्या वेळचा देखावा.—तेव्हांचा समारंभ.—त्यांच्या प्रथम भेटीचा इकडील अधिकाऱ्यांवर परिणाम. ]

---

## प्रकरण तिसरें.

### व्हाइसराय सरकारचा कारभार प्रत्यक्ष कसा चालतो त्याविषयीं.

[ कामास प्रारंभ.—वरिष्ठ सरकारची रचना.—ग. ज. यांची सत्ता व कौन्सिलांतील कामाचा प्रकार.—कौन्सिलच्या कामकाजाच्या पद्धतींत लॉर्ड क्यानिंग यांनीं केलेली सुधारणा.—कौन्सिलांतील काम कसें चालतें ?—त्यांच्या वेळचे मंत्री व सेक्रेटरी.—कौन्सिलांत नेहमीं-चीं कामें कशीं चालतात ?—खुद्द व्हाइसराय यांजवर पडणारें काम.—खाजगी तऱ्हेचें पडणारें काम.—प्रवर्तक शाखेंतील कामें.—विशेष वाद-ग्रस्त प्रश्नांचा विचार कसा चालतो ?—त्याचें एक उदाहरण.—अखेर निकाल कसा लागतो ?—कौन्सिलांत मतभेद असतो तेव्हांची स्थिति.—वरील कामांशिवाय त्यांस पडणारीं कामें.—विधायक कौन्सिलांतील कामें.—त्यांची साधारण दिनचर्या.—खाजगी तऱ्हेनें त्यांचें वर्तन.—त्यांच्या कामाच्या वेळा.—त्यांना भिन्न भिन्न प्रकारचीं कामें.—त्यांना हाताखालच्या कामगारांची मिळालेली मदत.—कामकाजास योग्य असे त्यांच्या आंगचे गुण.—खात्यांचे मुख्य अधिकारी व सेक्रेटरिएट खातें यांजकडे असलेलीं भिन्न भिन्न कामें.—ह्या दोन्ही प्रकारच्या कामगारांत मेळ ते कसा घालीत ?—त्यांच्यावरील कामाची जबाबदारी.]

---

## प्रकरण चौथें.

### मांडलिक राजांशीं लॉर्ड मेयो यांचें वर्तन.

[ बंडापूर्वीची व नंतरची स्थिति.—कंपनीच्या अमलांत संस्थानांसंबंधीं राजधोरण.—बंडानंतर त्यांत फेरफार.—नवीन फेरफारामुळें झालेला परिणाम.—रजपूत राजांच्या दरबारांत त्यांचें भाषण.—ह्या संबंधानें त्यांच्या एका सल्लागाराचें मत.—संस्थानांसंबंधानें त्यांचें एकंदरीनें मत.—त्यांचा संस्थानिकांशीं खाजगी संबंध.—त्यांच्या आचरणावरून संस्थानिकांस होणारा बोध.—संस्थानांशीं त्यांचा सरकारी संबंध कोणत्या प्रकारचा असे त्याविषयीं चार नियम.—काठेवाडांत सुधारणा करण्याचा प्रयत्न.—काठेवाडांतील अव्यवस्थेचें मूळ.—त्यांच्या कारकीर्दींत अव्यवस्थित राज्यकारभार चालल्याचीं उदाहरणें.—अलवार.—तेथील राजाच्या खर्चाचा मासला.—ह्या एकंदर अव्यवस्थेचा परिणाम.—व्हाइसराय यांचा ती अव्यवस्था मोडण्यासाठीं प्रयत्न.—त्यांच्या व्यवस्थेमुळें घडलेला परिणाम.—राजेसाहेबांच्या वर्तनांत फरक न पडणें.—दुसऱ्या एका संस्थानिकाच्या वर्तनाचा उल्लेख.—उत्तम राज्यकारभार चालत असलेलें संस्थान:—भोपाळ.—त्याची पूर्वपीठिका.—तेथील बेगम साहेबांची हकीगत.—सरहद्दीवरील रानटी जातींसंबंधानें त्यांच्या मतें हिंदुस्तानसरकारचें कर्तव्य.—वायव्य सरहद्दीच्या संरक्षणार्थ त्यांचे विचार.—त्यांनीं पूर्वींच्या स्थितींत केलेला फेरफार.—त्यांच्या सूचनेवर आक्षेप.—सरहद्दीसंबंधीं दंग्याधोप्यांचा समावेश लष्करी कृत्यांत न करितां पोलिस खात्यांत करणें इष्ट आहे.—ईशान्य सरहद्दीवरील स्वारी.—ह्या स्वारीसंबंधानें त्यांचें मत.—अल्पवयी संस्थानिकांसंबंधानें ब्रिटिश सरकारचें कर्तव्य.—त्यांच्या शिक्षणार्थ त्यांनीं योजिलेले उपाय:—राजकुमार कॉलेज.—मेयो कॉलेज. ]

---

## प्रकरण पाचवें.

### लॉर्ड मेयो यांचें परराष्ट्रसंबंधी धोरण.

[ त्यांच्या कारकीर्दीच्या आरंभीं परराष्ट्रसंबंधी स्थिति.—मध्य एशियासंबंधानें त्यांचें राजधोरण.—त्यांच्या पूर्वींची अफगाणिस्तान-

र्चा स्थिति.–ब्रिटिश राजधोरणासंबंधाचे अफगाण लोकांचे उद्गार.–शेरअली यांचें इंग्रजांसंबंधीं उद्गार.–रशियाचा अफगाणिस्तानावर डोळा.–त्या देशासंबंधीं राजधोरणाचा लॉर्ड लॉरेन्स यांचा शेवटचा लेख.— अंबाला एथील दरबारीं शेरअली यांची भेट.–हिंदुस्तानांत येण्यांत अमिरांचे पांच हेतु.–अंबाला दरबारचा परिणाम.–ह्या दरबारामुळें पाश्चात्य सुधारणांचा अमिरांवर घडलेला परिणाम.–सरहद्दीच्या सुरक्षिततेसंबंधानें मेयो यांचें मत.–रशियन मुत्सद्द्यांचे विचार खाजगी नात्यानें जाणण्याची आवश्यकता.–आपले विचार रशियांतील प्रमुख अधिकाऱ्यांस कळविण्यासाठीं बंगाल्यांतील एका सनदी कामगाराची योजना.–अफगाणिस्तानासंबंधानें ठरलेली सरहद्द.–बलुचिस्तानची स्थिति.–तेथील अव्यवस्था मोडण्यासाठीं प्रयत्न.–त्यांनीं लाविलेल्या व्यवस्थेचा परिणाम.–पूर्वतारीखची हकीगत.–मि. फार्सिथ यांची तिकडे रवानगी.–तेथील नव्या राजास मेयो यांनीं केलेल्या सूचना.–मि. फार्सिथ यांना तेथें आढळलेली स्थिति.–चांगचीनम दरींतून व्यापाराची सुरवात.–इतर सरहद्दीसंबंधीं संक्षिप्त उल्लेख. ]

---

## प्रकरण सहावें.

### लॉर्ड मेयो यांच्या जमाबंदीसंबंधीं सुधारणा.

[ जमाबंदीच्या पद्धतीसंबंधीं हकीगतीचीं दोन अंगें.—ह्यांच्या कारकीर्दीच्या आरंभींची स्थिति.–त्यांच्या पूर्वींच्या पांचपन्नास वर्षांतील जमाखर्चाची स्थिति.–जमाखर्चांतील तुटीशिवाय असमाधान उत्पन्न करणारें दुसरें कारण.–ह्यासंबंधानें त्यांजवर पडलेलीं तीन कामें.–त्यांच्या जमाखर्चासंबंधीं कारभाराचें कोष्टक.—शिलक पडलेलीं वर्षें.–१८६८–६९ सालच्या बजेटाचा प्रत्यक्ष अनुभव.—१८६९–७० च्या अंदाजपत्रकांची प्रत्यक्ष स्थिति.—जमाखर्चाचा नक्की अंदाज करितां येण्यास अडचणी.—जमाखर्चांत येणारी तूट भरून काढण्याविषयीं त्यांचे विचार.—ही स्थिति सुधारण्यासाठीं त्यांचे दोन उपाय.—तूट भरून काढण्यासाठीं त्यांनीं केलेली काटकसर.–वर्ष खलास होण्यापूर्वींच नवीन कर बसविण्याचा

विचार.—त्यांच्या उपायांमुळें वाढलेलें उत्पन्न.—आपल्या विचारासंबंधानें त्यांचें स्टेट सेक्रेटरीस पत्र.—त्यांच्या उपायांवर कित्येक आक्षेप.—त्यांच्या सुधारणांचीं तीन अंगें.—पहिलें अंगः—वरिष्ठसरकारच्या जमाखर्चासंबंधीं खात्यांतील व्यंगें.—जमाखर्चाच्या आंकड्यांचें वरिष्ठ सरकारांकडून योग्य परिशीलन होण्याची अवश्यकता.—महिन्यामहिन्याच्या जमाखर्चाच्या स्थितीची माहिती मिळविण्यासंबंधानें मि. चापमन् यांचें मत.—दुसरें अंगः—स्थानिक सरकारांच्या कारभारांत काटकसर.—जुन्या पद्धतींतील दोष.—स्थानिकसरकारांवर जमाखर्चासंबंधीं त्यांनीं टाकिलेली जबाबदारी.—त्यांना तोडून दिलेलीं कामें.—जुन्या पद्धतीसंबंधानें सर जॉन स्ट्राचे यांचा अभिप्राय.—तिजवर जनरल स्ट्राचे यांचे आक्षेप.—तिसरें अंगः—जमेंत व खर्चांत कायमचा मेळ.—त्यांच्या खटपटीचा परिणाम.—त्यांच्या मुदतींतील जमाखर्चाचें कोष्टक.—त्यांच्या नजविजीसंबंधानें जमाखर्च खात्याच्या सेक्रेटरींचा अभिप्राय. ]

---

# प्रकरण सातवें.

## लॉर्ड मेयो यांचें लष्करी धोरण.

[ यांच्या वेळची एकंदर ब्रिटिश फौज.—लष्करी खर्चांत काटकसर करण्याविषयीं त्यांजवर स्टेट सेक्रेटरी यांनीं टाकिलेला बोजा—काटकसरीचीं दोन अंगें.—गोऱ्या फौजेसंबंधानें त्यांचे विचार.—त्या फौजेच्या खर्चांत केलेली काटकसर.—काळ्या फौजेंतील काटकसरीसंबंधानें त्यांचे दोन विचार.—ह्या संबंधानें अखेरीस स्टेट सेक्रेटरी यांस सूचनाः— काळ्या फौजेच्या तोफखान्यासंबंधीं काटकसर.—बंगालच्या फौजेंत काटकसर.—मद्रासच्या फौजेंत काटकसर.—मुंबईच्या फौजेंत काटकसर.—काळ्या फौजेंतील काटकसरीचा एकंदरीनें परिणाम.—काटकसरीसाठीं सैन्याचें सामर्थ्य त्यांनीं कमी होऊं दिलें नाहीं.—त्यांनीं सुचविलेल्या सुधारणांचे परिणामः- स्टेट सेक्रेटरी यांनीं उलट सुचविलेले उपाय.—स्टेट सेक्रेटरी यांच्या उपायांवर हिंदुस्तान सरकारचें उत्तर.—ह्यांच्या कारकीर्दींत अमलांत आलेल्या सुधारणांमुळें झालेली काटकसर.—यांच्या लष्करी उपायांसंबंधानें एका प्र-

ख्यात अधिकाऱ्याचें मत.–सैन्यासंबंधीं त्यांच्या किरकोळ सुधारणा.–ह्या संबंधानें त्यांचा आणखी एक उतारा.–ह्या प्रकरणाचा उपसंहार. ]

---

## प्रकरण आठवें.

### लॉर्ड मेयो यांची आभ्यंतर व्यवस्था.

[ प्रांतांची स्थिति समजून घेण्याची त्यांची इच्छा.–पब्लिक वर्क्स् खात्यांतील अधिकाऱ्यांची स्थिति.–त्या खात्याकडून कामें कशीं चालतात तो प्रकार.–त्या खात्यांतील व्यंगें.–सरकारी कामें व इतर कामें ह्यांतील तफावत.–पाब्लिक वर्क्स् खात्यांतील कामांसाठीं कर्ज न काढणें.–ह्या खात्यासंबंधीं यांचीं मुख्य दोन तत्त्वें.–दुष्काळानिवारणार्थ त्यांचे विचार.—दुष्काळासंबंधानें त्यांच्या मतें सरकारचें कर्तव्य.–यांच्या वेळची आगगाडीच्या सडकांची स्थिति.–सरकारी पैशानें ह्या सडका बांधण्याची सुरवात.–पाटबंधाऱ्यांसंबंधीं त्यांनीं केलेलीं कामें.–बंगालच्या बाजूचीं व इतर कामें.–त्यांच्या पूर्वीची सार्वजानिक शिक्षणाची दोन प्रकारची पद्धति.–दुसऱ्या पद्धतीसंबंधानें त्यांचा अभिप्राय.–बंगाल्यांत सार्वजनिक शिक्षणांत पडलेला फरक.–मुसलमान लोकांच्या शिक्षणासंबंधीं त्यांचे विचार.–गरीब स्थितींतील युरोपियन लोकांच्या शिक्षणाची तजवीज.–सरकारी अधिकाऱ्यांच्या शिक्षणार्थ त्यांची खटपट.–सरकारी कामकाज चालण्यास अवश्य माहितीचा अभाव.–ह्या संबंधानें त्यांनीं योजिलेले दोन उपाय.–शेतकी खात्याविषयीं त्यांचा अभिप्राय.–स्थानिक–स्वराज्यासंबंधीं त्यांचे विचार.–त्यांच्या कारकीर्दींतील कायदे वगैरे.–त्यांचा आदरशील स्वभाव.–त्यांच्या स्वभावांतील गुण. ]

---

# प्रकरण नववें.

## शेवट.

[ तुरुंगांतील व्यवस्थेसंबंधीं त्यांचे विचार.–तुरुंगाच्या व्यवस्थेंत सुधारणा करण्याची आवश्यकता.–अंदमानबेटांतील स्थिति.–ती सुधारण्यासाठीं त्यांची योजना.–तेथील जमाबंदीच्या व्यवस्थेंत सुधारणा.–अंदमानसंबंधानें हिंदुस्तानच्या तिजोरीवर पडत असलेला बोजा.–हा बोजा कमी करण्याविषयींचे उपाय.–अंदमानचे नवे सुपरिंटेंडेंट यांच्या व्यवस्थेस आरंभ.–मेयो हे अंदमानला जातात.–बेटांची तपासणी.–आरोग्यमंदिरासाठीं जागेची योजना.–मौंट हारियटची ह्या कामासाठीं निवड.–त्या ठिकाणची प्रत्यक्ष पाहणी.–टेंकडीवरून खालीं उतरणें.–व्हाइसराय साहेबांवर हल्ला.–त्याचा परिणाम.–प्राणान्त.–तेव्हांचा हृदयद्रावक देखावा.–नंतरचे विधि.–मारेकऱ्याचा शेवट.–त्याचा पूर्ववृत्तांत.–सूड उगविण्यासाठीं त्याचे प्रयत्न.–त्याचें शरीरसामर्थ्य.–अखेरची निरवानिरव.–ह्यांच्या संबंधानें एका ऐरिश वर्तमानपत्रांतील उतारा. ]

# अर्ल ऑफ् मेयो

# यांचें चरित्र.

## प्रकरण पहिलें.

## उपोद्घात.

**विषयः**——डलहौसी व मेयो यांच्या मध्यंतरींच्या काळांतील स्थिति.—बंडाच्या काळांतील एतद्देशीय राजांचें आचरण.—बंडामुळें संस्थानिकांच्या संबंधानें ब्रिटिश सरकारच्या वर्तनांत झालेला फेरफार.—दत्तकाची संस्थानिकांना परवानगी मिळते.—ह्या स्थित्यन्तरामुळें सार्वभौम सरकार व संस्थानिक त्यांजवर पडलेली जबावदारी.—रयतेची स्थिति सुधारण्यासंबंधानें लार्ड मेयो यांचे विचार.—ते आले तेव्हांची परराष्ट्रसंबंधी स्थिति.—तीसंबंधाचें त्यांचें राजधोरण.—त्यांची आभ्यंतरव्यवस्था.—आगगाडीच्या सडकांसंबंधानें त्यांच्या कारकीर्दींतील उपाय.—ह्या संबंधानें पूर्वींच्या स्थितीशीं तुलना.—स्थानिक सरकारांना जमाखर्चासंबंधानें त्यांनीं दिलेले विशेष अधिकार.—तेणेंकरून खर्चांत काटकसर करण्यास स्थानिक सरकारांना मिळालेलें उत्तेजन.—एणेंकरून ह्याहूनही महत्त्वाचे घडून येणारे परिणाम.—स्थानिक स्वराज्यासंबंधीं त्यांचे विचार.—ह्या चरितास ह्यांच्याच मोठ्या चरित्राचा घेतलेला आधार.

ईस्ट इंडिया कंपनीच्या आमदानींत हिंदुस्तानांतील कित्येक राज्यें ब्रिटिश सत्तेखालीं गेलीं. त्यांपैकीं अगदीं अखेरीस खालसा झालेल्या राज्यांची हकीगत मार्क्विस

ऑफ् डलहौसी* यांच्या चरित्रांत आलेली आहे. डलहौसी यांच्या कारकीर्दीत खालसा झालेलीं व त्यापूर्वी खालसा झालेलीं राज्यें, ह्या सर्वांमिळून सांप्रत राणी† सरकारच्या अमलाखालीं असलेलें साम्राज्य कसें बनलें, त्या संबंधाचा ध्यानांत ठेवण्यासारखा भाग प्रस्तुत चरित्रांत यावयाचा आहे.

लॉर्ड डलहौसी व लॉर्ड मेयो ह्यांच्या कारकीर्दीच्या दरम्यान ब्रिटिश सत्तेवर मोठाच प्रसंग गुदरून त्यांतून ती कशी बचावते, तें ठरण्याची वेळ आली होती. तो प्रसंग हाच कीं, उत्तर हिंदुस्तानांतील गोरें सैन्य कंपनीनें हळू हळू काढून लाविल्यामुळें १८५७ सालच्या विपत्तीच्या काळांत त्या सर्व मुलखांत काळें सैन्य करील ती पूर्व दिशा; अशी स्थिति झाली. अशा रीतीनें गोरें सैन्य काढून लावण्यास डलहौसी ह्यांनीं हरकती आणिल्या असतांही तिकडे लक्ष देण्यांत आलें नाहीं. ह्या ५७ सालच्या बंडामुळें अनेक प्रकारचें राजकीय शिक्षण मिळालें; आणि इतिहासदृष्ट्या दोन गोष्टी निदर्शनास आल्या-

* "हिंदुस्तानांतील राज्यकर्ते" ( "Rulers of India" ) या नांवाची ग्रंथमाला मार्जी सर विल्यम हंटर यांनीं इंग्रजींत प्रसिद्ध केली असून तींत सुमारें २२ पुरुषांचीं चरित्रें आहेत; ह्यांत डलहौसी यांचा समावेश आहे. ह्या ग्रंथमालेपैकीं **अकबर** व **एल्फिन्स्टन** यांचीं मराठी भाषांतरें प्रसिद्ध झालीं असून इतर कित्येक तयार होत आहेत. ( भा. क. )

† मूळ पुस्तक १८९२ सालीं प्रसिद्ध झालें आहे; तेव्हां त्या कालच्या स्थितीला अनुसरून "राणी सरकार" असें म्हणणें ठीक होतें. तथापि आतां त्या ऐवजीं "बादशाह सरकार" असा अर्थ समजावयाचा; हें उघड आहे. ( भा. क. )

पहिली अशी कीं, नेटिव्ह किंवा काळें सैन्य हाच आपल्या सत्तेचा मुख्य आधारस्तंभ, असा कंपनीला बंडाच्या सालपर्यंत मोठा अभिमान होता; परंतु आपल्या सत्तेला मुख्य धोका त्याच सैन्यापासून आहे; असें ह्यानंतर स्पष्ट झालें. दुसरी गोष्ट अशी कीं, हिंदुस्तानांत गादीवर असलेले राजे व संस्थानिक ह्यांपासून आपल्या सत्तेस मुख्यत्वें धोका आहे, असें कंपनीस त्या काळापर्यंत नेहमीं वाटत असे; परंतु त्यांजकडूनच कंपनीच्या सत्तेला दुजोरा मिळाला.

"गादीवर असलेले राजे व संस्थानिक" असा उल्लेख वर जाणूनबुजून केला आहे. कारण गादीवर असलेल्या राजघराण्यांखेरीज राज्यावरून भ्रष्ट झालेलीं कित्येक घराणींही तेव्हां हिंदुस्तानांत होतीं; व अशा घराण्यांतील पुरुष बंडाचें पुढारी झाले असून त्यांच्याच नांवांवरून, अमक्याचें बंड, तमक्याचें बंड, अशीं नांवें बंडाला मिळत गेलीं. पदच्युत झालेल्या मुसलमानी राजघराण्यांच्या तर्फे दिल्लीचा नामधारी बादशाह व त्याचे पुत्र बंडांत सामील होते. हिंदु लोकांतील मुख्य सत्ताधीश मराठे हे, मोडकळीस आलेल्या मुसलमानी राजघराण्यांपासून मुलूख काबीज करून हिंदुस्तानांत सर्वत्र स्वराज्य स्थापितील, असा रंग अठराव्या शतकांत दिसत होता. ह्या मराठ्यांपैकीं पदच्युत झालेल्या पेशव्याचे दत्तकपुत्र नानासाहेब व त्यांचे लष्करी अनुयायी तात्या टोपी हे बंडाचे पुढारी झाले. ह्या दोन प्रमुख घराण्यांशिवाय कित्येक लहानसान भ्रष्ट झालेलीं घराणीं होतीं;

व त्यांच्या वंशांत औरस पुत्र नसल्यामुळें त्यांचीं संस्थानें ब्रिटिश अमलाखालीं आलीं होतीं. अशा घराण्यांचा पुढाकार पेन्शन मिळालेल्या झाशीच्या राणीनें घेतला. दिल्लीचे मुसलमान पुढारी व मराठ्यांचे पुढारी ह्यांजप्रमाणेंच ह्या राणीसाहेबांच्या मनांतही इंग्लिशांचा सूड उगविण्याचें सलत होतें; व त्या पुढाऱ्यांपेक्षां ह्या विशेष शूर होत्या. परंतु हिंदुस्तानांत राज्य करीत असलेल्या अनेक मांडलिक राजांनीं बंडाशीं कोणत्याही प्रकारचा संबंध ठेविला नाहीं. इंग्लिशांस त्या प्रसंगीं मदतीची अति जरूर होती; व भावी परिणाम कांहीं होवो तिकडे लक्ष न देतां ह्या राजांपैकीं पुष्कळांनीं इंग्लिशांचा पक्ष स्वीकारिला. बंडवाल्यांपासून दिल्ली शहर परत घेण्याच्या कामीं पंजाबांतील राजनिष्ठ संस्थानिकांनीं इंग्लिशांस मदत कशी केली, हें इंग्रजांस सर्व विदितच आहे. तथापि सर्व हिंदुस्तानांतील कैक एतद्देशीय राजांनीं इंग्रजांवर त्या प्रसंगीं उपकार करून त्यांस जो आश्रय दिला व जी कुमक दिली, तिजबद्दल इतिहासांत विशेष खुलासा आढळत नाहीं. हिंदुस्तानांत मुख्य जहागिरदार व संस्थानिक मिळून सुमारें १५० असतांही त्यांपैकीं फितूर झालेले एका हाताच्या बोटांवर मोजतां येतील इतकेच होते. बहार प्रांतांतील कोअरसिंग नांवाचा जमीनदार व त्याच्याप्रमाणें आपापल्या ठिकाणींच बंड करून राहिलेले पुढारी, हे बहुधा दिवाळें निघालेले अथवा अन्य तऱ्हेनें धुळीस मिळालेले होते.

५७ सालच्या बंडाचा एक परिणाम असा झाला कीं,

एतद्देशीय राजांशीं इंग्रज सरकारचा जो संबंध होता, त्यांत अति फरक पडला. ईस्ट इंडिया कंपनी ह्या राजांना थोडचाफार मानानें परदेशीय स्नेही राजांप्रमाणें लेखीत असे. तसेंच ह्यांच्यांपैकीं विशेष बलाढ्य राजांशीं तह करून त्यांना जखडून टाकावयाचें, व त्यांच्या संरक्षणार्थ त्यांच्या राज्यांत गोरें सैन्य ठेवून तेणेंकरून त्यांस दहशत उत्पन्न करावयाची; आणि इतर किरकोळ राज्यें योग्य प्रसंग सांपडतांच खालसा करावयाचीं; असें कंपनी सरकारचें राजधोरण होतें. 'उघड रीतीनें अगदीं राजरोस राज्य खालसा करण्याची एक पद्धति' कंपनी सरकारनें १८४१ त जाणूनबुजून ठरवून दिली, ती हीच होय. राणी सरकारनीं हिंदुस्तानचा राज्यकारभार प्रत्यक्ष हातीं घेतला; तेव्हां त्यांनीं कंपनी सरकारचें वरील राजधोरण प्रथमतः रद्द केलें. हिंदुस्तानांतील राजनिष्ठ राजेरजवाड्यांना त्यांनीं सत्त्यास स्मरून खात्रीपूर्वक कळविलें कीं, तुम्हां सर्वांची तुमच्या संस्थानांवर राजसत्ता कायम राखण्याची आमची इच्छा आहे. इतःपर हीं मांडलिक राज्यें हिंदुस्तानांतील ब्रिटिश साम्राज्याचे पोटभागच बनलीं; व ह्या मांडलिक राजांचा दर्जा स्पष्टपणें ठरविण्यांत आला. तो असा कीं, इंग्लंडच्या राजाहून हे कमी दर्ज्याचे; तथापि हिंदुस्तानांतील खुद्द ब्रिटिश अमलाखालीं असलेल्या प्रांतांतील सरदार लोकांहून अधिक दर्ज्याचे.

एतद्देशीय राजेरजवाड्यांची सत्ता व त्यांचें वैभव हीं त्यांजकडे वंशपरंपरेनें बिनधोक चालावीं; ह्यास्तव राणी सरकारांनीं पूर्वींच्या मोगल बादशाहांनीं घालून ठेविलेला

एक नियम रद्द केला. तो कोणता म्हणाल तर, ज्या मांडलिक राजांचें अस्तित्व केवळ सार्वभौम सरकारच्या मर्जीवर अवलंबून आहे, अशा राजघराण्यांतून बादशाहाच्या मर्जीस येईल त्यालाच गादीवर बसवावयाचें. आपली सत्ता वृद्धिंगत व्हावी म्हणून, एकाद्या संस्थानिकास औरस पुत्र नसला म्हणजे ह्याच नियमाची अंमलबजावणी कंपनी सरकारनेंही चालू ठेविली होती. परंतु १८५८ सालीं राणी सरकारांनीं ह्या नियमाला बुद्ध्या फाटा दिला. कोणाही मनुष्यास औरस पुत्र नसल्यास आपल्या खाजगत मालमत्तेसाठीं एकाद्या मुलास दत्तक घेऊन त्यास आपला वारस ठरविण्याची कायद्यानें पूर्ण मुभा आहे. त्याचप्रमाणें दत्तक घेऊन आपल्या पश्चात गादीचा मालक ठरविण्याचा हक्क मांडलिक राजांनाही देण्यांत आला; मग ते कोणत्याही दर्ज्याचे असोत. ह्याचा परिणाम असा झाला कीं, राणी सरकारचें राज्य चिरस्थायी असावें ह्यांतच आपलें फार हित आहे, असें ज्याप्रमाणें थोड्याफार जमिनीच्या मालकांना वाटतें, त्याप्रमाणें एतद्देशीय संस्थानिकांनाही वाटूं लागलें. कारण ह्यांची राजसत्ता व ह्यांचे मुलख हीं दोन्ही राणी सरकारांकडून मिळालेल्या सनदांमुळेंच इतःपर ह्यांजकडे कायम राहिलीं.

मांडलिक राजांच्या स्थितींत वर दर्शविल्याप्रमाणें महत्त्वाचा फेरफार झाल्यामुळें ते राजे आणि सार्वभौम सरकार ह्या उभयतांवरही जास्त जबाबदारी पडली. हिंदुस्तानांतील पांच कोटी प्रजा ह्या मांडलिक राजांच्या ता-

ळ्यात कायमची देऊन टाकिल्यामुळें त्यांच्या राज्यकार-भारावर विशेष दक्षतेनें नजर ठेवून, त्या कारभारापासून संस्थानांतील प्रजेला सुख होईल, दुःख पोहोंचणार नाहीं, अशाविषयीं खबरदारी घेणें, हें सार्वभौम सरकारचें कर्तव्य झालें. तसेंच ह्या नवीन फेरफाराचा मूळ हेतु संस्थानिकांनीं आपापल्या प्रजेवर उत्तम प्रकारें राज्य करावें असा होता. म्हणून सार्वभौम सरकारचा हा हेतु साध्य होण्यासाठीं त्या सरकारला मनापासून मदत करणें, हें त्या संस्थानिकांचें कर्तव्य झालें. संस्थानिकांच्या स्थितींत ह्याप्रमाणें फरक पडल्यामुळें त्यांच्या व सार्वभौम सरकारच्या दरम्यान प्रत्यक्ष कित्येक प्रश्न उत्पन्न झाले; व हिंदुस्तानचें राज्य खुद्द राणी सरकारकडे गेल्यानंतर पहिल्या दहा वर्षांत हळू हळू त्या सर्वांचा उलगडा लागला. आतां असा उलगडा लागतांना केव्हां केव्हां एकमेकांच्या मनाविरुद्धही गोष्टी घडल्या; नाहीं असें नाहीं. हीं दहा वर्षें म्हणजे ब्रिटिश सार्वभौम सत्तेच्या दृढीकरणाचा काळ होय. मांडलिक राजांशीं स्नेहभाव ठेवून त्यांचें मन इंग्रज सरकारकडे वळवून घेण्याचें कार्य विशेष कल्याणाचें होतें; व तें लॉर्ड मेयो यांच्या वांट्यास आलें, असें पुढील इतिहासावरून दिसून येईल. हें कृत्य म्हणजे, संस्थानिकांच्या आंगीं फार दिवस जशी स्वार्थदृष्टि होती, तशीच त्यांच्या अंतःकरणांत राजनिष्ठा नव्यानेंच उत्पन्न करणें; तसेंच सार्वभौम सरकारचें व आपलें हित हीं भिन्न नसून आपणां उभयतांवर एकाच प्रकारची जबाबदारी आहे, अशा तऱ्हेचे नवे विचारही त्यांजमध्यें उत्पन्न करणें हें होय.

तथापि लॉर्ड मेयो यांनीं राजेरजवाड्यांशीं स्नेहभाव ठेवून फक्त त्यांचींच मनें वळविलीं असें नाहीं; ह्या देशांतील एकंदर लोकांचींही मनें त्यांनीं इंग्रज सरकारकडे वळविलीं. हिंदुस्तानांतील लोकांपैकीं इतिहासांत अति प्रसिद्ध असे जे मुसलमान लोक, ते हळू हळू निकृष्टदशेस पोहोंचले होते. वस्तुतः राजसत्ता नष्ट झालेल्या लोकांना अशी दशा येणें साहजिकच आहे. १८६९ सालापूर्वींच्या पंधरा वर्षांत विद्याप्रसारासाठीं सरकारनें जे उपाय योजिले, त्यांच्या योगानें तर ह्या लोकांचा ऱ्हास विशेष त्वरेनें होत गेला; व हिंदुस्तानांतील सर्व मोठमोठ्या प्रांतांतून सरकारी हुद्द्याच्या जितक्या जागा वास्तविक रीतीनें त्यांना मिळणें रास्त होतें, तितक्या मिळतनाशा झाल्या, असें म्हणण्यास हरकत नाहीं. वस्तुतः पूर्वीं मोगलांच्या आमदानींत अशा जागांवर प्रायः ह्या मुसलमान लोकांचाच हक्क होता. अशा प्रकारें एका विशिष्ट जातीला राज्यकारभारांतून वगळिल्यानें कोणत्या प्रकारचीं संकटें उत्पन्न होतात ह्याची पूर्ण कल्पना लॉर्ड मेयो हे रशियांत प्रवास करीत असतां व खुद्द आपल्या जन्मदेशांत ( आयर्लंडांत ) असतांही त्यांना पूर्णपणें आली होती. लॉर्ड मेयो ह्यांनीं ह्या बाबतींत योजिलेले उपाय अति महत्त्वाचे असून ते असे होते कीं, तेणेंकरून ब्रिटिश राज्यपद्धति मुसलमान लोकांच्या सहज आंगवळणीं पडावी; व तिजमुळें त्यांच्या गरजा भागाव्या. ह्याप्रमाणें ह्या देशांतील मांडलिक राजे व सर्व प्रजा ह्या उभयतांचींही मनें वळविण्यास जरूर असे विशेष गुण

लॉर्ड मेयो यांच्या आंगीं होते. अर्ल ऑफ् डार्बी* हेही असें म्हणत कीं, " हें काम त्यांना केवळ अनुमान-धपक्यानेंच करावयाचें नव्हतें; तर त्यांचा स्वभावच असा होता कीं, तेणेंकरून असा परिणाम साहजिक घडून यावा."

लॉर्ड मेयो हे गव्हर्नर जनरलच्या जागीं आले तो प्रसंग इतका आणीबाणीचा व महत्त्वाचा होता कीं, हिंदुस्तान सरकारचें परदेशसंबंधीं पूर्वींचें राजधोरण ह्यानंतर आपापच रद्द पडलें. शिख लोकांचें राज्य पंजाबांत होतें तोंपर्यंत ब्रिटिश हिंदुस्तान व अफगाणिस्तान ह्यांच्या दरम्यान पंजाब प्रांत असल्यामुळें अफगाणिस्तानच्या बाजूनें हिंदुस्तानाला उपद्रव करणें म्हणजे तो प्रांत एकाद्या डोंगराप्रमाणें प्रतिबंधक होता. परंतु लॉर्ड डलहौसी ह्यांनीं १८४९ त तो प्रांत खालसा केल्यामुळें हा प्रतिबंध नाहींसा होऊन एशिया खंडामधील रशियन आणि इंग्लिश लोकांच्या चळवळी विशेष नजीक येऊन भिडल्या. ह्यामुळें एशिया खंडांत इंग्लिश व रशियन लोकांच्या दरम्यान उत्पन्न होणाऱ्या भानगडींचा विचार करण्याचें काम ह्यापुढें सर्वस्वीं युरोपांतील मुत्सद्दी मंडळाकडे गेलें; आणि १८४९ सालानंतर २० वर्षें हिंदुस्तान सरकारच्या परदेशसंबंधीं खात्यानें वायव्य सरहद्दीपलीकडील राजांना मर्जीस येईल तसें वागूं दिलें; त्यांच्या कारभारांत ढवळाढवळ केली नाहीं. हें राजधोरण प्रारंभीं पूर्ण विचाराअन्तीं ठरविलेलें होतें; व हें ठरविलें त्या वेळची एकंदर वस्तुस्थिति मनांत आणिली असतां तें योग्यच होतें. तथापि

*हे एक इंग्लंडचे मुख्य प्रधान होते. (जन्म १७९९; मृत्यु १८६९.)

लॉर्ड मेयो गव्हर्नर जनरलच्या जागीं येण्याच्या किंचित् आधीं, हें राजधोरण कायम ठेवणें शक्य नाहीं, असें स्पष्ट झालें होतें. सरहद्दीपलीकडील कारभारांत हात घालण्यापासून जें नुकसान झालें असतें, त्यापेक्षां त्या सर्वांपासून तुटक राहिल्यानें विशेष होण्याचा संभव दिसूं लागला. सारांश, एशिया खंडांतील इंग्लिश व रशियन लोकांच्या मुलखांच्या दरम्यान पूर्वीच्या शिख राज्याप्रमाणें नवीन एकादा प्रतिबंधक डोंगर उत्पन्न करण्याचें काम लॉर्ड मेयो यांजवर पडलें.

सबंध वायव्य सरहद्दीवरील संस्थानिकांशीं स्नेहभाव करून, आणि रशियन व इंग्लिश सरहद्दींच्या दरम्यान एकाद्या तिऱ्हाईत राजाचा मुलूख असावा अशाविषयीं रशियन सरकारचें अनुमोदन मिळवून लॉर्ड मेयो ह्यांनीं हें वरील काम तडीस नेलें. ह्याबद्दलची सविस्तर हकीगत पुढें एका प्रकरणांत येईलच. लॉर्ड डलहौसी ह्यांनीं पंजाब प्रांत खालसा केला खरा; परंतु त्या प्रांतावर ब्रिटिश सत्ता पूर्णपणें बसली ती लॉर्ड मेयो यांच्या परदेशसंबंधीं राजधोरणमुळेंच बसली; असा खरा इतिहास होय. हिंदुस्तानच्या वायव्य सरहद्दीवर जाण्यायेण्याचे जे घाट आहेत त्यांच्या अलीकडील बाजूला शिख लोकांचें राज्य हा पूर्वीं एक प्रकारचा प्रतिबंधक डोंगर होता. परंतु लॉर्ड मेयो यांनीं त्याच्या ऐवजीं सदरहू घाटांच्या पलीकडील बाजूला एक नवीनच डोंगर तयार केला; हेतु एवढाच कीं, कोणीकडून तरी मध्य एशियांतील रशियन लोकांच्या चळवळींना प्रतिबंध व्हावा. ते म्हणत कीं, “ इतर कोणत्याही

राष्ट्राशीं बरेपणा ठेवण्यापेक्षां आपल्याशीं बरेपणा ठेवण्यापासून ज्या संस्थानिकांना विशेष फायदा वाटेल, अशा प्रकारचीं बलाढ्य, आपल्याशीं स्नेहभावानें वागणारीं व स्वतंत्र, अशीं संस्थानें हिंदुस्तानच्या सबंध सरहद्दीभोंवतीं राहूं द्या; ह्मणजे आपणांस काडीमात्र भय नाहीं." ह्या त्यांच्या मताचा उल्लेख पुढेंही एकदा होईल. लॉर्ड मेयो यांनीं १८६९ मध्यें रचिलेल्या ह्या पायावरच मध्य एशियेसंबंधाचें हिंदुस्तान सरकारचें सांप्रतचें राजधोरण ठरलेलें आहे.

एथपर्यंत देशाच्या बाह्य कारभारासंबंधानें विवेचन झालें. आतां देशांतील राज्यकारभारासंबंधानें लॉर्ड मेयो ह्यांना प्रथम दर्शनीं परस्परांशीं विसंगत दिसणाऱ्या अशा दोन गोष्टींचा विचार करणें भाग पडलें. पहिली गोष्ट हिंदुस्तानांतील ब्रिटिश अमलांतील निरनिराळ्या प्रांतांचें एकीकरण करण्याची आवश्यकता; आणि दुसरी त्यांचेंच पृथक्करण करण्याची आवश्यकता. लॉर्ड डलहौसी यांनीं जिंकून घेतलेल्या व खालसा केलेल्या नवीन प्रांतांचें सुरक्षित असें हिंदुस्तानचें एक साम्राज्य बनविण्यासाठीं ह्या सर्व प्रांतांचें उत्पन्न एकंदर साम्राज्याच्या संरक्षणाकरितां घेणें भाग झालें. तसेंच इतःपर ह्या सर्व साम्राज्याच्या संरक्षणार्थ केवळ समुद्रकिनाऱ्यावर दक्षता ठेविल्यानें काम भागणारें नव्हतें. ह्मणून प्रसंगीं आपणांस उपयोगीं पडतील अशा प्रकारचीं तटबंदीचीं वगैरे ठाणीं जाळ्याप्रमाणें देशांत सर्वत्र स्थापावीं लागलीं; व त्यांपैकीं कित्येक समुद्रकिनाऱ्यापासून आंत हजारों मैलांवरही स्थापणें भाग पडलें; आणि

त्यांचा परस्परांशीं आणि समुद्रकिनाऱ्याशीं आगगाडीच्या सडका करून दृढ संबंध जोडावा लागला. ही गोष्ट डलहौसी यांच्या पक्की लक्षांत आली होतीच; कारण जिंकेलेल्या प्रांतांवर पूर्ण राजसत्ता चालविण्याकरितां त्यांचें एकीकरण करण्याशिवाय दुसरा मार्ग नाहीं, असें त्यांच्या दूरदृष्टीच्या राजकारस्थानावरूनही स्पष्ट होतें.

५७ सालच्या बंडामुळें सरकारला झालेली दगदग व काळजी दूर झाल्यानंतर लॉर्ड मेयो हिंदुस्तानांत आले. ह्यास्तव आपल्या पूर्वींच्या त्या विख्यात गव्हर्नर जनरलचे बेत विशेष रीतीनें तडीस नेण्याचें काम त्यांजवर पडलें; कारण तें काम मध्यंतरींच्या काळांत करितां येण्यासारखें नव्हतें. त्या वेळच्या एकंदर राज्यपद्धतीनें लार्ड मेयो हे हिंदुस्तानांत येण्यापूर्वींच एवढी गोष्ट स्पष्टपणें दिसून आली होती कीं, हिंदुस्तान सरकारनें आपल्या जमेपेक्षां जास्त खर्च केल्याशिवाय आगगाडीच्या जरूर त्या सडका बांधण्यास मार्ग नव्हता. ह्यास्तव लॉर्ड मेयो यांच्या हुकमानें **सरकारी आगगाडीचे रस्ते** बांधण्याचा नवीन प्रकार प्रथमतः सुरू झाला. ह्या प्रकारामुळें लॉर्ड डलहौसी यांच्या योजनेप्रमाणें हिंदुस्तानांत आगगाडीचे जे रस्ते त्या काळापर्यंत होणें राहिले होते, ते तयार झाले. तसेंच हिंदुस्तानांत आगगाडीचे फाटे सर्वत्र पसरतील असा काळ येत चालला आहे, तोही ह्या नवीन प्रकारामुळेंच. वास्तविक पाहिलें असतां आगगाडीच्या सडकांची वाढ ह्या देशांत इतक्या झपाट्यानें होईल, अशी आशा खुद्द लॉर्ड मेयो ह्यांनाही त्या काळीं फारशी वाटली नसावी.

ह्यांच्या कारकीर्दीचें पहिलें वर्ष १८६९–७० हें होय. ह्या पूर्वींच्या पांच वर्षांत आगगाडीचा नवा रस्ता फक्त ८९२ मैल सुरू झाला होता. १८६९–७० सालानंतरच्या पांच वर्षांत आणखी २०१३ मैल जास्त रस्ता सुरू झाला. लॉर्ड मेयो यांनीं **सरकारी आगगाडीचे रस्ते** बांधण्याचा प्रकार सुरू केला त्यापूर्वीं **सरकारी हमीनें** आगगाडीचे रस्ते बांधण्याचा प्रकार असून तो १८५३ पासून सुरू झालेला होता. ह्या जुन्या प्रकाराप्रमाणें आरंभापासून १८६९–७० अखेर सतरा वर्षांच्या अवधींत एकंदर ४२६५ मैलच रस्ता सुरू झाला होता. परंतु **सरकारी खर्चानें** व **सरकारी हमीनें** अशा दोन्ही प्रकारांनीं आगगाडीचे रस्ते बांधण्याची सुरुवात प्रथमतः लॉर्ड मेयो ह्यांनीं केली; व ह्या नवीन दुहेरी प्रकारामुळें १८८७–८८ सालामध्यें आगगाडीच्या सर्व रस्त्यांची मिळून लांबी १५२४५ मैल इतकी वाढली.

ह्याप्रमाणें सर्व हिंदुस्तान देशाचें संरक्षण होण्यासाठीं त्यांतील निरनिराळ्या प्रांतांचें एकीकरण करणें अति अवश्य आहे, हें लॉर्ड मेयो यांच्या पक्कें लक्षांत येऊन चुकलें. तथापि त्यांना असेंही कळून आलें कीं, हिंदुस्तान सरकारला आपलें कर्ज फेडून टाकण्याची ऐपत येण्यास जमाखर्चाच्या बाबतींत निरनिराळे प्रांत पृथक् पृथक् तोडून टाकण्याशिवाय इलाज नाहीं. ते कामावर रुजू होततोंपर्यंत अति दूरदूरच्या प्रांतांच्या खर्चाची व्यवस्था देखील हिंदुस्तान सरकारकडूनच लागत असे. परंतु लॉर्ड डलहौसी यांच्या कारकीर्दींत ब्रिटिश हिंदुस्तानची मर्यादा

फार वाढल्यामुळें त्या सर्व प्रांतांच्या जमाखर्चाची व्यवस्था लावण्याचें काम एका वरिष्ठ सरकारी खात्याच्या शक्तीबाहेर गेलें. ह्याचा परिणाम असा झाला कीं, वरिष्ठ सरकारकडून आपापल्या प्रांतांना पैशाची मदत मिळविण्यासाठीं स्थानिक सरकारांच्या दरसाल झटापटी सुरू झाल्या; आणि चालू सालचा किंवा पुढील सालचा एकंदर साम्राज्याचा वास्तविक आदा काय व खर्च किती, ह्याजबद्दलचीं अंदाजपत्रकें वरिष्ठ सरकारला तयार करणें वरचेवर अति कठीण पडूं लागलें. अशा वस्तुस्थितीमुळें जे अनिष्ट परिणाम घडून आले, त्यांची सविस्तर हकीगत ह्या संबंधाच्या एका स्वतंत्र प्रकरणांत येईलच. तूर्त इतकें सांगितलें म्हणजे पुरे कीं, लॉर्ड मेयो व त्यांचे सल्लागार ह्यांनीं योजिलेल्या उपायांमुळें असा प्रसंग पुढें कधीं आला नाहीं.

अशा प्रकारच्या तजविजींनीं त्यांनीं हिंदुस्तानच्या जमाखर्चाची पद्धति सुधारली. ह्या सुधारणेमुळें प्रांतिक सरकारांचें जमाखर्चाच्या बाबतींतील स्वातंत्र्य वाढलें; परंतु त्याबरोबरच त्यांच्यावरील जबाबदारीही वाढली; मात्र ह्या बाबतींत त्यांच्यावर वरिष्ठ सरकारचा हुकूम कितपत चालावा, हेंही स्पष्टपणें ठरलें गेलें. अशा रीतीनें आपापल्या प्रांतांचा राज्यकारभार काटकसरीनें चालविण्यांतच स्वार्थ आहे, असा नवीन व उत्कट विचार त्यांनीं प्रांतिक सरकारांच्या अंतःकरणांत ह्या अशा उपायांनीं जागृत केला. ते येण्यापूर्वीं कित्येक वर्षें देशाच्या एकंदर जमाखर्चांत वरचेवर जमेपेक्षां खर्च वाढून तूट येई. परंतु त्यांनीं केलेल्या सुधारणेमुळें इतःपर दरसाल थोडी

बहुत तरी शिल्लक पडूं लागली. त्याचप्रमाणें कोणत्याही वर्षाच्या जमेचा नक्की अजमास करितां यावा, अशा तऱ्हेचीं अंदाजपत्रकें आधींच तयार करितां यावीं; ह्यास्तव प्रांतिक सरकारांच्या नगदी खात्यांचा वरिष्ठ सरकारशीं जो संबंध होता, त्यांतही त्यांनीं सुधारणा केली. ही सर्व सुधारणा त्यांनीं अशा रीतीनें घडवून आणिली कीं, तेणेंकरून प्रांतिक सरकारांवर वरिष्ठ सरकारची जी सत्ता होती तींत न्यूनता पडली नाहीं; किंवा जो अधिकार बजाविल्यानें वस्तुतः फायदा होण्याचा संभव आहे असा वरिष्ठ सरकारचा कोणताही अधिकार नष्ट झाला नाहीं.

त्यांनीं सुरू केलेल्या जमाखर्चाच्या योजनांमुळें ह्याप्रमाणें फार मोठा फायदा तत्काळ झालाच. तथापि ह्या योजनांमुळें कालांतरानें ह्याहूनही महत्त्वाचे परिणाम घडून येतील, अशी आशा त्यांना होती. हिंदुस्तानांतील निरनिराळ्या प्रांतांचें परस्परांशीं वरकरणी नव्हे, तर खरें ऐक्य करण्यासाठीं काय व्यवस्था करावी; हा त्यांना हिंदुस्तानच्या राज्यकारभारांतील अत्यंत बिकट प्रश्न वाटला. एकाद्या राष्ट्रांतील अनेक प्रांतांतून एकाच धर्माचे किंवा जातीचे लोक असले म्हणजे त्यांचें ऐक्य करणें फारसें कठीण नसतें; परंतु तशी स्थिति हिंदुस्तानांत नव्हती. एकाच साम्राज्याचे आपण अवयव आहों, असा विचार ह्या देशांतील निरनिराळ्या प्रांतांतील लोकांमध्यें उत्पन्न करून त्यांजमध्यें ऐक्यभाव त्यांना उत्पन्न करावयाचा होता. हें कार्य सिद्धीस नेण्याचा त्यांना एक मार्ग दिसला. तो असा कीं, प्रांतिक सरकारांना आपापल्या प्रांतांतील

राज्यकारभार चालविण्याची मुखत्यारी व्यवस्थित रीतीनें ठरवून दिली पाहिजे; आणि एकंदर साम्राज्यासंबंधीं बाबतींत त्यांनीं वरिष्ठ सरकारच्या पूर्णपणें ताब्यांत राहिलें पाहिजे.

स्थानिक उत्पन्नांची व्यवस्था त्या त्या ठिकाणच्या लोकांकडे सोंपविल्यानेंच एकंदर देशाचे राज्यकारभारासंबंधीं महत्त्वाच्या गोष्टींचें शिक्षण लोकांस उत्तम मिळेल, असा लॉर्ड मेयो यांचा समज होता. त्यांनीं पुढें एके ठिकाणीं स्पष्टपणें म्हटलें आहे कीं, नगदी खात्यासंबंधीं आपल्या राजधोरणाचा पूर्ण आशय ध्यानांत आणून त्याप्रमाणें इमानें-इतबारें कामें चाललीं तर, आपला राज्यकारभार आपण कसा चालवावा ह्याचें शिक्षण उत्तरोत्तर मिळण्याचे प्रसंग उत्पन्न होतील. कारण त्या राजधोरणाचा हेतुच असा आहे कीं, उत्कृष्ट राज्यपद्धतीचें शिक्षण भिन्न भिन्न लोकांना आणि जातींना मिळावें. निरनिराळ्या प्रांतांना वरिष्ठ सरकारापासून तुटक ठेवण्याच्या ह्या तुमच्या राजधोरणामुळें अनिष्ट परिणाम घडून येतील, असें प्रतिपादन कोणीं केल्यास ते ती गोष्ट कबूल करीत नसत. त्यांची उलट अशी समजूत होती कीं, कोणताही विस्तीर्ण देश एक छत्राखालीं येण्यास एकच मार्ग आहे. तो कोणता म्हणाल तर, निरनिराळ्या प्रांतिक सरकारांना आपापलीं कामें करण्याची स्वतंत्रता देऊन त्यांजवर त्यासंबंधीं जबाबदारी टाकावयाची; मात्र वरिष्ठ सरकारची त्यांजवर पूर्ण सत्ता असली पाहिजे. आपल्या राजधोरणानें इष्ट स्थिति घडून येण्यास फार मदत होईल, असें त्यांस वाटे.

सर विल्यम हंटर यांनीं पंधरा वर्षांपूर्वीं लॉर्ड मेयो यांचें एक चरित्र प्रसिद्ध केलें असून तें प्रस्तुत चरित्रापेक्षां बरेंच विस्तृत आहे. लॉर्ड मेयो हे व्हाइसराय असतां त्यांनीं जे महत्त्वाचे उपाय योजिले त्यांचें वर्णन हंटर साहेबांनीं ह्या पुस्तकांत बहुतेक त्या मोठ्या चरित्राच्या आधारानेंच केलें आहे. तथापि इंग्लंडांत हिंदुस्तानसंबंधीं स्टेट सेक्रेटरींचें जें इंडिया ऑफिस आहे, त्यांतील कामगारांचे, व विशेषतः तेथील पोलिटिकल खात्यांतील कामगारांचे त्यांनीं आभार मानिले आहेत. कारण लॉर्ड मेयो यांनीं जे उपाय योजिले, त्यांचा अथपासून इतिपर्यंतचा इतिहास सरकारी दप्तरांतून शोधून काढण्याच्या कामीं, तसेंच त्या उपायांमुळें कोणते परिणाम घडून येतील ह्याचा अंदाज करण्याच्या कामीं सदहू कामगारांनीं फार मदत केली. लॉर्ड मेयो यांच्या कुटुंबांतील माणसांचे व विशेषतः त्यांच्या पत्नीचेही आभार हंटर साहेबांनीं मानिले आहेत. त्यांनीं लॉर्ड मेयो यांचें मोठें चरित्र लिहिलें, तेव्हां तर ह्या बाईनीं दिलेल्या सामग्रीचा* उपयोग त्यांना झालाच होता; शिवाय हल्लींच्या मूळ इंग्रजी पुस्तकाचीं प्रूफें त्या बाईनीं वाचून पाहून महत्त्वाच्या सूचना केल्या. तसेंच मूळ इंग्रजी पुस्तकाच्या आरंभीं लॉर्ड मेयो यांचें जें चित्र आहे, तेंही त्या बाईकडूनच हंटर साहेबांना मिळालें.

---

*अर्ल ऑफ् मेयो—हिंदुस्तानचे चौथे व्हाइसराय यांचें चरित्र; २ भाग; २री आवृत्ति; १८७६.

# प्रकरण दुसरें.

## चरित्रनायक.

ह्यांच्या वंशाची पूर्वपीठिका.—ऐर्लंडांत यांच्या घराण्याची स्थापना.—ऐर्लंडचा त्यांस अभिमान.—१८ व्या शतकांतील ह्या घराण्याची स्थिति.—त्यांचें बालपणचें ठिकाणः हेज.—तेथील कुटुंबस्थिति.—त्यांच्या शिक्षणाची वडिलांनीं लाविलेली व्यवस्था.—ख्रिस्ती धर्माधिकाऱ्यांचें हेज येथें दळणवळण.—हेज येथील राहाणी.—यांच्या वडिलांसंबंधानें एका मुलाचा अभिप्राय.—त्याचाच आईसंबंधानें अभिप्राय.—मुलांच्या वर्तनावर मातापित्यांच्या वर्तनाचा परिणाम.—मेयो यांस इतिहासाची गोडी लागते.—त्यांच्या बालपणासंबंधीं आणखी एक उतारा.—ह्या कुटुंबाचें परदेशीं प्रयाण.—इतालींतील हकीगत.—त्यांच्या वरिष्ठ प्रतीच्या शिक्षणाची वगैरे हकीगत.—पामर्स्टन येथें त्यांचा मुक्काम.—पुढील एकदोन वर्षांची हकीगत.—त्यांचा रशियांत प्रवास.—रशियन लोकांची त्या काळची स्थिति.—तिचे परिणाम.—नियंत्रित व्यापाराची तेथील पद्धति.—इतर बाबींतील सरकारची ढवळाढवळ.—रशियन शेतकऱ्यांची बंगाल्यांतील शेतकऱ्यांशीं तुलना.—रशियन शेतकऱ्यांसंबंधानें त्यांचा एकंदरींत अभिप्राय.—रशियांतील स्थितीपासून त्यांनीं घेतलेलें शिक्षण.—तेथील देहान्त शिक्षेसंबंधीं उतारा.—रशियांतून परत आले तेव्हांची ऐर्लंडची स्थिति.—दुष्काळांतील कामगिरीचा मोबदला.—त्यांचे राजकीय विचार.—पार्लमेंटाच्या सभासदांची निवड.—निवडीचा निकाल.—त्यांना शेतकीसंबंधीं प्रत्यक्ष शिक्षण.—पार्लमेंटांतील त्यांचें पहिलें भाषण.—पार्लमेंटांतील कामासंबंधीं एकाचा अभिप्राय.—त्यांनीं आपल्या पक्षाची बजाविलेली कामगिरी.—त्यांची ऐर्लंडच्या चीफ सेक्रेटरींच्या जागीं योजना.—पार्लमेंटांत पुनः निवड.—त्या सभेपुढें त्यांनीं आणिलेले कायद्यांचे मसुदे.—क्रिमियाचें युद्ध.—ह्यांचे बंधु युद्धावर गेले असतां त्यांनीं आपल्या मातुःश्रींचें

केलेलें समाधान.—त्या युद्धाचा किरकोळ बाबींवरही घडलेला परिणाम.—पार्लमेंटांतील कामाबद्दल आणखी एक अभिप्राय.—ह्याच बाबतींत आणखी अभिप्राय.—ह्याच बाबतींत प्रधानमंडळापैकीं एकाचा अभिप्राय.—अधिकारी ह्या दृष्टीनें त्यांच्या आंगीं असलेले गुण.—पार्लमेंटांत ऐर्लंडसंबंधीं प्रतिपक्षाचे पुढारी ह्या नात्यानें त्यांचें काम.—सदर कामाचें स्वरूप.—१८६७ त त्यांजवर पडलेला कामाचा बोजा.—फेनियन लोकांच्या धामधुमींत त्यांचें वर्तन.—मातापित्यांचा मृत्यु.—सरकार तर्फेचे पुढारी ह्या नात्यानें त्यांच्या एका भाषणाविषयीं अभिप्राय.—ह्या संबंधानें स्वतःचें मत.—ऐर्लंडसंबंधानें चांगलीशी कामगिरी बजावण्याविषयीं त्यांची निराशा.—ह्याचीं कारणें.—त्यांना हिंदुस्तानच्या ग. ज. ची जागा मिळण्याचा संभव.—ते जागा पतकरितात.—मि. डिझरायली यांचा त्यांजबद्दल अभिप्राय.—त्यांची पार्लमेंटांतील २१ वर्षांची कारकीर्द.—त्यांचा कान्सर्व्हेटिव्ह पक्षास उपयोग.—त्यांचा होत गेलेला उत्कर्ष.—स्वपक्षाशीं त्यांचा मतभेद.—त्यांचें मुलांबाळांकडे लक्ष.—तोच विषय.—त्यांना खेडेगांवांत राहण्याची व शारीरिक खेळांची आवड.—त्यांचें शिकारीकडे लक्ष —त्यांच्या सरकारी कामकाजांचा पुनः विचार.—व्हाइसरायच्या कर्तव्यासंबंधानें त्यांनीं इंग्लंडांत चालविलेली तयारी.—त्यांच्या नेमणुकीवर आक्षेप.—त्यांच्या स्तुतीचा लेख.—त्यांच्या नेमणुकीसंबंधीं आक्षेपांवर त्यांचें म्हणणें.—दुसऱ्याचें मन न दुखविण्याचा त्यांचा स्वभाव. मि. डिझरायलींचा त्यांना आधार.—हाताखालच्या कामगारांचा पक्ष धरण्याचा त्यांचा गुण.—ऐर्लंडास शेवटचा रामराम.—इकडे येतांना पारिस येथें मुक्काम.—तेथील दप्तराची पाहणी.—जलप्रवासांतील विश्रांति—इजिप्तमधील हकीगत.—एडनसंबंधीं उल्लेख.—मुंबई बंदरांत आगमन.—तेथील मुक्कामांतील हकीगत.—मद्रास येथें आगमन.—तेथून प्रयाण.—चार्ज देणें घेणें.—त्या वेळचा देखावा.—तेव्हांचा समारंभ.—त्यांच्या प्रथम भेटीचा इकडील अधिकाऱ्यांवर परिणाम.

रिचर्ड सौथवेल बर्क हे मेयो घराण्यांतील सहावे अर्ल असून यांचा जन्म डब्लिन शहरीं २१ फेब्रुआरी १८२२ त झाला. ऐर्लंडचा इतिहास ह्मटला म्हणजे ज्या सात शतकांत तेथें अस्वस्थता होती, त्या काळाचाच होय; आणि

रिचर्ड बर्क हे ज्या घराण्यांत जन्मले तें घराणें ह्या सर्व काळांत प्रसिद्ध होतें. फ्रान्स देशांतील नार्मंडी प्रांतांतील अर्ल ऑफ् कॉमीन यांचें जें प्राचीन घराणें त्यांच्याच वंशांतील मेयो घराण्यांतील हे अर्ल होत. ऐर्लंड बेट जिंकण्यासाठीं **स्ट्रांगबोच्या*** वरील स्वारीपासून शेवटपर्यंत इंग्लिशांनीं जे प्रयत्न केले, त्यांमध्यें ह्या बर्क घराण्यांतील पुरुषांचा त्यांना अति उपयोग झाला. ह्या घराण्यांतील विल्यम फिट्झाडेल्म नांवाच्या पुरुषास दुसऱ्या हेन्रीनें ऐर्लंडांतील मूळच्या राजांकडून आपलें स्वामित्व कबूल करविण्यासाठीं तेथें कामगिरीवर पाठविलें होतें; व ह्याजपासून पुढें कित्येक रणशूर घराण्यांची उत्पत्ति झाली. हीं घराणीं कैक वेळां दुर्दैवाच्या फेऱ्यांत सांपडून ह्यांच्या जमिनी वगैरे जाऊन अगदीं निकृष्टावस्थेस पोहोंचलीं; तथापि तीं त्यांतून निभावलीं. क्लान्रिकार्डी येथील अर्ल व **मार्किस**, आणि मेयो येथील अर्ल हीं दोन त्या घराण्यांपैकीं सांप्रतचीं अति प्रसिद्ध घराणीं होत.

ऐर्लंडांतील इतर नार्मन बडे† लोकांप्रमाणेंच ह्या बर्क

---

* इंग्लंडचा राजा दुसरा हेन्री ह्यानें ११५४–११८९ पर्यंत राज्य केलें. त्याच्या कारकीर्दींतील महत्त्वाच्या गोष्टींपैकींच ऐर्लंडवरील स्वारी ही एक होय. ही स्वारी ११७१ त झाली. ह्या स्वारीशीं ज्यांचा संबंध होता त्यांपैकीं रिचर्ड ली क्लेअर म्हणजे अर्ल ऑफ् पेंब्रोक हे एक असून त्यांना 'स्ट्रांगबो' असें टोपण नांव होतें. ( भा. क. )

† इंग्लंडांतील बडे लोकांमध्यें पांच पदव्या आहेत; त्यांची योग्यता पुढील क्रमानें आहे:—ड्यूक; मार्किस; अर्ल; वैकौंट आणि बॅरन. खुद्द राजपुत्र व राजकन्या, आणि इंग्लंड व ऐर्लंड मिळून

घराण्याची स्थिति झाली. म्हणजे ज्या अडाणी लोकांस ह्यांनीं जिंकिलें, त्यांच्याच आडदांडपणाच्या रितीभाती ह्यांना हळू हळू लागल्या. कनाटचा वयातीत राजा जो रेड–हॅन्ड ह्याच्या जातींतील एका स्त्रीशीं ह्या घराण्यांतील एका पुरुषानें लग्नसंबंध केला. तेव्हांपासून ऐर्लंडांतील पद्धती-प्रमाणें ह्या घराण्याचें आडनांव बर्क* असें पडलें; व हेंच अद्यापि चालत आहे. ह्या घराण्यांतील पुरुषांनीं काबीज केलेल्या मुलुखाला ते जणू काय आपला जन्मदेशच मानूं लागले. ह्यामुळें इतःपर इंग्लिशांनीं ऐर्लंडवर केलेल्या प्रत्येक स्वा-रींत, हें बर्क घराणें ह्मणजे ऐर्लंडांतलि फार दिवसांच्या केल्टिक† घराण्याप्रमाणेंच एक पक्कें ऐरिश घराणें आहे, असें त्यांना आढळून आलें; ह्या दोहोंत काडीमात्र फरक दिसला नाहीं. ह्या घराण्याची पूर्वपीठिका सांगत बसण्याची कांहीं तरी हौस वाटल्यावरून ही वरील हकीगत वाच-कांस येथें सांगितलेली नाहीं. तर बर्क घराण्यापैकीं ज्या पुरुषाचें चरित्र येथें लिहावयाचें आहे, त्याच्या स्वभावास लागलेलें वळण बऱ्याच अंशीं ह्या घराण्याच्या प्राचीन

---

असलेले ४ आर्च बिशप ( मुख्य धर्माध्यक्ष ) मात्र ड्यूकांहून वरिष्ठ पदवीचे होत. ह्या सर्व बडे लोकांचा समावेश हौस ऑफ् लॉर्डमध्यें होतो. ( भा. क. )

*ह्याचें इंग्लिशमध्यें स्पेलिंग करण्याची पद्धति Bourk, Burke किंवा Burgh अशी आहे.

† केल्ट म्हणून प्राचीन काळच्या जातींपैकीं एक जात आहे. ह्या जातीच्या लोकांची वस्ती पूर्वी मध्य आणि पश्चिम युरोप खंडाच्या बऱ्याच भागांत होती; आणि ऐर्लंड, वेल्स, स्काटलंडांतील पहाडी मुलूख व फ्रान्सचा उत्तर किनारा; ह्या ठिकाणीं आज मित्तीस ह्या लोकांचे वंशज राहतात. ( भा. क. )

इतिहासाला अनुसरून असल्यामुळें ह्या घराण्याचा पूर्ववृत्तान्त वर दिला आहे. वास्तविक पाहतां आपल्या चरित्रनायकाचें घराणें फार पुरातन काळचें होय. परंतु त्यांचा स्वभाव असा होता कीं, आपण थोर कुळांत उत्पन्न झालों आहों, अशा हलकट प्रकारचा अभिमान त्यांना कधीं शिवला नाहीं. तथापि आपले वाडवडील ज्या लोकांमध्यें बराच काळ राहून त्यांच्या सुखदुःखाचे वांटेकरी झाले होते, त्या लोकांविषयीं अति विलक्षण प्रेम मात्र, आपल्या प्राचीन कुळाचा विचार मनांत आला असतां, त्यांचे अंतःकरणांत जागृत होत असे. ऐरिश लोकांविषयींच्या ह्या प्रेमाला हे ऐन उमेदींत असतां तर एक दोनदां फार जोराची उकळी फुटली होती. तथापि सामान्यतः ते हें प्रेम मुकाट्यानेंच दाखवीत असत; मात्र हें अंतकाळपर्यंत जागृत होतें. ह्या प्रेमाचा लय यांच्या अंतकाळींच झाला.

कामन्स लोकांच्या ( प्रतिनिधींच्या ) सभेंत त्यांनीं एके प्रसंगीं म्हटलें आहे कीं, ‘ ज्या घराण्यांतील पुरुष ऐरिश लोकांच्या सुखदुःखाचे वांटेकरी झाले, त्यांच्या वंशांत मी जन्मलों आहें. ’ इंग्लंडांतील आपली सर्व कारकीर्द त्यांनीं ह्या लोकांच्या कल्याणार्थच लाविली. पार्लमेंटांत असतां त्यांनीं हुद्द्याची एक जागा मात्र पतकरिली; ती ऐर्लंडसंबंधी चीफ सेक्रेटरीची होय. ही जागा त्यांनीं तीन वेळां पतकरिली. पार्लमेंट सभेंत ऐरिश प्रश्नांशिवाय इतर प्रश्नांवर ते फारसें भाषण करीत नसत; ह्यामुळें खुद्द इंग्लंडांतील लोकांना ह्यांचें नांव विशेष माहितही नव्हतें. हिंदुस्तानांत असतां येथील

राज्यकारभारासंबंधानें त्यांना नेहमीं मोठी काळजी असे, हें प्रसिद्धच आहे. तथापि त्या मुदतींत त्यांनीं लिहिलेल्या पत्रांतून मध्येंच ऐर्लंडांतील आपल्या जन्मभूमीच्या दर्शनाची उत्कट इच्छा त्यांनीं प्रदर्शित केलेली आढळते. चिलियनवाला येथील समरभूमीवर जे इंग्लिश लोक पडले, त्या सर्वांना तेथेंच मूठमाती देऊन त्यांच्या नांवांचीं थडगीं वगैरे न करितां त्यांनीं तेथें एक ऐरिश क्रॉस† मात्र लाविला. त्यांनीं आपल्या मृत्युपत्रांतही अशीच विनंति केली होती कीं, आपलें प्रेत ऐर्लंडास न्यावें; आणि आपल्याच इस्टेटीमधील एका लहानशा स्मशानभूमींत आपणांस पुरून आपलें थडगें ओळखितां येण्यासाठीं त्यावर एक ऐरिश क्रॉस मात्र लावावा.

तेराव्या शतकापासून सतराव्या शतकापर्यंत ऐर्लंडांतील निरनिराळ्या घराण्यांत आपापसांत तंटेबखेडे सुरू असून सरकाराविरुद्ध बंडेंही सुरू होतीं. ह्या तंट्याबखेड्यांत व बंडांत बर्क घराण्यांतील मंडळींनींही बरीच धामधूम उडविली. तथापि आठराव्या शतकांत ह्या निकृष्टावस्थेंतून बाहेर पडून ह्या घराण्यांतील पुरुष मोठे तरतरीत धर्माधिकारी‡ व मुत्सद्दी बनले. किल आणि मनीक्रोअर

† **क्रॉस** ही येशू ख्रिस्ताच्या मृत्यूची निशाणी असून ह्या टिपेच्या आरंभीं ज्या प्रकारचें चिन्ह आहे त्या आकाराचीच प्रायः ती असते; व ह्यामुळेंच आतां ही सर्व ख्रिस्ती धर्माचीही खूण झालेली आहे. लाटिन क्रॉस; ग्रीक क्रॉस; डबल क्रॉस; ट्रिपल क्रॉस; इजिप्शन क्रॉस; इत्यादि ह्याचे प्रकार असून त्यांतीलच ऐरिश क्रॉस हा एक प्रकार आहे. ( भा. क. )

‡ ख्रिस्ती धर्मांतील मुख्य मुख्य धर्माधिकाऱ्यांच्या योग्यतेचा क्रम पुढें दिल्याप्रमाणें आहेः—आर्च बिशप; बिशप; आर्च डीकन; डीकन. ( भा. क. )

येथील जॉन बर्क नांवाचे गृहस्थ ऐर्लंडच्या वतीनें पार्लेमेंटांत एक सभासद होते; ते मोठे होतकरू असून विलक्षण मेहनती होते. ह्यांना १७७६ त बॅरन नास ही पदवी मिळाली; आणि शेवटीं १७८५ त अर्ल ऑफ् मेयो ही पदवी मिळाली. ह्यानंतर तिसरे अर्ल ऑफ् मेयो हे ट्यूअम येथें आर्चबिशपच्या हुद्द्यावर होते, व ख्रिस्ती धर्माधिकाऱ्यांच्या जागा मिळविण्याकडे ह्या घराण्याच्या कनिष्ठ शाखांतील मंडळींचा कल ह्यांनींच वळविला. अशा धर्माधिकाऱ्यांपैकीं वाटरफर्डचे बिशप आणि ऑसरीचे डीन यांनीं चांगला नांवलौकिक संपादिला. चौथे अर्ल ऑफ् मेयो यांचें विस्मरण लोकांस न होण्याचा संभव विशेष आहे; कारण प्रेड* कवीच्या काव्यांत ह्यांचा उल्लेख आहे. पांचवे अर्ल हे प्रस्तुत चरित्राचे विषय जे लॉर्ड मेयो यांचे वडील होत.

डब्लिन शहरापासून सुमारें २२ मैलांवर मीथ नांवाचें गांव असून तेथील एका साध्या खेडवळ घरांत लॉर्ड मेयो यांचें बालपण गेलें. ह्या घराचें नांव हेज† असें होतें. चौथे अर्ल ऑफ् मेयो यांचे दुसरे चिरंजीव रिचर्ड बर्क हे वाटरफर्ड व लिस्मोर येथील बिशप होते. ह्यांच्या पत्नीचें नांव मेरी असून ती डब्लिनचे आर्चबिशप राबर्ट फौलर यांची

---

* ह्या कवीचा जन्म १८०२; मृत्यु १८३९. ( भा. क. )

† इंग्लंडांतील घरांना निरनिराळ्या प्रकारचीं नांवें दिलेलीं असतात. मुंबई, महाबळेश्वर, पुणें वगैरे ठिकाणीं युरोपियन लोकांच्या बंगल्यांना नांवें असलेलीं आढळून येतात. ह्याचेंच अनुकरण आपल्या देशांतही होत असून, दर्यामहाल, संगमाश्रम, आनंदाश्रम, शांतिभुवन इत्यादि नांवें आपल्याकडे प्रचारांत आलीं आहेत. ( भा. क. )

मुलगी होय. हीं उभयतां एकोणिसाव्या शतकाच्या आरंभीं आरंभीं मीथ येथील हेज घरांत राहत असत. यांच्या वडील मुलाचें नांव रॉबर्ट असून त्यानें अर्ल ऑफ् रॉडेन यांची नात ऍन चार्लट जोसेलिन हिशीं लग्न केलें. हा रॉबर्टच पुढें पांचवा अर्ल ऑफ् मेयो झाला. हें लग्न लागल्यानंतर बिशप रिचर्ड बर्क हे आपल्या हुद्याच्या जागीं म्हणजे वाटरफर्ड येथें राहण्यास गेले; आणि आपल्या कुटुंबाचें राहण्याचें घर जें हेज तें ह्या नवीन जोडप्यास त्यांनीं राहण्यास दिलें. ह्या जोडप्याच्या वडील मुलाचें नांवही रिचर्ड बर्क असून त्याचेंच चरित्र ह्यापुढें द्यावयाचें आहे.

रॉबर्ट बर्क हे आपल्या पत्नीसह चाळीस वर्षांहून जास्त वर्षें हेज येथें राहत होते. ह्यांना तेथें आठ* मुलें झालीं. ह्या मुलांचें संवर्धन त्यांनीं सौम्य रीतीनें धर्मसमजुतींना अनुसरून केलें. तसेंच कुटुंबांतील कनिष्ठ† मुलाच्या मुलाला वडिलोपार्जित संपत्तीचा फारसा वाटा मिळत नाहीं; ह्मणून तशा बेतानेंच ह्यांनीं आपल्या मुलांबाळांना शिक्षण दिलें. १८४९ त रॉबर्ट बर्क यांना अर्लची पदवी मिळाली; ह्मणजे हे पांचवे अर्ल झाले; व पार्लमेंटांत हौस ऑफ् लॉर्ड्सचे सभासद झाले. परंतु रिचर्ड आणि त्यांचीं इतर

---

* ह्यांना वस्तुतः दहा मुलें झालीं. परंतु त्यांतील एक मुलगी अगदीं बालपणांत वारली; आणि एक मुलगाही वयांत येण्यापूर्वींच वारला.

† इंग्लंडांतील कुटुंबव्यवस्थेप्रमाणें वडिलोपार्जित सर्व संपत्ति वडील मुलास मिळावयाची. इतर मुलास बापानें स्वतः संपादिलेल्या संपत्तीचा मर्जीस येईल तो हिस्सा द्यावा. ह्यामुळें वडील मुलाशिवाय इतरांस आपापल्या उदरनिर्वाहासाठीं उद्योगधंदा करावा लागतो. (भा. क.)

वडील मुलें ह्या काळाच्या बऱ्याच पूर्वी आपापला चरितार्थ चालवूं लागलीं होतीं. हेज घरीं राहत असतां तेथील परिस्थितीच्या अनुरोधानेंच ह्या मुलांच्या स्वभावांस वळण लागून त्यांचा पुढील सर्व आयुष्यक्रमही त्या परिस्थितीला अनुसरून बनला होता; आणि हेज हेंच आपलें घर, असें पुढें सर्वकाळ ते मानीत असत.

हेज घरीं हें कुटुंब नांदत असतां तेथील प्राप्तीमध्यें ह्या मुलांना सार्वजनिक शाळांतून शिक्षण देण्याचा खर्च भागण्याजोगा नव्हता. ह्मणून ह्यांना गृहशिक्षण देण्यासच त्यांच्या वडिलांनीं प्रारंभ केला. तरुणपणीं रॉबर्ट बर्क हे दोन वर्षें आक्सफर्ड येथील विश्वविद्यालयांत शिकत होते खरे, तथापि ह्यांचें स्वतःचें शिक्षण प्रायः घरगुतीच असून ख्रिस्तीधर्मविषयक होतें. साठ वर्षांपूर्वी ऐर्लंडांतील बिशप, आर्चबिशप, वगैरे धर्माधिकाऱ्यांच्या घरीं मिळणाऱ्या शिक्षणाचें स्वरूप ह्यावरून ध्यानांत येईल. ह्यांच्या लग्नसंबंधामुळें ख्रिस्ती धर्मांतील त्या काळच्या पुढाऱ्यांचा ह्यांना निकट सहवास घडला; तेणेंकरून धर्मविषयक विचारांकडे असलेला ह्यांचा कल विशेष दृढ झाला. सारांश, ह्या साध्या रीतीनें राहणाऱ्या कुटुंबाच्या आयुष्यक्रमांत पति व पत्नी ह्या उभयतांकडेही शिक्षकाचें काम असल्यामुळें त्यांना विशेष महत्त्व प्राप्त झालें. तसेंच राबर्ट बर्क यांना कांहीं नियमित काळीं आसाइझेससाठीं,* अथवा आपल्या

* इंग्लंड व वेल्स ह्यांमधील परगण्यांतील फौजदारी आणि इतर कित्येक खटल्यांचा निकाल करण्यासाठीं कांहीं नियमित मुदतीनें सेशन कोर्टें निरनिराळ्या गांवीं भरत असतात, व त्या खटल्यांचा निकाल जूरीच्या ( पंचांच्या ) सल्ल्यानें होत असतो.

परगण्यासंबंधीं इतर कामकाजासाठीं बाहेर गांवीं जावें लागे; ह्या दोन गोष्टींखेरीज ह्या कुटुंबाच्या कालक्रमांत इतर म्हणण्यासारख्या गोष्टी मुळींच घडत नसत. ह्यामुळें हल्लीं कोणता महिना सुरू आहे, हेंही चटकन ध्यानांत येण्यास ह्या कुटुंबास केव्हां केव्हां साधन नसे. वस्तुतः बालपणांत मुलांच्या मनावर घरगुती गोष्टींशिवाय इतर कित्येक बाह्य गोष्टींचाही परिणाम नेहमीं घडत असतो. परंतु हेज घरीं नांदणाऱ्या ह्या तरुण मुलांचें बालपण अगदीं एकमार्गी होतें; बाह्य गोष्टींचा परिणाम त्यांचे मनावर कधींच घडत नव्हता, असें म्हटलें तरी चालेल. ह्यामुळें ह्या तरुण मंडळीचा परस्परांकडे ओढा विलक्षण असे.

ख्रिस्ती धर्मांतील प्राटेस्टंट मताचे धर्माधिकारी हेज घरीं एकत्र जमत; म्हणून त्यासंबंधानें हें घर प्रसिद्ध होतें. त्या काळच्या ख्रिस्ती धर्मोपदेशकांच्या चरित्रांतून ह्या घराला बरेंच महत्त्व आलेलें आहे. एकदा एक धर्माधिकारी हेज घरीं येत असतां त्यांच्या गाडीच्या घोड्यांचा रस्ता चुकून ती आडरानांत जंगलांत गुंतल्यामुळें रात्रीं बऱ्याच उशिरां ते तेथें पोहोंचले. तरी देखील तेवढ्या रात्रीं तेथें त्यांचें मनःपूर्वक आदरातिथ्य झालें; व त्याचें त्यांनीं मोठें मनोवेधक वर्णन केलेलें आहे. ते पोहोंचले तेव्हां हेज घरचीं मुलेंबाळें आपल्या खोलींत निजावयास गेलीं होतीं. तरी त्यांची ती छोटेखानी पलटण 'शाली व झगे गुरफटून घेऊन' आपल्या घरीं आलेल्या पाहु-

---

अशा प्रकारच्या कोर्टांना आसाइझेस ( Assizes ) म्हणतात. ( भा. क. )

ण्यास सामोरें जाऊन त्यांचा सन्मान करण्यास कशी पटापट बाहेर पडली, ह्याचें त्यांनीं वर्णन केलें आहे. तसेंच 'प्राटेस्टंट मताच्या छळ चाललेल्या लोकांस आधार मिळावा म्हणून ह्या घराच्या आवारांत स्थापिलेल्या एका' आश्रमाचा उल्लेखही, ह्या वर्णनांत आलाच आहे.

हेज घरीं नांदणाऱ्या ह्या कुटुंबाची एकंदर राहाणी मोठी विचारानें ठरविलेली होती. तथापि आपल्या मुलांबाळांना घरकोंबडें करून न ठेवितां त्यांना मोकळ्या हवेंत खेळण्यास वगैरे नेण्याची त्यांच्या वडिलांना मोठी हौस असे. ह्यामुळें तशा राहाणीपासून त्रास न होतां उलट मुलांना उल्हास वाटे. चार मंडळी जमून पायीं फिरावयास निघणें, घोड्यांवरून लांबचा फेरफटका करणें, चेंडूफळी खेळणें, बॉइन नदीमध्यें पोहण्याच्या शर्यती लावणें आणि अशाच प्रकारच्या हरएक शारीरिक खेळांत ह्या पितापुत्रांचें सारखेंच आंग असे. इंग्रज लोकांमध्यें अकृत्रिम स्नेहभाव उत्पन्न होण्यालाही कारण हे अशा प्रकारचे खेळच होत. हेज घरीं ह्या मुलांना मानसिक शिक्षण मिळावयाचें तें आईकडून मिळे. तसेंच ह्यांना निर्दोष आचरणाचा कित्ता घरच्या घरींच वडिलांचा वळविण्यास मिळाला; व आपल्या स्थितीस योग्य असे उद्योगधंदेही पुढें मिळविण्याचें सामर्थ्य यांच्या आंगीं वडिलांमुळेंच आलें. ते प्रामाणिक असून त्यांचे विचार अत्यंत सौम्य असत; आणि अशा माणसानें अति मित्रत्वानें ह्या मुलांस वाढविल्यामुळें त्यांस उत्तम वळण

लागून योग्य प्रकारचे उद्योगधंदे मिळविण्याचें सामर्थ्य त्यांच्या आंगीं आलें; हें साहजिकच होय.

रॉबर्ट बर्क ह्यांच्या संबंधानें त्यांच्या एका मुलानें असे उद्गार काढिले आहेत:—' माझ्या वडिलांनीं आम्हां सर्वांस अशा रीतीनें वाढविलें कीं, ह्या जगांत आपापल्या चरितार्थाचें ओझें आपापल्यावरच पडावयाचें, हा विचार आमच्या मनांत नेहमीं असे. असें होतें तरी आम्हां प्रत्येकास वाटे कीं, आम्हांसाठीं थोडेंबहुत त्यांना करितां येण्यासारखें असेल तें केल्याशिवाय ते राहणार नाहींत; मग त्या कामीं त्यांचें सर्व द्रव्य खर्च झालें तरी चिंता नाहीं. आमच्या ध्यानीं मनीं नसतांही शेंकडों किरकोळ गोष्टींत देखील त्यांचें औदार्य एकदम दृष्टोत्पत्तीस येई. हिंदुस्तानांत ५७ सालचें बंड सुरू असतां आपलें सैन्य त्या पूर्वेकडील प्रदेशांत त्या वेळीं काय कामांत गुंतलें होतें, ह्या विषयावर घरच्या व शेजारपाजारच्या लोकांस मीं एक लहानसें व्याख्यान दिलें. ह्या व्याख्यानांत वाखाणण्यासारखा भाग मुळींच नव्हता, असें म्हणण्यास कांहीं हरकत नाहीं. तथापि मला असें स्मरतें कीं, माझे वडील दुसऱ्या दिवशीं अगदीं सकाळींच माझ्या खोलींत आले; आणि डोळ्यांत आनंदाश्रु आणून मला म्हणाले कीं, तुझ्या व्याख्यानाबद्दल मला अभिमान वाटतो; व मी जरी मोठा श्रीमान् नाहीं तरी एवढी वीस पौंडांची नोट त्वां घ्यावी.'

आईच्या संबंधानें ह्याच मुलानें पुढें लिहिल्याप्रमाणें उल्लेख केला आहे:—' आम्हां मुलांवरील तिचें अकृत्रिम प्रेम, विलक्षण व्यवहारज्ञान, हरएक निंद्य किंवा अप्रयो-

जक गोष्टीविषयीं तिरस्कार आणि आपल्या मुलांबाळांबद्दल आपण प्रत्यहीं ईश्वराची जी प्रार्थना करितों ती सफल होऊन त्यांजपासून आपणास जन्मवर सुख व समाधान प्राप्त व्हावयाचेंच असा पूर्ण भरंवसा; ह्या माझ्या आईच्या गुणांचें, त्या दिवसांचें स्मरण झालें असतां, मला अति आश्चर्य वाटतें. '

माझ्या वडिलांच्या लग्नसंबंधानंतर १८२० पासून १८४९ पर्यंत त्यांजवर आलेल्या सर्व संकटांतून ते पार पडले; ह्याचें श्रेय वास्तविक पहातां माझ्या आईलाच आहे. तिला रिकामपण कसें तें ठाऊकच नव्हतें; लिहिणें,* हिशेब ठेवणें किंवा इतर काम करणें, हें तिचें नेहमीं सुरू असे. तिला स्वतःला वाचावयास वेळ मुळींच सांपडत नसे. तथापि आम्हांस पुस्तकें वाचण्याची गोडी लागावी, म्हणून ती पराकाष्ठा करी. कामधंदा करणें, हेंच आपलें जगांतील इतिकर्तव्य, असें ती म्हणत असे. आजाऱ्यांच्या झोंपड्यांतून जाऊन त्यांची शुश्रूषा करणें, गरीबगुरिबांस कपडालत्ता वांटण्यासाठीं मंडळ्या जमत तेथें जाणें, आणि अशाच प्रकारच्या बारीकसारीक शेकडों धर्मकृत्यांत ती आपला बहुतेक वेळ घालवीत असे. कोणाही ऐरिश गृहस्थाला योग्य रीतीनें आपलें कर्तव्य बजावावयाचें म्हटलें म्हणजे त्याच्या पत्नीच्या वांट्यास अशा प्रकारचीं शेकडों धर्मकृत्यें येतातच. माझ्या आईपेक्षां अधिक कष्टाळू बा-

* इंग्लंडांतील ह्या गृहस्थितीची आपल्या देशांतील गृहस्थितीशीं तुलना केली असतां कित्येक बाबतींत आपणांस उपदेश घेतां येण्यासारखा असून तसा आपण हळू हळू घेऊंही लागलों आहों, असें ध्यानीं येईल. ( भा. क. )

यको मला कधीं आढळली नाहीं. आपल्या औषधाच्या खोलीच्या दारांत उभें राहून गरिबांस औषधें वांटण्याकडे व प्रसंगोपात्त गरम कपडे वांटण्याकडे आठवड्यांतील दोन दिवस तिनें नेमून दिले होते. तसेंच आठवड्यांतील कित्येक दिवस गाडींतून किंवा पायीं फिरावयास जाण्यास तिला फुरसत मिळत नसे; कारण तशी संधी येण्यापूर्वींच संध्याकाळच्या भोजनाची घांट वाजे; आणि हवामान वाईट असेल तेव्हां तर कित्येक आठवडेही तिला अशी संधी मिळत नसे. माझ्या बंधूंनीं ( लार्ड मेयो यांनीं ) इंग्लंडांत व हिंदुस्तानांत जीं एकंदर सरकारी कामकाजें केलीं, त्यांत त्यांच्या आंगीं कित्येक विशेष गुण मला दिसून आले. त्यांपैकींच एक असा होता कीं, आपलीं किरकोळ कर्तव्यकर्में देखील अगदीं मनोभावानें बजावावयाचीं. हा गुण त्यांनीं आमच्या आईपासूनच संपादिला, असें वारंवार माझ्या मनांत येई. '

हेज घर हें उघड्यावर असून तेथील हवा खुली होती. ह्या घरीं राहणाऱ्या ह्या जोमदार मंडळीमध्यें ह्या मातेच्या रितीभाती अति सौम्य व सभ्य तऱ्हेच्या असल्याविषयीं वरच्या व इतर कागदपत्रांतून प्रसिद्धी आहे. तिच्या सहवासास असलेल्या ह्या इतर मंडळीचा आयुष्यक्रम विशेष उमेदीचा असे; आणि आपल्या आईच्या ठिकाणीं ऐहिक गोष्टींविषयीं आपल्याहून उल्हास कमी असून धर्मसंबंधीं विषयांकडे तिचें लक्ष विशेष आहे; हें ह्या मंडळीच्या ध्यानीं आलें होतें. यद्यपि आपणांस प्रत्यक्ष ज्ञान नाहीं, तथापि ह्या मृत्युलोकापेक्षां अधिक श्रेष्ठ व मनोरम असा एक लोक

आहेच. परंतु बालपणीं मुलांची वृत्ति बहुतेक पशुवत् असल्यामुळें हा विचार तेव्हां त्यांच्या स्वप्नींही येत नाहीं. तथापि लॉर्ड मेयो ह्यांच्या आईनें आपल्या मुलांच्या मनांत ह्या गोष्टीविषयीं प्रत्यक्ष ज्ञान भरवून दिलें. ह्या मुलांत लार्ड मेयो हे वडील असल्यामुळें त्यांना आपल्या आईचें स्मरण वरचेवर होऊन ते सद्गदित होत. ते हेज येथील सर्व प्रकारच्या खेळांत व खोड्यांत अग्रगण्य असत. ह्यामुळें त्यांच्या वडिलांना मोकळ्या हवेंतील खेळांची असलेली आवड ह्यांनाही असल्याचें यांच्या बालपणीं व्यक्त होत असे खरें; तथापि ऐहिक गोष्टींविषयीं यांच्या आईच्या स्वभावांत जें विशेष औदासीन्य होतें, तसें औदासीन्यही लहानपणीं यांच्या आंगीं दृष्टोत्पत्तीस येई. हे बारा वर्षांचे होण्यापूर्वींच ह्यांनीं धर्मोपदेशांचा लिहिलेला एक लहानसा संग्रह अद्यापि आहे. धर्मविषयक समजुतींचा ज्याच्या मनावर पूर्ण ठसा उमटलेला आहे, अशा ह्या कल्पक मुलाचे उपजत अंकूर ह्या उपदेशांत दिसून येऊन मनाला पाझर फुटतो. हे उपदेशपर लेख मुख्यत्वें धर्मविषयक वचनांच्या आधारांवर लिहिलेले आहेत; व हीं वचनें, ज्यांचें मन धर्मप्रकरणीं गुंतलेलें आहे, त्यांना फार पसंत पडणारीं आहेत. मोक्ष, मृत्युलोकींची असारता, आणि परलोकींचें वैभव किंवा यातना; अशा प्रकारच्या विषयांवर हा उपदेश असून तो अति मनोभावानें केलेला आहे.

यांच्या ह्या विचारांचा ओघ लवकरच इतिहासाकडे वळून त्याची गोडी त्यांना लागूं लागली; व बाराव्या वर्षींच ह्यांनीं एक लहानसें पुस्तक लिहिलें. तें पुस्तक त्यांच्या त्या

पोरवयाला साजेल अशा असंबद्ध रीतीनेंच लिहिलेलें आहे. त्याचें नांव त्यांनीं 'पवित्र* शास्त्रास एच् येथील आर. एस्. बी., याची प्रस्तावना' असें ठेविलें; व त्याजवर "पृथ्वीवरील माणसांस अनेक भाषा आहेत, परंतु स्वर्ग लोकीं एकच आहे" अशा अर्थाची लाटिन भाषेंतील म्हण होती. ह्या छोटेखानी पुस्तकांत जुन्या† करारांतील प्रत्येक पुस्तकांतील स्तोत्रांपर्यंतच्या भागाला इतिहासदृष्ट्या उपोद्घात यांनीं जोडिला आहे; व त्यांतील विषयांची व ग्रंथकारांची माहिती त्यांनीं दिली आहे. ज्या मंडळीमध्यें हे राहत असत ते प्राटेस्टंट मताचे कट्टे अनुयायी असल्याचें यांच्या बालपणच्या पत्रांवरून ध्वनित होतें. पंधराव्या वर्षीं त्यांनीं आपल्या वडिलांस असें लिहिलें आहे:- 'अगदीं मरणोन्मुख झालेल्या येथील बिचाऱ्या एका गरीब मनुष्याची नुकतीच क्याथलिक पंथांतून सुटका झाली. लॉर्ड राडेन ( हे त्यांचे नातलग असून यांच्या घरींच ते ह्या वेळीं राहत होते ) यांना जिनीवा येथील एम्. सीझर मालन यांजकडून कित्येक पत्रें आलीं असून त्यांतील मजकूर अति उद्वेगजनक आहे. युरोपांतील इतर राष्ट्रांतून क्याथलिक मताचा प्रसार कसा वाढत चालला आहे; ह्याची हकीगत त्यांनीं ह्या पत्रांतून दिली असून ती फार भीतिजनक आहे.'

* 'A Preface to the Holy Bible, by R. S. B. of H.–' ( Richard Southwell Bourke of Hayse. )

† ख्रिस्ती धर्मशास्त्राचे **जुना करार** व **नवा करार** असे दोन भाग आहेत. **जुना करार** हा मूळचा हिब्रू ( इस्रायल ) भाषेंत लिहिलेला असून **नवा करार** ग्रीक भाषेंत लिहिलेला आहे. (भा. क )

प्रौढपणीं लॉर्ड मेयो यांच्या मनाची ही स्थिति बदलून अशा गोष्टींविषयीं त्यांच्या आंगीं अवश्य ती सहिष्णुता आली. ह्यामुळें वर दर्शविलेल्या प्रकारचे उद्गार त्यांच्या मोठेपणच्या वर्तनाशीं अति विपरीत भासतात. तथापि ह्यांवरून इतकें निष्पन्न होतें कीं, ज्या लोकांशीं त्यांचा संबंध जडे, त्यां-जबद्दल सहानुभूति त्यांना तेव्हांच उत्पन्न होई. त्यांच्या आंगीं अशी सहानुभूति असल्यामुळेंच मोठेपणीं आपल्या देश-बांधवांचें प्रेम त्यांना संपादितां आलें; आणि हिंदुस्तानांतील राजेरजवाड्यांच्या व भिन्न भिन्न जातींच्या लोकांच्या मनावर त्यांना इतकी छाप बसवितां आली, तीही ह्या कळकळीमुळेंच.

ह्यांच्या पत्रांपैकीं आणखी एक उतारा देऊन हेज ये-थील यांच्या आयुष्यक्रमाची हकीगत संपविली पाहिजे. हें पत्र त्यांनीं आपल्या सदतीसाव्या वाढदिवशीं आपल्या आईस लिहिलेलें आहे. ह्या वेळीं त्यांची ऐर्लंडच्या चीफ सेक्रेटरीच्या जागीं दुसऱ्यानें नेमणूक झालेली होती. तसेंच त्या काळीं ते फार फिकीरींत होते. कारण तेव्हां फीनिक्स*

---

* ग्रेट ब्रिटन व ऐर्लंद मिळून एक संयुक्त राज्य आहे; परंतु हा संबंध ऐरिश लोकांतील एका पक्षास पसंत नसून हा संबंध नष्ट व्हावा म्हणून त्या पक्षाचे प्रयत्न तेव्हां सुरू होते; व १८४३ त ते शिखरास पोहोंचले. इंग्लंडशीं असलेला आपला संबंध तुटावा म्हणून त्या काळीं ऐर्लंडांत ठिकठिकाणीं मोठमोठ्या सभा भरल्या; व ह्या कामासाठीं रोमन क्याथलिक मताच्या देवळांतून ४८००० पौंड वर्गणी जमा झाली. ह्या चळवळीचे पुढारी ओ. कोनेल नांवाचे ऐरिश गृहस्थ असून ते पार्लमेंटांत सभासद होते. अखेरीस त्यांना व इतर ८ पुढाऱ्यांना पकडून त्यांजवर सरकारानें खटले केले व त्यांस एक एक वर्षाची कैदेची शिक्षा झाली. तथापि त्यांना लवकरच सोडून

पार्कसंबंधीं चळवळ सुरू असून पार्लमेंटामध्यें ह्यांच्या पक्षाचें सर्वस्व नाहींसें होण्याचा काळ समीप येऊन ठेपला होता. सदरहू पत्र येणेंप्रमाणें:—

'माझ्या परमप्रिय आई—तूं मोठ्या ममतेनें लिहिलेल्या पत्राबद्दल व त्यांतील माझ्या हिताच्या एकंदर उपदेशाबद्दल मी तुझा अति आभारी आहें. माझ्या आयुष्यक्रमांत मला तुजपासून अनेक सुखें प्राप्त झालेलीं आहेत; व माझ्या मनांतील विचार जरी उघड रीतीनें मला स्पष्ट करून दाखवितां आले नाहींत, तरी त्या सुखांसंबंधानें मी अंतःकरणांत तुझा अति आभारी आहें. आपलें सर्वांचें आतां उतार वय होत जाणार, आणि आपलें सर्वांचें लक्ष अखेरच्या विश्रांतीसाठीं आपल्या घराकडे लागत आहे; असें मला वाटतें. मी वृद्धावस्थेस पोहोंचेपर्यंत जगेन, असें मानिलें तरी माझें किमानपक्ष अर्धें अधिक आयुष्य होऊन गेलें आहे. आणि वृद्धावस्थेपर्यंत जगण्याची पाळी येण्यास किती तरी विघ्नें दिसत आहेत! आज सदतीस वर्षांपूर्वीं मी अगदीं तान्हें मूल होतों. आजपासून ३७ वर्षांनीं शरीरदृष्ट्या मी किती तरी लहान होईन! ( मरणानंतर देहाचा नाश झाल्यामुळें ३७ वर्षांपूर्वीं अगदीं लहान मूल असतांना जो देह होता तोही ३७ वर्षांनंतर नाहींसा होईल; असा आशय. ) तथापि दुसऱ्या अर्थीं पारमार्थिकदृष्ट्या माझा आत्मा तेव्हां विशेष उत्तम स्थितींत असण्याचा संभव आहे!'

१८३८ त रिचर्ड बर्क हे १६ वर्षांचे झाले, तेव्हां

---

देण्यांत आलें. ओ. कोनेल हे १८४७ त जिनोआ येथें मरण पावले. ह्या सभा राजद्रोही असून त्या ज्या जागीं भरत त्या जागेचें नांव 'फीनिक्सपार्क' असें होतें. ( भा. क. )

हेज घरीं राहणारें हें कुटुंब दोन वर्षें परदेशीं राहण्यास गेलें. पहिलें वर्ष ह्या मंडळीनें पारिस शहरीं घालविलें. मात्र ह्या मुलांवर देखरेख ठेवून त्यांस शिक्षण देणारी यांची आई ही नेहमींप्रमाणें ह्या मुदतींत हेज येथें घरींच राहिली होती. मानेवर खडा घेऊन शिकण्याचा प्रसंग ह्या मुलांना हा प्रथमच होय. ह्यांच्या शिक्षणाला आरंभ दररोज सकाळीं ८ वाजतां होई; व प्रथम फ्रेंच भाषेचे शिक्षक यांना ती भाषा शिकवीत; आणि संध्याकाळीं ७ वाजतां नृत्यकला शिकविणाऱ्या शिक्षकाचें काम आटोपलें म्हणजे ह्यांची शाळा सुटली. ह्याप्रमाणें शाळेमध्यें ह्या मुलांना इतके ११ तास घालवावे लागत खरे; तथापि ह्याचा पुरा वचपा ते घराबाहेर खेळण्यांत वगैरे काढीत. आपापल्या आवडीच्या खेळांत नांव मिळविण्यासाठीं झटापट करण्याची ऐरिश मुलांना स्वदेशीं संवयच असते. तेव्हां पारिस शहरांतील शाज् एलिजे नांवाच्या बागांत जाड जाड बूट घालून जाऊन तेथील बारीकसारीक सुशोभित पदार्थांची नासाडी हीं ऐरिश मुलें कशी करीत; ह्याची कल्पना कोणालाही करितां येईल. त्यांनीं बागेत झोंपाळे टांगले; बिळांतून गवत चिणून नासाडी केली; नाजुक रीतीनें वाढविलेल्या झाडांवर सटासट चढले; व फुलांच्या कुंड्या पायांखालीं तुडविल्या. सारांश, ६ महिन्यांनीं आपल्या माणसांसह तें घर सोडून मि. बर्क निघाले; तेव्हां मुलांनीं बागेच्या केलेल्या नासाडीबद्दल ५००* फ्रॅन्क त्यांना मालकाला भरून द्यावे लागले.

---

* हें फ्रान्समधील एक रुप्याचें नाणें असून ह्याची किंमत सुमारें ९½ पेन्स आहे. ( भा. क. )

१८३९ च्या उन्हाळ्यांत ही मंडळी दक्षिणेस स्वित्झर्लंडाकडे वळली; व चार महिने ह्यांना चढणीवरचा प्रवास करावा लागला. पुढील हिंवाळा त्यांनीं फ्लारेन्स शहरीं काढिला. तेथें त्यांस सर्वत्र नवीन सृष्टिच भासली. तेव्हां फ्रेंच आणि इतालियन शिक्षकांचें शिक्षण मुलांना पूर्ववत् सुरूच असून रिचर्ड बर्क यांचें नृत्यगायनासंबंधीं शिक्षणही सुरू होतें. ह्या दोन्ही कलांकडे ह्यांची लहानपणापासूनच प्रवृत्ति दिसून आलेली होती. तथापि आणखी एका प्रकारचें शिक्षण ह्यांना येथें मिळूं लागलें. प्रथम प्रथम यांचे सुटीचे अर्धे दिवस व पुढें पुढें सबंध दिवस ग्यालरींत* जात. आपल्या मुलाचें मन हरएकप्रकारें सुसंस्कृत व्हावें, म्हणून यांची आई नेहमीं तत्पर असे; त्याचप्रमाणें ह्या कामींही पुढाकार तिजकडेच होता. यांच्या बंधूंनीं म्हटलें आहेः "त्या शहरीं सर्वत्र असलेलीं कलाकौशल्याचीं कृत्यें पाहून रिचर्ड बर्क यांना विलक्षण मौज वाटली." कलाकौशल्याच्या भिन्न भिन्न संस्था, तसेंच त्यांतील कारागिरांचीं कामें लक्षपूर्वक पाहून, तीं कोणत्या संस्थांकडून व कारागिरांकडून झालीं असलीं पाहिजेत, हें ओळखण्यास ते शिकले.

चार मंडळींत जाण्यायेण्याचा रिचर्ड बर्क यांचा प्रघातही फ्लारेन्स शहरींच पडला. तेथील उत्तम उत्तम घराण्यांशीं आपल्या मुलाला दळणवळण ठेवितां यावें, अशाविषयीं त्यांच्या आईनें सावधगिरी ठेविली होती. ह्याप्रमाणें

* तसबिरी, पुतळे व कलाकौशल्यासंबंधीं इतर चमत्कारिक पदार्थांचा संग्रह जेथें केला असतो अशीं ठिकाणें. ( भा. क. )

रिचर्ड बर्क व त्यांच्याच पाठचे त्यांचे बंधु तेथील नृत्य-समारंभांस जाऊं लागले. तसेंच हिंवाळ्याचे दिवस सुखा-समाधानानें घालविण्यासाठीं इतर देशांतील स्त्रीपुरुषांचा बराच समाज त्या शहरीं जमला होता; व ती मंडळी तेथें स्नेहभावानें राहत असत. ह्या मंडळीचीं बैठकीचीं कित्येक ठिकाणें होतीं; त्या सर्व ठिकाणीं हे उभयतां बंधु जात असत. त्यांच्या बंधूनें लिहिलें आहे कीं, ‘ इंग्लंडांत परत येण्यापूर्वी ते वयांत आले. ’

ही वरील हकीगत १८४० च्या मे महिन्यांत घडली. रिचर्ड बर्क यांना ह्या वेळीं १९ वें वर्ष सुरू होतें. त्यांना खाजगी खर्चासाठीं जी थोडीशी रक्कम मिळत असे तींतू-नच त्यांनीं शिकारी कामासाठीं एक घोडा ठेविला; परंतु प्रसंगोपात् दुसराही घोडा ते ठेवीत. ह्याप्रमाणें त्यांच्याज-वळ ऐट मारण्यासारखे फारसे घोडे नव्हते खरे. तथापि आपल्या घोड्यांवरून ते भरधांव रपेट करीत असत, व त्या प्रदेशाची ह्यांना माहितीही होती. ह्यामुळें ह्या घोड्यांचा त्यांना पूर्णपणें उपयोग करून घेतां आला. किल्डेअर ये-थील शिबंदीमध्यें १८४० च्या दिसेंबर महिन्यांत यांना कॅप्टनची* जागा मिळाली. ह्याच शिबंदीच्या कर्नलच्या हुद्यावर यांचे चुलत आजे अर्ल ऑफ् मेयो हे होते. १८४१ त हे डब्लिन येथील ट्रिनिटि कॉलेजांत गेले; परंतु तेथें कॉले-

* पलटणीच्या एका भागावरील–कंपनीवरील–मुख्य अधिका-ऱ्यास कॅप्टन म्हणतात. कंपनींत प्रायः १०० शिपाई असतात. इंग्रज सैन्यांतील अधिकाऱ्यांचा क्रम पुढीलप्रमाणें आहेः—फील्ड मार्शल; जनरल; लेफ्टेनेंट जनरल; मेजर जनरल; ब्रिगेडियर जनरल; कर्नल; लेफ्टेनेंट कर्नल; मेजर; कॅप्टन. ( भा. क. )

जांत वस्तुतः ते थोडीच मुदत राहिले. एका शिक्षकापाशीं त्यांनीं तेथील ठरीव अभ्यासक्रम संपविल्यानंतर ह्यांना कशी तरी पदवी ( कॉलेज संबंधीं डिग्री ) मिळाली. त्यांचा कॉलेजांतील अभ्यास सुरू असतां ते बहुतेक आपले चुलत आजे अर्ल ऑफ् मेयो यांजपाशीं किल्डे-अर परगण्यांत पामर्स्टन येथें राहात असत. हेज व मीथ परगणा लांब राहिल्यामुळें त्यांजकडील ओढा ह्या वेळीं कमी होत चालला. तथापि १८४२ त ह्यांचा अति आवडता एक भाऊ एक प्रकारच्या हींवतापांतून उठल्यावर मृत्यु पावला. वास्तविक पाहतां त्या तापामुळें शरिरांत विकृति राहून तिचाच असा परिणाम झाला. ह्या मृत्यूमुळें त्यांना घरची आठवण होऊन एकदम दुःखाची उकळी फुटली. त्या संबंधानें त्यांनीं एक लहानसें काव्य केलें असून तें वाचलें असतां तो प्रसंग डोळ्यासमोर उभा राहून वाचकांचें मन अद्यापि विव्हळ होतें. पुढील वर्षीं ह्मणजे १८४३ त रिचर्ड सौथवेल बर्क हे वयांत आले.

पामर्स्टन येथें हे राहत असतां तेथील घरधनीण कौंटेस ऑफ् मेयो, ह्या उल्हासी व चतुर मंडळींत वागणाऱ्या होत्या. अशा मंडळीचें वर्णन प्रेड कवीच्या काव्यांत अद्यापि आढळून येतें. ह्या बाईंना मूलबाळ कांहीं नसून ह्या मोठ्या गुणी व ममताळू होत्या. ह्मणून आपल्या तरुण नातवाचा संसारास आरंभ सुखावह रीतीनें व्हावा, ह्यासाठीं ह्या बाईंनीं आपल्याकडून होण्यासारखें सर्व केलें. ह्या बाईंना एक जुळी बहीण होती; तिनें मि. स्मिथ नांवाच्या एका गृहस्थांशीं लग्न लाविलें होतें. वेस्ट इंडीज बेटांत संपत्ति

मिळवून मि. स्मिथ हे सांप्रत ससेक्स परगण्यांत बर्स्टेड लॉज येथें स्थाइक झाले होते. कौंटेस ऑफ मेयो ह्या क्वीन आडिलेड ह्यांच्या पदरची एक मानकरीण असल्यामुळें पामर्स्टन येथें राहणाऱ्या ह्या कुटुंबाचें पुष्कळ दिवस इंग्लंडांत राहणें होई. तसेंच ह्या आवळ्याजावळ्या दोघांही बहिणींना मूलबाळ नसून त्यांचें अखेरपर्यंत परस्परांवर कांहीं अद्वितीय प्रेम होतें. ह्यामुळें एखादे वर्षीं अर्ल व कौंटेस हीं उभयतां आपल्या चुलत नातवासह बर्स्टेड लॉज येथें राहण्यास जात; व पुढील वर्षीं स्मिथ बाई ह्या कैकदिवस पामर्स्टन येथें त्यांच्या भेटीस जात. ह्यामुळें कोणत्याही तरुण ऐरिश गृहस्थाला समाजांतील ज्या प्रकारच्या मंडळीचा सहवास घडावयाचा त्याहून बऱ्याच भिन्न भिन्न स्थितींतील मंडळीचा सहवास रिचर्ड बर्क यांना घडला.

पुढील दोन उन्हाळे* रिचर्डबर्क यांनीं लंडन शहरीं काढिले. ह्या मुदतींत लंडन एथील मंडळीचा प्रेमभाव कसा संपादितां येईल, इकडे त्यांनीं सर्व लक्ष दिलें. जुन्या कागदपत्रांपैकीं एक अवचीत सांपडलें आहे; त्यावरून तेव्हांच्या मंडळीमध्यें त्यांच्यासंबंधानें कसें काय मत होतें तें दिसून येतें. तें मत असें:–' हे तरुण गृहस्थ असून ह्यांची चालचलणूक चांगली आहे; व नृत्यकलेंत शहरांतील उत्तम माणसांत ह्यांची गणना असून ह्यांचें प्रस्थ बरेंच माजलेलें आहे. ' ह्या वेळीं ह्यांच्या शरिराचा बांधा इतका मजबूत झाला होता कीं, त्यामुळें ते मोठे भव्य दिसत; व त्यांच्या

* मे, जून व जुलई हे महिने इंग्लंडांत मोठ्या उत्सवाचे होत. ह्या वेळीं बडी बडी मंडळी लंडन शहरांत जमतात; व तेव्हां अनेक चैनीचे प्रकार सुरू असतात. ( भा. क. )

चेहऱ्यावरून मोठे निकोप व बळकट दिसत. त्यांच्या शरिराची ही स्थिति शेवटपर्यंत कायम राहिल्याचें प्रसिद्धच आहे.

१८४५ त यांची चुलत आजी लेडी क्लिफर्ड ह्या वारल्यामुळें मि. बर्क यांना मंडळींत फारसें जातां येतां आलें नाहीं. म्हणून त्यांनीं त्या सालचा उन्हाळा रशियामध्यें प्रवास करण्यांत घालविला. त्या काळीं रशियन दरबाराकडून व लोकांकडून इंग्लिश लोकांचें आदरातिथ्य उत्तमप्रकारें होत असल्याचें प्रसिद्ध आहे. तेथील दरबारांतील व समाजांतील लोकांशीं परिचय व्हावा म्हणून कित्येक पत्रें मि. बर्क यांनीं बरोबर नेलीं होतीं. ह्यास्तव तेथें विशेष पाहण्यासारखें जितकें कांहीं होतें तितकें सर्व त्यांच्या नजरेस पडलें; आणि युरोपांतील अनेक मंत्र्यांची व मुत्सद्द्यांची प्रत्यक्ष ओळख त्यांना करून घेतां आली. ह्या घटकेपर्यंत ह्या मंडळीचीं नांवें मात्र त्यांनीं ऐकिलेलीं होतीं. त्या वेळीं त्यांनीं लिहिलेलीं पत्रें वाचिलीं असतां कोणाच्याही मनावर असा परिणाम होईल कीं, ते मोठे कुशाग्र बुद्धीचे व तरतरीत असून अगदीं नवख्या देशांत जाऊन तेथील वस्तुस्थिति पाहण्याचा त्यांना हा पहिलाच प्रसंग असावा. तसेंच ह्यांचें शरीरसामर्थ्य विलक्षण असल्यामुळें त्या बाजूनेंही त्यांना करमणूक करून घेतां आली, असेंही त्या पत्रांवरून दिसून येतें. हा प्रवास संपवून स्वदेशीं परत आल्यावर त्यांनीं त्या सर्व हकीगतीचें एक पुस्तक* प्रसिद्ध केलें;

* " सेंट पीटर्सबर्ग आणि मास्को " ( St. Petersburg and Moscow ) व " झारच्या दरबारीं प्रवेश " ( A visit

त्याचे दोन भाग आहेत. तरुण मनुष्यांनीं प्रवास कोणत्या प्रकारें करावा ह्याचें बरेंच चांगलें उदाहरण ह्या पुस्तकांत आढळतें. हे दोन्ही भाग त्यांनीं मोठ्या निरभिमानानें लिहिलेले असून मौजेचे अनेक देखावे ह्यांत ठिकाठिकाणीं वर्णिले आहेत. तथापि ठिकाठिकाणीं विनाकारण अनुमानें काढीत बसून त्यांनीं हा ग्रंथ निष्कारण वाढविला नाहीं. ह्यांनीं रशियांतील रितीरिवाजांचें वगैरे दिलेलें वर्णन कडक नसून वस्तुस्थितीला अनुसरून आहे. तसेंच त्या काळीं तें वर्णन लोकांना मोठे अपूर्व वाटलें; कारण तेव्हां अशा प्रकारचीं पुस्तकें फारशीं नव्हतीं. परंतु सांप्रत ती स्थिति राहिली नाहीं.

विद्या व कलाकौशल्य ह्या दोहोंच्याही संबंधानें त्या काळीं रशियन लोक वस्तुतः बाल्यावस्थेंत असून इतर राष्ट्रांचें अनुकरण करीत असल्याचें त्यांना आढळून आलें. आपल्या ह्या मताच्या पुष्टीकरणार्थ त्यांनीं त्या देशांतील चित्रकलेसंबंधीं कित्येक नमुने मोठ्या मार्मिक रीतीनें उदाहरणार्थ दिले असून ग्रंथप्रसारासंबंधीं आंकडेही दिले आहेत; आणि परदेशांतून हजारों ग्रंथ त्या देशांत जात असून त्या मानानें पाहिलें असतां खुद्द तेथें मूळचे ग्रंथ फारच थोडे प्रसिद्ध होत आहेत, असेंही त्यांनीं सिद्ध करून दाखविलें आहे. रशियांत त्यांना विशेष आश्चर्यकारक गोष्ट आढळली ती हीच कीं, तेथें मध्यम स्थितींतील लोकांचा वर्ग

---

to the Court of the Czar ) अशीं ह्या दोन भागांचीं नांवें आहेत; व हें पुस्तक हेन्री कोलबर्न यांनीं १८४६ त छापिलें आहे.

मुळींच नाहीं. ह्यासंबंधानें ते म्हणतातः— ' राजाचा रंक ह्या देशांत जितक्या लवकर होईल त्याहून लवकर इतर कोणत्याही देशांत होणार नाहीं. तसेंच बडे लोक व शेतकरी ह्यांच्या स्थितींत येथें जितकें अंतर आहे त्याहून अधिक कोठेंही आढळणार नाहीं; कदाचित् ऐर्लंडाला मात्र हें म्हणणें लागू पडावयाचें नाहीं. रशियांत मध्यम स्थितींतील लोकांचा वर्ग नसल्यामुळें तेथें अशी स्थिति झाली आहे; कारण सर्व समाज एकत्र स्थितींत राखणारा हाच वर्ग असून एकंदर समाजाच्या कल्याणास हा वर्ग अति अवश्यक आहे. तेथें शेतकामासाठीं ठेविलेल्या गुलामाला, तो ज्याच्या पदरीं आहे त्या सरदाराच्या वाड्यांत प्रवेश करितां येईल; किंवा चावडीवर पाहरा करितां येईल. परंतु आपण आपल्या यजमानाच्याच जातींत जन्मास आलों आहों, किंवा त्याचें आपलें इतिकर्तव्य एकच आहे; अशा प्रकारचा एकही विचार त्या गुलामाच्या अंतःकरणाला शिवावयाचा नाहीं. तसेंच त्या बड्या सरदाराचीही समजूत असते कीं, आपण ह्या गुलामापेक्षां फार उच्च स्थितींत जन्मलों आहों, व विद्येनें आणि कुळानेंही त्याच्यापेक्षां फार श्रेष्ठ आहों. तेव्हां अशी समजूत ठेवूनच तो आपल्या सर्व गुलामांना फार सौम्य रीतीनें वागवून त्यांजवर कृपादृष्टि ठेवितो खरी. तथापि एखाद्या दयार्द्र स्वभावाच्या माणसापाशीं एखादें उमदें व प्रामाणिक जनावर असावें; आणि त्या जनावराच्या मनांत नसलें तरी त्याचा उपयोग त्या माणसास होत असल्यामुळें केव्हां केव्हां धन्याच्या मनांत त्या जनावराविषयीं कळवळा उत्पन्न व्हावा; तशाच प्रकारची ममता

त्या सरदाराची आपल्या गुलामांवर असते. हे आपलेच जातिबांधव किंवा मित्र आहेत, असें समजून तशा दृष्टीनें कोणत्याही प्रकारचे हक्क त्या गुलामांस देण्यास तो कधींही तयार नसतो.

ह्या वस्तुस्थितीमुळें रशियांत परिणाम घडून आले ते असेः--' राज्यपद्धतीची मूळची एकंदर रचना निर्दोष खरी; परंतु तेथील राजकीय संस्था घोटाळ्याच्या व अडाणी तऱ्हेच्या असल्यामुळें एखाद्या जाळ्याप्रमाणें अगदीं गुतागूत होऊन गेलेली आपणांस आढळते. ज्या विद्येच्या योगानें मनावर सुसंस्कार व्हावयाचे, अशा विद्येपासून होणारे सर्व फायदे तेथील समाजाच्या एकाच वर्गाला--बडे लोकांस--मिळत असून अशा विद्येमुळें मनुष्याच्या चालीरितींत वगैरे जो एक प्रकारचा भारदस्तपणा व मोहकपणा यावयाचा, तो त्या एकाच वर्गांतील लोकांच्या ठिकाणीं दृष्टोत्पत्तीस येतो. उलटपक्षीं, दुसऱ्या म्हणजे कनिष्ठ वर्गांतील लोक पूर्णपणें अज्ञानी असून रानटी स्थितींत व दास्यांत दिवस काढीत आहेत; असें आढळतें. शेतकऱ्यांच्या झोंपडीच्या शेजारींच श्रीमंताची टोलेजंग इमारत तेथें आढळते; किंवा दास्यांत दिवस कंठणाऱ्या शेजारींच राजनिष्ठ लोकांची वस्ती आढळते. तेथील नद्यांच्या कांठींही केव्हां केव्हां भव्य देवालयें वगैरे असून केव्हां केव्हां त्या भयाण अरण्यांतून व ओसाड दलदलींतून वाहत असतात. सारांश, तेथील सर्वच स्थिति विसंगत आहे. तेथील समाजरूपी इमारत अद्यापि उभारली गेली नाहीं; आणि ती

उभारण्यास अवश्य अशी सामुग्री जंगलांत* विलक्षण अव्यवस्थित स्थितींत आहे. '

रशियांतील नियंत्रित व्यापारपद्धतीसंबंधानें मि. बर्क यांनीं आपल्या पुस्तकांत बरेंच विस्तृत वर्णन फार मोकळ्या मनानें केलें असल्यामुळें तें वाचून मनाला समाधान वाटतें. कारण ह्याच वेळीं इंग्लंडांत ती पद्धति कायम राखण्याविषयीं अखेरची धडफड सुरू होती. ह्यामुळें अशा प्रसंगीं माणूस पक्षाभिनानास पेटण्याचा संभव असतो. तेथील व्यापाऱ्यांस असलेल्या गैरसोई दाखवून सेंट पीटर्सबर्ग येथें संसारास लागणाऱ्या जिनसा–मग त्या आवश्यकतेच्या असोत वा चैनीच्या असोत–किती महाग पडतात, हें त्यांनीं दाखविलें आहे. ते पुढें म्हणतात:—' मला वाटतें कीं, रशियामध्यें व्यापारासंबंधानें इतकी अव्यवस्था झाली आहे, तिचें वास्तविक गूढ एकाच गोष्टींत आहे. ती हीच कीं, अर्थशास्त्रासंबंधीं ह्या अत्यंत महत्त्वाच्या बाबतींत योग्य प्रकारचा कायदा करण्याचें सामर्थ्य तेथील सरकारी अधिकाऱ्यांच्या आंगीं नाहीं. व्यापारासंबंधीं अगदीं साधारण किरकोळ गोष्टींचीही ज्यांना काडीमात्र माहिती नाहीं, त्यांना सांप्रत सुरू असलेल्या पद्धतींतील दोष काढून टाकण्यासाठीं उपाय योजितां येणें अशक्य आहे. अगदीं उच्च प्रतीच्या बडे लोकांतून बहुतेक माणसें निवडून काढून त्यांजकडे एकंदर राज्यव्यवस्था सोंपविण्यांत येत आहे, तोंपर्यंत व्यापारसंबंधीं कामें

* हें लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, रशियाची १८४५ त जी स्थिति होती, तिला अनुलक्षून हें वर्णन आहे.

पाहण्यास खरा हुशार प्रधान मिळण्याची आशा करणें व्यर्थ आहे.'

तथापि सरकारी आश्रय व सरकारी सत्ता ह्यांचा संबंध रशियांत व्यापारापुरताच नव्हता, असेंही त्यांनीं दाखविलें आहे. रशियन लोकांच्या आयुष्यक्रमांतील बारीकसारीक गोष्टींत देखील ह्यांचा शिरकाव होऊन तेणेंकरून लोकांत विद्याप्रसारास प्रतिबंध झाला होता, त्यांचीं कारागिरीचीं कामें मंदावलीं होतीं, आणि त्यांच्या करमणुकीच्या कृत्यांसही हरकती येत होत्या. नाट्यकलेला रशियांत सरकारी आश्रय असल्यामुळें पन्नास वर्षांपूर्वीं तेथें प्रत्यक्ष कसे परिणाम घडत, ह्याचें त्यांनीं पुढें लिहिल्याप्रमाणें वर्णन दिलें आहे:—' सरकारी व्यवस्थेचा प्रत्यक्ष परिणाम आज रात्रीं माझ्या जितका नजरेस आला, तितका आजपर्यंत कधीं आला नव्हता. कारण खेळास सुरवात होण्याची जी वेळ जाहिरातींत प्रसिद्ध केली होती, ती होऊन गेली. तरी गव्हर्नरसाहेब येऊन आपल्या जागीं विराजमान होईपर्यंत खेळास आरंभ झाला नाहीं. तसेंच प्रिन्स फ्रेडरिक यांस रशियन भाषेंतील नाटकाचा भाग अगदीं कमी ऐकावा लागावा म्हणून नाटकाचा दुसरा अंक पाऊण तास उशीरां सुरू केला. आतां ही स्थिति आपल्या देशांतील स्थितीशीं ताडून पाहण्यापासून फायदा नाहीं; आणि इंग्लंडांत प्रत्येक गोष्टीसंबंधानें जी उत्कृष्ट स्थिति असते, तिच्या मानानें इतर देशांतील स्थिति ताडून पाहण्याचा प्रयत्न करण्याचें मीं टाळिलें आहे. कारण प्रवाश्यांनीं स्वदेशाभिमानाचे विचार होतां होईतों स्व-

देशांतच ठेविले पाहिजेत. तथापि मास्को शहरांतील नाटकगृहांत असा प्रसंग येण्याऐवजीं लंडन शहरांतील नाटकगृहांत आला असता, तर कसा काय रंग उडण्याचा संभव होता, हा विचार त्या प्रसंगीं माझ्या मनांत आल्यावांचून राहिला नाहीं. लंडन शहरीं असा प्रकार घडता तर नाटकगृहाच्या आंतील बाजूस शोभा येण्यासाठीं ज्या वस्तूंचा उपयोग केला होता, त्या वस्तूंनीं, पाऊण तास संपण्यापूर्वीच बहुधा बाहेरील रस्त्यांना शोभा आली असती; आणि गव्हर्नर, नाटकपात्रें, राजपुत्र व इतर सर्व मंडळी क्षणांत निसटून बाहेर पडली असती; नाहींतर प्रत्यक्ष दृश्यांत सांपडून होणारे परिणाम त्यांना भोगावे लागते ! सारांश, लंडनमध्यें काय परिणाम घडला असता तो असो; येथें नाटक पाहण्यास जमलेल्या छोट्याशा प्रेक्षक समुदायांत एकाची नुसतें हूं कीं चूं करण्याची देखील छाती झाली नाहीं; सर्व मंडळी इतकी मुकाट्यानें आणि शांत रीतीनें बसली होती कीं, जणूं काय ते एखाद्या कारस्थानाच्या सभेलाच गेले आहेत. '

रशियांतील शेतकऱ्यांच्या स्थितीचें चित्र बंगाल इलाख्यांतील एखाद्या भातजमिनींत देखील काढितां येण्यासारखें आहे; फक्त बंगाल्यांतील नांगराच्या बैलांऐवजीं मास्कोकडील तट्टें जोडिलीं म्हणजे झालें. ह्यासंबंधानें ते म्हणतातः—' तेथील शेतकरी रोजमजुरीवर जाण्यास निघतांना मीं कैक वेळां पाहिला आहे. तेव्हां एका हातांत त्याचा नांगर असून तो ओढण्यासाठीं जें ओबडधोबड लहानसें तट्टू लावावयाचें, तें दुसऱ्या हातानें त्याला

ऱ्यावयाचें असतें. लोथियन शेतकऱ्याला हा नांगर पाहून फारच आश्चर्य वाटेल; कारण दुबेळकें असलेल्या एकाद्या भक्कम कांठीपेक्षां हा फारसा मोठा नसतो. ह्या दुबेळक्याच्या दोन टोंकांपैकीं एकाला लोखंडाचा फाळ असतो; आणि तट्टू जसजसें नांगर ओढीत जातें, तसतशी ह्याच्या टोंकानें जमीन नांगरली जाते. तसेंच ह्या दुबेळक्याचें दुसरें टोंक शेतकरी हातांत धरितो. सॅक्सन लोकांमध्यें सातजणांच्या हातीं राज्यसत्ता असे त्या काळीं तेथें देशी कारागिरीच्या कामांची जी कांहीं प्रगति झालेली होती, त्यासंबंधीं प्राचीन काळचीं कित्येक चित्रें मीं पाहिलीं असून बहुतेक त्याच नमुन्यावर रशियांतील हा एकंदर मासला आहे. जमीन सरळरेषेंत नांगरली असतां ती थोडी बहुत तरी जास्त सुपीक होते असें तेथील शेतकऱ्यांस वाटत असेलसें दिसत नाहीं. कारण ते वेडेवांकडें पाहिजे त्या बाजूनें नांगरीत जातात; आणि लहर लागेल त्याप्रमाणें जमीन कशी तरी ओरखडितात. आपल्या जनावरांना उन्हाळ्यांत ते जंगलांतून चरावयास सोडितात, आणि हिवाळ्यांत प्रत्येक झोंपडीशेजारीं मोठमोठे गोठे केलेले असतात त्यांतून ठेवितात.'

ज्या लोकांचा जमीनजुमला आहे त्यांजवर कित्येक प्रकारची जबाबदारी पडतेच. अशा प्रकारची जबाबदारी हेज येथें किती असे, ह्याचें शिक्षण मि बर्क ( लॉर्ड मेयो ) यांना मिळालेलें असल्यामुळें रशियांत गुलामांच्या स्थितींत असलेल्या शेतकऱ्यांच्या आयुष्यक्रमांतील दुःखदायक बराच प्रकार त्यांच्या लक्षांत आला, हें साहजिक आहे. तथापि

त्यांनीं इतकें कबूल केलें आहे कीं, १८४० च्या सुमारास रशियांतील गुलामांना, त्यांचे धनी चांगले असल्यास, 'कोणत्याही गोष्टीची वाण नसून कशाची काळजी नसे.' रशियांतील अति खाष्ट बडे लोकांनीं आपल्या जमिनींची वहिवाट पाहण्यास नेमिलेले कारकून वगैरे द्वाड व निर्दय असतात; आणि ह्या बडे लोकांचें सर्व लक्ष तर आपल्या लांबलांबच्या जमिनींपासून येणाऱ्या वसुलावर मात्र असतें. तथापि खुद्द ऐर्लंडांतील जे जमिनदार अन्य देशांत जाऊन तेथें ऐर्लंडांतील उत्पन्नावर चरितार्थ चालवितात; त्यांपेक्षां हे रशियन बडे लोक पुष्कळ बरे, असें मि. बर्क यांनीं तुलनेनें दाखविलें आहे. साधारण प्रमाणानें पाहिलें असतां गुलामाच्या स्थितींत असलेला प्रत्येक शेतकरी हिवाळ्याच्या सहा महिन्यांत कांहीं तरी कारागिरीचा धंदा करितो; उन्हाळ्याच्या लहानशा काळांत जमीन नांगरणी वगैरे करून गुरेंढोरें चारितो; एकंदरींत धन्याकडून त्याचें पोषण चांगल्या प्रकारें होतें, किंवा शेताच्या उत्पन्नापैकीं वाजवीरितीनें त्याच्या श्रमाबद्दल जो भाग त्यास मिळणें न्यायाचें असतें तो त्याला मिळतो; आणि लाकड्याच्या ओंड्यांचें आपलें झोंपडें, त्यांत उबारा राखण्यासाठीं एक शेगडी आणि मेंढ्यांची कातडीं, ह्यांखेरीज इतर पदार्थांची त्याला फारशी गरजच लागत नाहीं; असें वर्णन मि. बर्क यांनीं केलें आहे. तथापि त्यांनीं असेंही म्हटलें आहे कीं, 'त्याच्या आंगीं हुरूप नसून इतर देशांतील शेतकरी ज्या प्रकारच्या मर्दानी खेळांत मौज मारितात, तसे खेळ तो फारसे कधीं खेळत नाहीं.'

' सारांश, रशियांतील गुलामांचा आयुष्यक्रम अशा प्रकारचा आहे. आपल्या धन्यांची मर्जी हाच त्यांचा कायदा; इतर कायदा ते जाणत नाहींत. तसेंच आपल्या बादशाहास ते " बाप " म्हणतात; आणि त्यांच्या मताप्रमाणें इहलोकींच्या एकंदर ऐश्वर्याचा तो प्रत्यक्ष पुतळाच होय. ह्या गुलामांना चांगल्या प्रकारें वागविलें असतां तेही ममताळूपणानें व कृतज्ञपणानें वागतात; ते परक्या लोकांचा पाहुणचार करितात; आणि आपापसांत गुण्यागोविंदानें राहतात. तथापि दास्याची ही दुःस्थिति त्यांच्या मनाला नेहमीं खात असते. हा सर्व प्रकार ते मुकाट्यानें सहन करितात खरा; परंतु अंतःकरणांत त्याजबद्दल त्यांना विषाद वाटत असतो, मात्र तो त्यांना बोलून दाखवितां येत नाहीं; असें त्यांच्या सर्व कृत्यांवरून व्यक्त होत असतें. आपल्या पिढीजाद धन्यांवर ह्यांची जी श्रद्धा असते, तिचा उपयोग विशेष महत्त्वाच्या कामीं करून घेणें वाजवी आहे. कैक वेळां ही श्रद्धा म्हणजे त्यांच्या अंगचा मोठा सद्गुण होय, असें ठरतें. पहा, नेपोलियन बादशहानें एकदां ह्या गुलामांना सांगितलें कीं, तुह्मी आपल्या देशबांधवांविरुद्ध लढण्यास तयार व्हाल, तर मी तुम्हांला ह्या दास्यांतून मुक्त करीन. परंतु त्यांनीं त्यांचें तें म्हणणें मोठ्या त्वेषानें झिटकारिलें. तसेंच एखादा गुलाम फितूर झाल्यामुळें रशियन लोकांच्या देशाभिमानाच्या कृत्यास कमीपणा आला, असें त्या एकंदर युद्धांत क्वचितच घडून आलें असेल. 'बापाची' आज्ञा होतांच त्यांनीं मोठ्या खुशीनें आपल्या मालमत्तेचा विध्वंस करून टाकून प्राणाच्याही आहुति दिल्या आहेत. कित्येक

वेळां तर हे गुलाम स्वतःच आपल्या मालमत्तेची सबरसामोर्त्री उडवून देत; आणि आपलीं बालपणचीं घरें सोडून देऊन कुटुंबांतील माणसांसह रानावनांत भटकत फिरत. अशा स्थितींत त्यांना घर ना दार; अन्नालाही ते मोताद झालेले असत. तथापि स्वारी करणाऱ्या फ्रेंच लोकांना आपल्या बादशहाच्या मुलखांत अन्नसामग्री व राहण्यास आश्रय मिळूं देण्यापेक्षां स्वतःच अशी कष्टदशा सोसणें त्यांस बरें वाटलें. ‘ रशियन सैन्यापैकीं हजारों लोक ठार होऊन पडत होते; तथापि रणभूमीवरील आपली जागा सोडून जाण्याची, किंवा आपणांस नेमून दिलेलें काम सोडून जाण्याची कल्पना त्यांना कधीं शिवली नाहीं. परंतु आपण होऊन शत्रूवर विलक्षण हल्ला करणें किंवा जोरानें तुटून पडणें, हें त्यांजकडून होत नसे. त्यांचा पराक्रम फारसा शिपाईबाण्याचा नसून मताभिमानास पेटून जिवावर उदार झालेल्या माणसासारखा होता. दास्याचें बीज त्यांच्या अंगांत मुरलेलें असल्यामुळें युद्धांतील हालअपेष्टा त्यांना आनंदानें सोशितां येत खऱ्या; तथापि तेणेंकरून, जय मिळणें हें आपल्या स्वतःच्या परिश्रमावर अवलंबून आहे असें समजून त्या धोरणानें लढलें पाहिजे, अशी प्रेरणा त्यांच्या अंतःकरणांत उत्पन्न होत नसे. ’

त्यांनीं पुढें असें ह्मटलें आहे कीं, ‘ ह्या एकंदर वस्तुस्थितीवरून तेथील राज्यकर्त्यांना पुष्कळ शिक्षण मिळण्यासारखें होतें. ’ वरील उतारे येथें थोडे विस्तारानें दिले आहेत; कारण अशा प्रकारचें शिक्षण खुद्द लॉर्ड मेयो यांनीं पूर्णपणें घेतलें होतें, असें हिंदुस्तानांतील त्यांच्या पुढील

७११००

कारकीर्दीवरून सिद्ध झालें आहे. ऐर्लंडांत काय किंवा हिंदुस्तानांत काय, त्यांनीं सरकारी कामकाजांत घालविलेल्या एकंदर काळांत त्यांना एका गोष्टीचा सदा तिटकारा असे. ती कोणती ह्मणाल, तर राष्ट्रांतील समाजापैकीं एकाद्या वर्गांतील लोकांसच विलग काढून त्यांस निराळ्या रीतीनें वागविणें. अखेरीस हिंदुस्तानांत आल्यावर येथील राज्य-कारभार त्यांना आपल्या मुखत्यारीवर चालवितां आला. ह्या मुदतींत आरंभापासून अखेरपर्यंत त्यांनीं ज्या कामीं परि-श्रम केले, तीं अशीं:– ( १ ) ब्रिटिश अमलामध्यें आपणां सर्वांचें हिताहित भिन्न भिन्न गोष्टींत नसून सर्वांवर जबाब-दारीही एकाच प्रकारची आहे, असा विचार हिंदुस्तानांतील राजेरजवाडे व भिन्न भिन्न जातींचे लोक यांच्या अंतःकरणांत उत्पन्न करणें; आणि ( २ ) स्वतःचा राज्यकारभार चाल-वून ठिकठिकाणच्या भिन्न भिन्न प्रकारच्या कामकाजांची उत्तम रीतीनें व्यवस्था लावण्याची योग्यता लोकांच्या आंगीं अधिकाधिक येईलसें करणें.

चाबकानें फोडून काढून देहांत शिक्षा देण्याच्या रशि-यांतील प्रकारासंबंधानें लॉर्ड मेयो यांच्या पुस्तकापैकीं एका पानांतील आणखी एक उतारा येथें देणें अवश्य आहे. कारण ह्या उताऱ्यामध्यें ह्या शिक्षेसंबंधीं एका तत्त्वाविषयीं स्पष्ट निर्णय यांनीं अखेरीस दिला आहे; आणि पुढें पंच-वीस वर्षांनंतर ज्या मारेकऱ्यानें खुद्द लॉर्ड मेयो यांना ठार केलें, त्याच्या संबंधानें ह्या तत्त्वाचाच पूर्णपणें अंमल कर-ण्यांत आला; व तसें करणें इंग्लिशांच्या नांवालौकिकास साजण्याजोगेंच होतें.

‘ प्रिन्स गार्गारिन यांना ज्या गुलामानें कांहीं वर्षांपूर्वी गोळी घातली, त्याला अशा भयंकर यातना सोसून मरावें लागलें. ह्या शिक्षेचें स्वरूप कांहीं अंशीं लष्करी तऱ्हेचें असल्यामुळें ही शिक्षा भोगण्यासाठीं त्याला घटकाभर शिपायाचा वेष दिला. नंतर त्याला शिपायांच्या रांगांतून खालवर फेऱ्या करण्यास लाविलें. ह्याप्रमाणें तो फिरत असतां त्याला चामड्याच्या भक्कम चाबकाचे फटके बसत होते; व प्रत्येक फटक्याबरोबर त्याच्या आंगावरचें मास तुटून पडत होतें. एकशें विसाव्या फटक्याबरोबर तो पडला; आणि त्याला शिक्षा तर हजार फटक्यांची होती. तेव्हां बाकीचे फटके आतां घेणार किंवा उद्यां घेणार असें त्याला विचारिलें. त्यानें विचार केला कीं, राहिलेली शिक्षा भोगण्याचें लांबणीवर टाकणें म्हणजे केवळ आपल्या वेदना लांबविणें होय. ह्यास्तव राहिलेले फटके तो तेव्हांच सोसण्यास तयार झाला. म्हणून त्याला बळें उभें केलें; परंतु आणखी थोडे फटके खाल्ल्याबरोबर तो पुनः पडला. त्यांनीं त्याला तिसऱ्यानें उभें केलें; तेव्हां त्याला मूर्च्छा आली, व तशा बेशुद्ध स्थितींतच त्याला उचलून नेलें. अखेर त्याच्या जखमा कुजून तो दुसऱ्या दिवशीं मरण पावला. ह्या माणसाच्या हातून अति निंद्य गुन्हा घडला होता.’

‘ तथापि देहान्त शिक्षा ही इतरांस उदाहरणार्थच आहे, गुन्हेगाराचा सूड उगविण्यासाठीं नाहीं, असें समजलें पाहिजे; आणि हें तत्त्व सर्वांस संमत आहे. वर ज्या प्रकारच्या देखाव्याचें वर्णन दिलें आहे तो प्रकार ख्रिस्ती म्हणविणाऱ्या राष्ट्राला कालिमा आणणारा असून राज्यपद्धतीच्या निर्दोष तत्त्वांना अनुसरून नाहीं. ’

रशियासंबंधीं हें पुस्तक लिहिल्यामुळें मि. बर्क यांचें मन बरेंच प्रगल्भदशेस पोहोंचलें; आणि ह्या संसारयात्रें-तील बिकट गोष्टींचा प्रत्यय ह्यांच्या मनाला तेणेंकरून आला. ऐर्लंडांत हे परत येतात तों तेथील एकंदर प्रकार जो दृष्टोत्पत्तीस आला, त्यामुळेंही त्यांना बरीच विवंचना उत्पन्न झाली. बटाट्याच्या उत्पन्नास रोग लागून कित्येक वर्षें देशांत दुष्काळ पडलेला होता. ह्या दुष्काळाच्या काळांत शेंकडों उदार बुद्धीच्या ऐरिश गृहस्थांनीं आपलें कर्तव्य मोठ्या तत्परतेनें बजाविलें; त्याजमध्येंच मि. रिचर्ड बर्क यांची गणना होऊन त्यांनीं चांगला लौकिक संपादिला. कित्येक महिने तर त्यांना घोड्यावरून उतरण्यासही फारशी फुरसत मिळत नसे: आज किल्डेअर परगण्यांत एकाद्या जाहीरसभेस, तर उद्यां तीस मैलांवर मीथ परगण्यांतील सभेस जाणें; धर्मार्थ अन्नवस्त्र वगैरे वाटण्यांत येई त्यावर देखरेख ठेवणें; लोक उपाशीं मरत असल्यास त्यांस शोधून काढणें; विणकामाचें सामान घेऊन ज्या त्या खेड्यांतील बायकांना कामास लावणें; गांवाबाहेर ठिकठिकाणीं असलेल्या झोंपड्यांतून अन्नसामग्री पुरविण्याची तजवीज लावणें; दुष्काळसंबंधीं कामावर येणाऱ्या लोकांची व्यवस्था पाहणें, लोकांत उडालेला हाहाकार आपल्याकडून होईल तितका शांत करणें, वावगा खर्च न होऊं देणें व अशा रीतीनें दुष्काळ निवारणार्थ झटणें; हीं कामें त्यांना करावीं लागत. शिवणकाम, विण-लेल्या शाली व झोंपड्यांतून राहणाऱ्या लोकांनीं घरबसल्या केलेले इतर किरकोळ जिन्नस बरोबर घेऊन त्यांनीं घटकोघटकीं इंग्लंडास जावें; आणि लंडन येथील आपल्या सभ्य

मित्रमंडळीमार्फत ते जिन्नस त्यांनीं भरपूर किंमतीस विकावे. दुसऱ्याच्या मनाला पाझर फोडण्याची बरीच शक्ति स्वभावतः त्यांच्या आंगीं होती. ह्या व इतर कित्येक कारणांमुळें सुबत्तेच्या काळांत शेजारपाजारच्या कुटुंबांतील माणसें यांचा मनःपूर्वक पाहुणचार करीत. ह्या शक्तीचा व आपल्या आंगच्या वाद्यकलेचा उपयोग ह्या वेळीं त्यांनीं करून घेतला; व लोकांच्या मनोरंजनार्थ खेळ वगैरे तयार करून, किंवा खेडेगांवांतून खाजगी रीतीनें नाटकें करवून त्यांचें उत्पन्न त्यांनीं धर्मकृत्यांकडे लाविलें. तसेंच नास नांवाच्या गांवीं तर त्यांनीं एक जंगी गायनवादन समारंभ भरविला. ह्या समारंभास परगण्यांतील निम्मे लोकांचा आश्रय होता; म्हणजे कित्येक प्रत्यक्ष आले होते व कित्येकांनीं नुसत्या वर्गण्या दिल्या होत्या.

दुष्काळाच्या मुदतींत अति परिश्रम करून मि. बर्क यांनीं जी लोकप्रियता संपादिली, तिचें फळ त्यांना लवकरच मिळावयाचें होतें. किल्डेअर परगण्याला आपल्यातर्फे पार्लमेंटांत दोन सभासद निवडून देण्याचा अधिकार असून ह्या दोहोंपैकीं एका जागेसाठीं लिबरल पक्षाच्या वतीनें मार्किस ऑफ् किल्डेअर हे उमेदवार होते; आणि दुसऱ्या जागेसाठीं रिपीलर्स* ह्यांच्या वतीनें मि. ओ'नील डान्ट व मि. जान ओ' कॉनेल हे दोघे उमेदवार होते. मि.

* **रिपीलर्स** ह्या शब्दाचा अर्थ, असलेला संबंध तोडून टाकण्याविषयीं प्रतिपादन करणारे, असा आहे. इंग्लंड व ऐर्लंड यांजमधील संबंध तोडण्याची चळवळ ऐर्लंडांत १८४३ त शिखरास पोहोंचली. त्या चळवळीला अनुकूल असलेले सर्व लोक **रिपीलर्स** होत. ( भा. क. )

रिचर्ड बर्क हे कॉन्सर्व्हेटिव्ह पक्षाच्या वतीनें उमेदवार असून त्यांचे विचार त्या पक्षाच्या दृष्टीनें पाहिलें असतां विशेष दुराग्रहाचे नव्हते. ह्यांपैकीं मार्क्विस ऑफ् किल्डेअर हे निवडून येणार, ह्याविषयीं वादच नव्हता. शिवाय लवकरच असेंही दिसून आलें कीं, दुसऱ्या जागेविषयीं झटपट मि. डान्ट व मि. बर्क यांजमध्यें राहिली.

इंग्लंड व ऐर्लंड हीं संयुक्तच असलीं पाहिजेत, असें आपलें मत मि. बर्क यांनीं स्पष्टपणें प्रदर्शित केलें खरें. तथापि 'जीं कुळें आपल्या शेतांची विशेष सुधारणा करितील, त्यांना त्याजबद्दल मोबदला मिळावा' अशाविषयीं कायदा करण्यासही त्यांची संमति होती. धर्मविषयक प्रश्नांसंबंधानें ते जाणून होते कीं, एस्टॅब्लिशड्* चर्च हा कांहीं ऐर्लंडांतील बहुजनसमूहाचा धर्मपंथ नव्हे; तर देशांतील शेटसावकार वगैरे पैकीं बहुतेकांचा तो पंथ आहे; आणि बडे लोकांच्याच द्रव्याश्रयावर तो आवलंबून असून त्यांच्यांतलि दहांपैकीं नऊजण ह्या पंथाला अनुकूल आहेत.

निवडणुकीचें काम उभय पक्षांकडून मोठ्या सलोख्यानें चाललें होतें. आजमितीस अशा निवडणुकीच्या प्रसंगीं फार भिन्न प्रकार घडून येतात; व ते ध्यानांत आणिले असतां तेव्हांची ती स्थिति फार समाधानकारक वाटते. मि. बर्क हे स्वतः लोकप्रिय असल्यामुळें हें काम इतक्या सलोख्यानें चालण्याचें बरेच श्रेय त्यांना आहे. कॉन्सर्व्हेटिव्ह पक्षाकडील ह्या तरुण उमेदवाराचें भाषण

* एस्टॅब्लिशड् चर्च—सरकारानें स्थापिलेला व ज्यास सरकारचा आश्रय आहे, असा धर्मपंथ. ( भा. क. )

सुरू असतां प्रतिपक्षांकडील-रिपीलर्स पक्षाकडील-उमेदवार मि. डान्ट यांच्या तर्फेचे कित्येक लोक एकदां मध्येंच मोडा आणीत होते. तेव्हां खुद्द मि. डान्ट हे त्यांस अनुलक्षून मोठ्यानें ह्मणाले, ' मी शपथ-पूर्वक तुम्हांला सांगतों कीं, तुम्ही ह्या गृहस्थांचें भाषण ऐकून घेणार नाहीं तर मी ह्या सभेंतून उठून जाईन.' दुसऱ्या एका अगदीं आणीबाणीच्या प्रसंगीं लोकांनीं ओरडाओरड चालविली; तेव्हां मि. डान्ट हे मोठ्यानें म्हणाले, ' मी पुनः निक्षून सांगतों कीं, ह्या गृहस्थांचें म्हणणें तुम्ही योग्य रीतीनें ऐकून घेणार नाहीं तर मी ह्या निवडणुकीच्या सभेंतून निघून जाईन. '

निवडणुकीमध्यें अखेरीस मार्किस ऑफ् किल्डेअर व मि. बर्क हे दोघे पार्लमेंटचे सभासद झाले. ह्याप्रमाणें २५।२६ वर्षांच्या दरम्यानच मि. बर्क हे खुद्द स्वतांच्या परगण्याच्या वतीनें कॉमन्स सभेचे सभासद झाले. ह्यांचे विचार पिढी-जाद कॉन्सरव्हेटिव्ह मताचे खरे, परंतु फार दुराग्रहाचे नव्हते. इंग्लंडसंबंधी जे कायदेकानू त्या सभेंत व्हावयाचे, त्या संबंधानें आपल्या पक्षाच्या मर्जीप्रमाणें वागण्याविषयीं त्यांचा मोठा निश्चय असे; आणि ऐर्लंडांतील शेतसुधारणु-कीचे उपाय मंजूर व्हावे म्हणून आपल्याकडून त्या पक्षाची मिळवेल तितकी मदत मिळविण्याचा त्यांचा संकल्प असे.

१८४७ पासून १८४९ पर्यंत मि. बर्क यांनीं पार्लमेंटांत कोणत्याही प्रकारची चळवळ केली नाहीं. १८४८ त त्यांनीं मिस ब्लांच विंढम बाईशीं लग्न केलें. ह्या बाईचे वडील पुढें लॉर्ड लेकनफील्ड झाले; व त्यांनीं ह्या तरुण दंपत्यास

लंडन शहरीं एक्लेस्टन स्केअर नामक भागांत एक वाडा घेऊन टाकिला. रशियांतून परत आल्यापासून ह्या वेळपर्यंत मि. बर्क हे ऐर्लंडांत आपल्या पिढीजाद शेतजमिनीवर पक्के शेतकरी बनले होते; व तेथें ते घोड्यांचीही जोपासना करीत असत. १८४९ त त्यांच्या वडिलांस अर्ल ऑफ मेयो हें पद प्राप्त होऊन मि. बर्क हे लॉर्ड* नास झाले. तथापि ह्या नवीन अर्लांना हेज येथील आपलें जुनें घर जितकें प्रिय असे, तितका पामर्स्टन येथील मुख्य वाडा प्रिय नव्हता. ह्यास्तव तो वाडा व त्याच्याखालीं मोडणारीं ५०० एकरांची विस्तीर्ण जमीन त्यांनीं आपल्या मुलाला ( चरित्र नायकांना ) दिली. तेव्हां ऐर्लंडांतील शेतकऱ्यां-च्या आयुष्यक्रमांतील प्रत्येक गोष्टींत लॉर्ड नास यांनीं मोठ्या उत्साहानें लक्ष घातलें. वस्तुतः अशी तरतरी त्यांच्या आंगीं नेहमींच असे. ह्या मुदतींत प्रत्यक्ष शेतकीसंबंधीं व शेत-कीला लागणाऱ्या उत्कृष्ट गुरांढोरांच्या जोपासनेसंबंधीं त्यांनीं पूर्ण ज्ञान करून घेतलें. ह्या ज्ञानाचा उपयोग हिंदु-स्तानांत त्यांना मोठ्या महत्त्वाच्या बाबतींत पुढें होण्याचा योग होता. तथापि असा कांहीं प्रसंग येणार आहे, असें त्या वेळीं त्यांच्या ध्यानींमनींही नव्हतें.

पार्लमेंटांतील यांचें अगदीं पहिलें भाषण १८४९ च्या फेब्रुआरी महिन्यांत झालें. तें आटोपल्यावर थोड्याच मि-निटांनीं कॉमन्स सभेच्या लायब्ररींत बसून त्यांनीं घाईघा-ईनें आपल्या आईला पुढील चार ओळी खरडल्या -'माझ्या

---

* ड्यूक व मार्किस यांच्या सर्व मुलांना आणि अर्ल यांच्या फक्त वडील मुलांना सन्मानार्थ लॉर्ड अशी पदवी असे. ( भा. क. )

प्रियकर आई, मीं आतांच पहिलें भाषण केलें. पावतास तें फार चांगल्या रीतीनें झालें; आणि हा माझा पहिला प्रसंग हें ध्यानांत आणिलें असतां एकंदरीनें प्रयत्न बराच साध्य झाला. तुम्हीं फार बहार उडविली, असें डिझरायली व इतर मुत्सद्दी यांनीं मला म्हटलें. ऐर्लंडसंबंधाचा *हेबी-अस कॉर्पस ऍक्ट तहकूब ठेवण्यासंबधीं विषय होता.' पार्लमेंटसंबंधीं कमिट्या व इतर कामें ह्यांजकडे आतांपर्यंत जसें त्यांनीं नियमितपणें सर्व लक्ष दिलें होतें, त्याप्रमाणेंच ह्यापुढें आणखी तीन वर्षें दिलें. सरासरीनें पाहिलें असतां पार्लमेंटाच्या प्रत्येक बैठकींत† त्यांचीं फक्त चार भाषणें झालीं. तसेंच ज्या विषयांचें त्यांना पूर्ण ज्ञान असे त्यांवरच ते बोलत. १८४९-५०-५१ ह्या तीन वर्षांमिळून झालेल्या बारा भाषणांपैकीं दहा केवळ ऐर्लंडसंबंधीं विषयांवर होतीं; व राहिलेल्या दोहोंतील विषय आस्ट्रेलिया आणि हिंदुस्तान ह्यांजमध्यें आगबोटीनें दळणवळण ठेवण्यासंबंधीं होता. ही

---

* हा एक प्रकारचा कायदा आहे. अटकेंत ठेविलेल्या मनुष्यास हजर करून त्याला पकडण्याचें व अटकावून ठेवण्याचें कारण दाखविण्याविषयीं अटकेंत ठेवणाऱ्या इसमास ह्या कायद्याअन्वयें हुकूम करितां येतो. ( भा. क. )

† पार्लमेंटाच्या सामान्यतः दोन बैठकी असतात; एक ऑटम म्हणजे शरदृतूंतील, आणि दुसरी स्प्रिंग म्हणजे वसंत ऋतूंतील. इंग्लंडांत शरदृतूचे महिने म्हणजे प्रायः आगस्ट, सप्टेंबर व आक्टोबर हे होत; आणि वसंत ऋतूंत मार्च, एप्रिल आणि मे हे महिने येतात. विशेष महत्त्वाचें कामकाज शिल्लक राहिल्यास प्रधानमंडळ ह्या बैठकी वाढवितें. ( भा. क. )

सर्व भाषणें मिळून हॅन्सर्डच्या* फक्त ५६ कालम मजकूर झालेला आहे.

यांच्या वर्तनक्रमावर ज्यांनीं विशेष बारकाईनें लक्ष ठेविलें होतें, असे एक गृहस्थ लिहितात:—" ह्या मुदतींत ते वेळोवेळीं ऐर्लंडसंबंधीं विषयांवर मात्र बोलत. एकंदर राजकीय प्रश्नांत ते मन घालीत नसत. ह्यामुळें हे आपल्या प्रांतांतील एक समंजस गृहस्थ आहेत, असें नांव पार्लमेंट सभेंत त्यांचें ह्या मुदतींत झालें. वास्तविक पाहिलें असतां ऐर्लंडसंबंधीं प्रकरणांशिवाय इतर बाबतींत लक्ष न घालण्याचा ह्यांचा क्रम ह्यांच्या एकंदर सार्वजनिक कारकीर्दींत कायमच होता. कारण वसाहतींसंबंधीं एक दोन प्रकरणें बाजस ठेविलीं असतां, ऐर्लंडशीं ज्याचा संबंध नाहीं, अशा एकाही विषयावर ते बोलल्याचें मला स्मरत नाहीं. '

तथापि आपल्या पक्षाच्या पुढाऱ्यांचें लक्ष त्यांनीं वेधून घेतलें. आपापल्या जमिनींची सुधारणा करण्यासाठीं ऐरिश शेतकरी पैसा खर्चितील तर त्यांना त्याचा मोबदला मिळेल, अशाविषयीं कांहीं हामी देणें किती अवश्य आहे; ह्या संबंधानें आपले विचार त्यांनीं मोठ्या निर्भीडपणें प्रदर्शित केले. ह्या शेतकीच्या विषयाची माहिती त्यांना बालपणापासूनच होती. ते ऐर्लंडांतील एका सुखवस्तु गृहस्थाचे पुत्र होते;

---

* पार्लमेंटांत होणाऱ्या कामकाजाचा वगैरे सरकारी रिपोर्ट प्रसिद्ध होत असतो, त्याला ' हॅन्सर्ड ' म्हणतात. हा रिपोर्ट प्रसिद्ध करण्याचें काम प्रथमतः ज्या मनुष्याकडे दिलें त्याचें नांव हॅन्सर्ड असल्यामुळें ह्या रिपोर्टालाही हेंच नांव पडलें. ( भा. क. )

शिवाय त्यांनीं प्रत्यक्ष शेतकामही पाहिलें असून आपल्या जमिनींची स्थिति सुधारण्यास ते तयार असत. मात्र त्या खर्चाचा वचपा भरून आला पाहिजे, असा त्यांचा निश्चय असे. सारांश, जमीनदार व कुळें ह्या उभयतांच्याही दृष्टीनें ह्या विषयाचें इत्थंभूत ज्ञान त्यांना असून त्याचा प्रत्यक्ष उपयोग त्यांनीं ह्या प्रसंगीं करून घेतला.

ऐर्लंडांतील गिरण्यांसंबंधीं व्यापाराच्या प्रश्नावर कॉमन्स सभेंत वादविवाद सुरू असतां त्यांनीं त्या प्रकरणीं प्रत्यक्ष पुरावा व आकड्यांचाही पुरावा मोठ्या व्यवस्थित रीतीनें सभासदांपुढें मांडून १८५१ त त्यांनीं आपल्या पक्षाला मोठी मदत दिली. कुळें आणि सावकार ह्या दोघांच्या दृष्टीनें ह्या विषयाची माहिती देखील त्यांना स्वानुभवावरून झालेली होती. गिरण्यांची प्रत्यक्ष व्यवस्था कशी काय चालते हें त्यांना माहीत होतें. ह्यास्तव हॅनसर्डचा १६॥ कॉलम मजकूर भरेल, इतकें भाषण सभासदांस अखेरपर्यंत कंटाळा न येई अशा रीतीनें त्यांना करितां आलें. पार्लमेंटांतील एकंदर २१ वर्षांच्या आपल्या कारकीर्दींत ह्याहून मोठें भाषण त्यांनीं एकदांच केलें. ह्या भाषणासंबंधानें ऐर्लंडांतील गिरण्यांच्या मालकांनीं यांना एक पत्र पाठवून ह्यांचे फार फार आभार मानिले. ह्यामुळें त्यांच्या त्या श्रमांचें सार्थक झालें.

पुढील वर्षीं, म्हणजे १८५२ त, कॉन्सर्व्हेटिव्ह पक्षाकडे राज्यसूत्रें आलीं. तेव्हां मुख्य प्रधान लॉर्ड डार्बी यांनीं प्रधानमंडळ बनविलें. ह्या मंडळामध्यें ज्यांना कामाचा अनुभव मुळींच नाहीं अशा माणसांचा भरणा त्यांनीं नेहमींपेक्षां

अधिक केला; असे उद्गार लोकांकडून त्या वेळींच निघाले. अशा अगदीं नवीन माणसांपैकींच लॉर्ड नास हे एक होते. ऐर्लंडच्या चीफ सेक्रेटरीची जागा लॉर्ड डार्बी यांनीं त्यांस देऊं केली, तेव्हां त्यांना आश्चर्य वाटून आनंदही झाला. कारण ऐर्लंडांतील सामान्य पदवीच्या कोणत्याही मनुष्यास स्वदेशामध्यें पार्लमेंटासंबंधीं अति मोठ्या हुद्द्याची मिळणारी जागा ह्मणजे ही चीफ सेक्रेटरीचीच. ह्या वेळीं ते केवळ ३० वर्षांचे होते; आणि प्रथम प्रथम तर लोक त्यांना बच्चा सेक्रेटरीच ह्मणत असत. सर रॉबर्ट पील व माजी अर्ल डार्बी यांनाही अशीच संज्ञा लोकांनीं पूर्वीं दिलेली होती. लॉर्ड नास यांनीं आपल्या बंधूस ह्या प्रसंगीं लिहिलेल्या पत्रांत, एवढ्या हुद्द्याच्या जागेस आपण पात्र आहों किंवा नाहीं, ह्याविषयीं संशय दर्शविला आहे. तथापि आपलें कर्तव्य उत्कृष्ट रीतीनें बजावण्याविषयीं होईल तितका प्रयत्न करण्याचा आपला कृतसंकल्प आहे, असेंही त्यांनीं त्या पत्रांत लिहिलें आहे. ते म्हणतातः— ‘ कामकाजासंबंधानें मी अगदीं नवखा आहें खरा; तथापि कांहीं झालें तरी त्याची मला दिक्कत वाटत नाहीं. ’

ही हुद्द्याची जागा पतकरल्यानंतर लॉर्ड नास हे पुनः निवडून येण्याकरितां ऐर्लंडास परत आले. परंतु किल्डेअर परगण्याच्या १८४७ च्या स्थितींत अंतर पडल्याचें त्यांना दिसून आलें. दुष्काळाच्या मुदतींत ते फार लोकप्रिय झाले होते. ह्यामुळेंच त्या सालीं निवडणुकीच्या प्रसंगीं अवश्य तितकीं मतें त्यांना कशीं तरी मिळवितां आलीं. त्यांच्याविषयीं लोकांच्या मनांतील तो उत्साह

१८५२ त नाहींसा होणें साहजिक होतें. ह्यास्तव किल्डे-
अर परगण्यातर्फें निवडून येण्याच्या भानगडींत न पडतां,
त्यापेक्षां ज्या ठिकाणीं कमी खटाटोप पडेल अशा, कोले-
रीनतर्फें निवडून येऊन स्वस्थ बसणें लॉर्ड नास यांना वि-
शेष शहाणपणाचें वाटलें. ह्याप्रमाणें ऐर्लंडांत उत्तर भागीं
असलेल्या ह्या कोलेरीन गांवातर्फें १८५२ पासून १८५७
पर्यंत ते पार्लमेंटांत सभासद होते; व पुढें कंबर्लंड मधील
कॉकरमथ गांवातर्फें ते सभासद झाले. ह्या ठिकाणातर्फें
निवडून येण्याचे बाबतींत यांना विंढ्याम घराण्यांतील
माणसांचें, म्हणजे यांच्या कुटुंबाच्या माहेरवरच्या माण-
सांचें, साहाय्य मिळालें. पुढें १८६८ त हिंदुस्तानांत
येईपर्यंत ते सतत ह्या गांवातर्फें पार्लमेंटांत सभासद होते.

लॉर्ड नास यांची ऐर्लंडच्या चीफ सेक्रेटरीच्या हुद्द्या-
वर नेमणूक झाल्यानंतर थोडी मुदत राज्यसूत्रें कॉन्सर्व्हे-
टिव्ह पक्षाच्या हातीं होतीं. ह्या मुदतींत कुळांचा* हक्क
व कुळांना मोबदला देण्यासंबंधीं कायदा ह्याचा
मसुदा तर त्यांनीं पार्लमेंट सभेपुढें आणिलाच. शिवाय
ऐर्लंडसंबंधाचे इतर कित्येक अति महत्त्वाचे कायद्याचे
मसुदेही त्यांनीं त्या सभेपुढें ठेविले. ते ऐर्लंड प्रकरणीं
मात्र बोलत; आणि कॉन्सरव्हेटिव्ह पक्षानें १८५२ त
कामाचा राजीनामा दिल्यानंतर १८५८ त त्यांजकडे
पुनः राज्यसूत्रें येत तोंपर्यंतच्या मुदतींतही त्यांनीं तो क्रम
अव्याहत सुरू ठेविला. ह्या सहा वर्षांच्या मुदतींत ऐर्लं-

* A Tenant-Right and a Tenant's Compensation Act.

डांतील कॉन्सर्व्हेटिव्ह पक्षाचे पार्लमेंटांतील पुढारी वस्तुतः हेच होते. तसेंच कॉमन्स सभेंत ऐर्लंडांतील जे कॉन्सर्व्हेटिव्ह सभासद होते, त्यांचे पुढारीही हेच होते. ह्यांचे वडील हौस ऑफ् लॉर्ड्समध्यें ( बडे लोकांच्या सभेमध्यें ) सभासद होते, व ते कान्सर्व्हेटिव्ह पक्षाच्यातर्फें मत देत असत. तथापि ते भाषणें वगैरे क्वचित् करीत; आणि राज्यकारभाराच्या वगैरे गोष्टींत फारसें मन घालीत नसत.

पुढें क्रिमियासंबंधीं* युद्ध उपस्थित होऊन ब्रिटिश बेटांतील बहुतेक कुटुंबां तून मोठी काळजी उत्पन्न झाली; अर्थात् ह्या बर्क घराण्यांतील माणसांनाही झाली. अर्ल ऑफ् मेयो यांचे दुसरे चिरंजीव कर्नल ऑनरेबल † जॉन बर्क यांजकडे पलटणीसंबंधीं एका हुद्द्याचें काम होतें. तें सोडून देऊन '८८ वी कनाट रेंजर्स' नांवाच्या पलटणीला युद्धाच्या ठिकाणीं जाण्याचा हुकूम सुटला तेव्हां तेही तिजबरोबर गेले. ह्या वेळीं अर्ल् ऑफ् मेयो व त्यांच्या पत्नी

---

* हें युद्ध रशिया व तुर्कस्तान ह्या दोन राष्ट्रांमध्यें १८५४–५६ पर्यंत झालें. यरुशलेम येथील पवित्र ठिकाणीं जाणाऱ्या यात्रेकरूंना वागविण्यासंबंधाच्या तंट्यावरून हें युद्ध उपस्थित झालें. ब्रिटिश व फ्रेंच ह्यांनीं तुर्कस्तानचा पक्ष स्वीकारिला. परिणामीं रशियन लोक जेरीस येऊन त्यांनीं १८५६ च्या मार्च महिन्यांत पारिस येथें तह केला; तेव्हां हें युद्ध आटोपलें. ह्या युद्धामुळें ब्रिटिश राष्ट्राला पांच कोट पौंड नवीन कर्ज झालें; आणि २०००० हून जास्त ब्रिटिश सैन्य रणभूमीवर पडलें. ( भा. क. )

† वडे लोकांच्या घराण्यांतील कित्येक पुरुषांस व मोठमोठ्या पदवीच्या कित्येकांस सन्मानार्थ **ऑनरेबल** ही पदवी लावितात. ( **राईट आनरेबल** ही ह्याहून वरच्या दर्ज्याची पदवी होय. ) ( भा. क. )

कौंटेस ऑफ् मेयो हीं उभयतां पारिस शहरीं राहात होतीं. ह्यामुळें ह्या युद्धासंबंधीं हरएक आणीबाणीच्या प्रसंगाची माहिती आपल्या मातापितरांस देण्याचें काम लॉर्ड नास यांजवर पडलें. ह्या घोर युद्धामुळें ह्या कुटुंबांतील माणसांच्या मनावर कसेकसे परिणाम घडत गेले, त्यांचें स्मरण त्या प्रसंगीं त्यांनीं लिहिलेल्या पत्रांवरून होतें. तें वर्णन प्रत्यक्ष वस्तुस्थितीस अगदीं धरून असून तें वाचून अतःकरण अगदीं सद्गदित होतें. आपला बंधु लढाईस गेल्याबद्दल सप्रेम अभिमान, त्याच्या सुरक्षिततेबद्दल मनाला खाणारी चिंता, आणि युद्ध एकदांचें लवकर संपावें अशी मोठ्या कष्टानें दाबून टाकिलेली अनिवार इच्छा; ह्या तीन प्रकारच्या मनोविकारांनीं तीं पत्रें ओतप्रोत भरलीं आहेत; आणि कोणत्याही राष्ट्राला युद्धसंबंधीं जें कांहीं खरें शिक्षण पाहिजे तें ह्या तीन गोष्टींचेंच होय. सारांश, आपले आप्तस्वकीय युद्धास गेले असतां सर्वांना अभिमान वाटला पाहिजे; मग त्यांजविषयीं त्यांनीं काळजी वाहिली व युद्ध लवकर संपण्याची इच्छा धरिली, तरी त्यांत कांहीं वावगें नाहीं. ह्या ८८ व्या पलटणीनें आपलें कर्तव्य बजाविलें; आणि तिच्या निशाणावर तिनें दाखविलेल्या पराक्रमाच्या ठिकाणांची जी यादी आहे तींत अल्मा,* इंकरमन व सेव्हास्टपूल हीं नांवें आढळतात. तथापि ह्या पलटणींतील ठार होणाऱ्या व जखमी होणाऱ्या लोकांच्या

* क्रिमियन युद्धामध्यें झालेल्या ह्या तीन लढाया होत. ह्यांतील पहिल्या दोन लढाया १८५४ मध्यें आणि तिसरी १८५५ मध्यें झाली. ह्या तिन्ही ठिकाणीं रशियन लोकांचा मोड झाला. ( भा. क. )

ज्या यादी वेळोवेळीं येत, त्यांजकडे लॉर्ड नास यांचे कसे डोळे लागून राहिलेले असत, ह्याचाच मुख्यत्वेंकरून त्यांच्या ह्या पत्रांत उल्लेख आहे; त्या पलटणीनें केलेल्या पराक्रमांची वगैरे हकीकत त्यांत नाहीं.

त्यांच्या आईचें मन आपल्या मुलाच्या सुरक्षिततेसंबंधानें नेहमीं साशंक असल्यामुळें ती चिंताग्रस्त असे. अशा स्थितींत केव्हां धर्मसंबंधी चार समाधानाच्या गोष्टी सांगून व केव्हां दैवावर हवाला ठेवण्यास सांगून तिचें शांतवन करण्याची खटपट लॉर्ड नास हे करीत. ते तिला लिहीतः—" धीर धर, आणि त्याच्या सुरक्षिततेसंबंधानें ईश्वरावर भार ठेव. लढाईवर गेलेल्यांपैकीं दोन हजार माणसें मृत्यु पावलीं किंवा जखमी झालीं आहेत खरीं. तथापि लढाईवर गेलेल्या एकंदर सैन्याशीं ताडून पाहतां जवळ जवळ सातास एक हें प्रमाण पडणार आहे. तेव्हां आपला मानव जातीचा तर्क चालवून पाहिलें असतां देखील हें प्रमाण आपल्याला अनुकूळच आहे. तथापि आपण भरंवसा ठेवणें तो युद्धदेवतेवरच ( मंगळावरच ) ठेविला पाहिजे. ' आणखी कांहीं दिवसांनीं ते लिहितातः—' माझ्या प्रियकर आई, युद्धांत मृत्यु पावलेल्या व जखमी झालेल्या लोकांची याद आतांच आली. आपला प्रिय जानी हा सुखरूप आहे, ह्याबद्दल आपण ईश्वराचे आभारी आहों. ईश्वराची एवढी मोठी कृपा आपणांवर आजपर्यंत कधीं झालेली नाहीं; आणि ह्या कृपेबद्दल आपण जिवांत जीव आहे तोंपर्यंत त्यांचे आभार मानूं, अशी माझी खात्री आहे. याद काय भयंकर आहे! '

युद्ध सुरू होतें तोंपर्यंतच्या त्या हिवाळ्याच्या काळांत ह्यांना युद्धसंबंधी काळजी रात्रंदिवस असे; व तिचे परिणाम त्यांच्या आयुष्यक्रमांतील अगदीं किरकोळ गोष्टींतही दिसून येत होते! ते एका पत्रांत लिहितातः—' गेल्या सोमवारीं मी बालिनास्लो गांवीं गेलों होतों; तेथून मी ३१ कालवडी विकत आणिल्या. त्यांना किंमत विलक्षण म्हणजे १५ पौंड १५ शिलिंग पडली; आणि हीच चणचण कायम राहिली नाहीं, तर ह्या व्यापारांत फायदा होणार नाहीं. तथापि ह्यांच्याहून कमी किंमतीच्या कालवडी त्या जत्रेंत कोठेंच नव्हत्या. रात्रीं मुक्कामास मी लार्ड क्लांकरी यांच्या घरीं गेलों. जानीच्या पलटणपैकीं जान बर्क हे तेथें होते. त्यांनीं जानीविषयीं मला बरीच हकीकत सांगितली. ते म्हणाले कीं, जानीनें आपलें काम चांगल्या रीतीनें केलें. ते आणखी म्हणाले कीं, इंकरमनची लढाई आटोपल्यावर आपली पलटण सोडून दुसऱ्या कांहीं विशेष कामगिरीवर जातांना मीं त्याला पाहिलें. तेव्हां तो इतक्या धिमेपणानें गेला कीं, जणूं काय तो नेहमींच्या कवायतीच्या ठिकाणावरूनच जात आहे.'

इकडे कॉन्सर्व्हेटिव्ह पक्षाकडील राज्यसूत्रें लिबरल पक्षाकडे जाऊन त्या पक्षाकडे सहा वर्षें केवळ प्रतिपक्षाचें काम असतां त्या मुदतींत लॉर्ड नास हे आपल्या पक्षाच्या तर्फें चांगली कामगिरी बजावीत होते. पार्लमेंटांतील कॉन्सर्व्हेटिव्ह पक्षाच्या ऐरिश सभासदांचें प्रेम व त्यांचा विश्वास ह्यांनीं संपादिला; आणि १८५८ त लॉर्ड डार्बी यांजकडे राज्यसूत्रें आलीं; तेव्हां त्यांनीं ऐर्लंडच्या चीफ सेक्रेटरीची जागा

लॉर्ड नास यांस पुनः देऊं केली. त्या वर्षी व त्याच्या पुढील वर्षी त्यांनीं सभेपुढें आणिलेल्या कायद्यांच्या खर्ड्यांच्या लांबलचक यादीवरून त्यांच्या आंगच्या तरतरीची साक्ष पटते.

ह्यांनीं सभेपुढें आणिलेल्या कायद्यांच्या मसुद्यांपैकीं मुख्य दोहोंशीं ज्यांचा सरकारी रीतीनें संबंध होता, असे एक गृहस्थ यांच्याविषयीं लिहितातः—' ह्या बाबतींत त्यांच्याशीं माझा जो पत्रव्यवहार वगैरे झाला, त्यावरून मला विशेष आश्चर्य वाटलें तें असें:—कायद्याच्या दृष्टीनें मसुदे कसे असावेत ह्या विषयांत निष्णात लोकांनीं हे मसुदे ठरविल्यानंतर देखील लॉर्ड नास हे त्यांतील चुका दाखवून देत. ह्या चुका आमच्या कोणाच्याही लक्षांत आलेल्या नसत. ज्याप्रमाणें एकादा विद्वान् एकाद्या उदाहरणांतील चूक तेव्हांच दाखवून देतो, त्याप्रमाणें ह्या मसुद्यांतील व्यंगें ते तेव्हांच काढीत. केव्हां केव्हां तर ते येथून तेथवर सर्व कलमें आपल्या हातानें खोडून टाकीत, व तीं स्वतः पुनः लिहून काढीत; आणि म्हणतः—" हें पहा; हें आतां पाहिजे तर तुम्ही कायद्याच्या भाषेंत लिहा; परंतु मला जो कांहीं अर्थ हवा आहे, तो असा. " तसेंच एकाद्यानें करून आणिलेला मसुदा कल्पनेला मोठा व्यवस्थित व नीटनेटका दिसला तरी ते म्हणतः " हा मसुदा मोठा उत्तम दिसतो आहे खरा; परंतु कॉमन्स सभा ह्याच्याकडे लक्षही देणार नाहीं." ह्या सुमारास त्यांना असें वाटूं लागलें कीं, ऐर्लंडच्या खरोखर कल्याणाची गोष्ट आपल्या हातून प्रत्यक्ष घडून येण्याची फारशी आशा नाहीं. हे निराशेचे विचार उत्पन्न

होण्याचें कारण खुद्द ऐरिश लोकांतील व पार्लमेंटांतील दुफळ्या हें होय. फीनियन* लोकांबद्दल त्यांच्या मनांत आदरबुद्धि नव्हतीच; तसेंच अति दुराग्रही अशा ऑरेंज† पक्षांतील लोकांविषयींही होतीसें मला वाटत नाहीं. ह्या दोन्ही पक्षांतील लोकांमुळें देशाचें सारखेंच नुकसान होत आहे, अशी त्यांची समजूत असे. तसेंच त्यांना असें वाटे कीं, देशाच्या कल्याणार्थ सौम्य असा उपाय योजण्याची खटपट करणें अशक्य होय. कारण ह्यांतील कोणत्या तरी पक्षाकडून किंवा कदाचित् दोन्ही पक्षांकडूनही त्या कामीं हरकती येण्याचा संभव आहे.

ह्या निराशेच्या विचारामुळें **कुळांच्या हक्कासंबंधीं कायद्याचे मसुदे** आणि **शिक्षणविषयक कायद्याचे उपाय** ह्या दोन प्रकरणीं तर त्यांचें मन वारंवार खट्टू होत असे. तथापि भिन्न भिन्न मतांचे त्यांचे जे मित्र होते, त्यांजविषयीं त्यांच्या मनांत अति आदरबुद्धि होती. तसेंच ते हेंही जाणत होते कीं, आपण ह्या दोन प्रश्नांसंबंधानें जे उपाय सुचविणार ते कांहीं त्यांना पसंत पडावयाचे नाहींत. तथापि तसे उपाय सुचविणें आपलें कर्तव्य आहे. असें

---

* ऐर्लंडांत एक गुप्तरीतीनें कारस्थानें करणारी मंडळी असून त्या देशांत प्रजासत्ताक राज्यपद्धति स्थापण्याचा त्या मंडळीचा मुख्य उद्देश आहे. ह्या मंडळींतील लोकांना फीनियन्स म्हणतात. ( भा. क. )

† प्राटेस्टंट मताचें वर्चस्व कायम करण्यासाठीं व क्याथलिक मताचा प्रतिकार करून त्याचा ऱ्हास करण्यासाठीं १७९५ त ऐर्लंडांत एक मंडळी स्थापित झाली होती व तिचें काम गुप्तपणें चालत असे. अशा मंडळींना ऑरेंज पक्ष म्हणत. ( भा. क. )

त्यांस कळून आलें; तेव्हां त्यांच्या मनाला फार वाईट वाटलें; कारण तेणेंकरून आपल्या मित्रांचें मन दुखविण्याचा प्रसंग त्यांना आला. अशा प्रसंगीं ते त्यांना म्हणत:–' ठीक आहे; माझा हा कायद्याचा मसुदा तुम्हांला पसंत नाहीं, तर पुढील वर्षीं *राडिकल पक्षाकडून ह्याहूनही अप्रशस्त असा एकादा मसुदा तुम्हांला निमूटपणें मान्य करावा लागेल. ऐर्लंडवर त्यांचें प्रेम कांहीं अलोट होतें; आणि ह्या प्रेमामुळेंच त्या देशाच्या हितार्थ श्रम करीत असतां वेळोवेळीं मनाची होणारी अस्वस्थता त्यांना सहन करतां आली. तेथील लोकांवर त्यांची ममता असे; तेथील पूर्वेकडून वाहणाऱ्या वाऱ्याचे किंवा अति कडाक्याच्या थंडीचे दिवस जरी त्यांना नको असत, तरी एकंदरीनें तेथील हवा त्यांना पसंत असे; तेथले खेळ वगैरे त्यांना आवडत; आणि तेथील मित्रमंडळीवर व शेजाऱ्यापाजाऱ्यांवर त्यांची ममता असे. लॉर्ड डंकेलिन नांवाचे एक गृहस्थ राजकीय बाबतींत यांचे प्रतिस्पर्धी होते. तथापि ते मृत्यु पावले तेव्हां यांनीं असे उद्गार काढिले:—" डंकेलिन यांच्या मृत्यूनें देशाचें मोठें नुकसान झालें. त्यांचें ऐर्लंडवर इतकें अकृत्रिम प्रेम होतें व ऐर्लंडच्या स्थितीचें त्यांना इतकें उत्तम ज्ञान होतें कीं, आपणां सर्वांचें खरें कल्याण त्यांच्या हातून कधीं तरी झालें असतें. "

---

* राजकीय प्रकरणीं सुधारणा होण्यासाठीं विलक्षण उपाय योजण्याविषयीं ज्यांचें मत असतें, त्यांना राडिकल–कट्टे लिबरल–म्हणतात. ( भा. क. )

लॉर्ड नास यांच्या पार्लमेंटसंबंधी कामकाजांत त्यांशीं पुढें ज्यांचा अति निकट संबंध जडला, असे एक त्यांचे जोडीदार प्रधान त्यांजविषयीं असें लिहितात:—" लॉर्ड मेयो यांचे विचार त्यांच्या पक्षाच्या विचारांपेक्षां पुष्कळच उदात्त होते; ह्यामुळें त्यांना स्वतःला फारसें समाधान नसे. ते कॉन्सर्व्हेटिव्ह प्रधानमंडळांतील एक प्रधान होते खरे; तथापि त्या प्रधानमंडळापैकीं मि. डिझ्रायली यांना मात्र त्यांचीं मतें पूर्णपणें मान्य होतीं, असें मला वाटतें. त्या काळचे ते पक्के कॉन्सर्व्हेटिव्हही नव्हते; तसेंच त्या वेळच्या लिबरल पक्षाच्या मताप्रमाणें पाहिलें असतां ते लिबरलही नव्हते. तर, आपल्या हातून खरोखर कांहीं देशकल्याण व्हावें अशी इच्छा असल्यास ह्या दोन पक्षांपैकीं कोणत्या तरी पक्षाला मिळणें अवश्य आहे, अशा समजुतीचे ते एक उदार विचारांचे मुत्सद्दी होते. एस्टॅब्लिश्ड् चर्चसंबंधानें त्यांची स्वतःची मोठी पूज्यबुद्धि होती. तरी आपल्या मर्जीस येईल तो धर्मपंथ पसंत करण्याचा प्रत्येक माणसास अधिकार आहे, हें मत त्यांस मान्य होतें; आणि अमुक एक धर्मानें मोक्षसाधन व्हावयाचें नाहीं, असें ते कधीं म्हणत नसत. जमीनजुमला वगैरे ज्यांचा त्यांजकडे सुरक्षित राहण्यास अवश्य असे हक्क जमीनदारांकडे कायम राखण्याची त्यांची इच्छा असे. तथापि जमिनीची प्रत्यक्ष लागवड करणाऱ्या कुळांना त्यांच्या श्रमाचा मोबदला मिळाल्यास मध्यंतरीं कायद्याच्या दृष्टीनें किंवा धंद्याच्या दृष्टीनें ज्या कित्येक अडचणी येतात, त्या दूर करण्याविषयीं ते फार उत्सुक होते.

देशांतील शेतजमीन व शेतकरी ह्यांजमध्यें खरोखर सुधारणा व्हावी, एवढीच त्यांची इच्छा असे; मग ती कोणाकडून किंवा कोणत्या रीतीनें झाली ह्याची त्यांना पर्वा नसे. जमिनीची सुधारणा करण्यासाठीं योजिलेल्या ज्या उपायांपासून जमीनदार व कुळें ह्या उभयतांचेंही सारखें हित होईल, ती सुधारणाच चिरकाळ टिकेल, अशी त्यांची पक्की समजूत होती. त्यांचें मत असें होतें:—"तुम्ही जर माझ्या जमिनीची स्थिति सुधाराल तर तेणेंकरून तुमचें नुकसान कधीं होणार नाहीं; आणि ह्याच्या आड जर एकादा नियम अथवा कायदा येत असेल तर तो दूर केला जाईल." ह्या मताचें प्रतिपादन ते असें करीत कीं, एकादा जमीनदार अशा सुधारणांच्या आड येईल तर त्याचीच जमीन निकृष्टावस्थेंत राहून त्याचें स्वतःचें नुकसान होईल; आणि आपल्या जातिबांधवांना-कुळांना देखील त्यानें अन्यायानें वागविल्याप्रमाणें होईल. विचारस्वातंत्र्य, धर्मस्वातंत्र्य आणि आचारस्वातंत्र्य यांची योग्यता ते प्रत्यक्ष प्राणाहूनही अधिक मानीत. धर्मविषयक अधिकाराचा किंवा इतर सरकारी अधिकाराचा उपयोग करून एकाद्यास दहशत वगैरे दाखवून एखाद्या कृत्यापासून त्याला परावृत्त करणें, किंवा अप्रशस्त उपायांनीं त्याला एकादी गोष्ट करण्यास भाग पाडणें; ह्याचा त्यांना मोठा तिरस्कार असे. दरिद्रावस्थेंत किंवा विपत्तींत असलेल्या सर्व माणसांविषयीं त्यांच्या अंतःकरणांत सदा सर्वकाळ सहानुभूति असे. वेड लागलेले गरीब लोक, कैदी व निकृष्टावस्थेस पोहोंचलेले इतर लोक ह्यांच्या सुखासाठीं परि-

श्रम करण्याविषयीं त्यांच्या मनाला सर्वकाळ प्रेरणा असे; त्यांच्या हितार्थ त्यांनीं पुष्कळ कामगिरी बजाविली; व तीही उत्कृष्ट प्रकारें बजाविली. '

यांच्या दुसऱ्या एका जोडीदार प्रधानानें अर्ल ऑफ डार्बी यांनीं-सरकारी अधिकारी ह्या दृष्टीनें ह्यांच्या स्वभावाचें वर्णन मोठ्या खुबीनें केलें आहे. तें असें:—"एकादा पुरुष उद्योगी व कुशाग्रबुद्धीचा असून इतर कित्येक गुणही त्याच्या आंगीं असले म्हणजे आपण त्याला व्यवहारचतुर समजतों. अशा दृष्टीनें पाहिलें असतां ह्या गुणांत त्यांची बरोबरी करणारीं माणसें माझ्या पाहण्यांत फारशीं नाहींत, थोडींच आहेत. तसेंच आपल्या परलोकवासी मित्राच्या स्वभावांतील ठळक गुण म्हटले म्हणजे त्यांच्या मनाचें औदार्य व ज्यांत कपटाचा लेश नाहीं असा त्यांचा विनोदी सुस्वभाव हे होत; आणि ह्या गुणांच्या संबंधानें यांची बहुतेक बरोबरी करणारे, कित्येक लोक मला माहीत आहेत. तथापि हे दोन्ही प्रकारचे गुण ज्याच्या आंगीं इतक्या सारख्या प्रमाणानें व इतक्या उत्कृष्ट रीतीनें वसत आहेत, असा मनुष्य ह्यांच्याशिवाय मला आजपर्यंत आढळला आहे किंवा नाहीं ह्याची शंकाच आहे. एकाद्या विषयावरील वादविवाद किती कां निरस असेना; लॉर्ड मेयो हे सहज एकादी कोटी करून त्याला तेव्हांच रंग आणीत. मंडळीला गार करून सोडण्याचे जे अप्रतिम गुण त्यांच्या आंगीं होते, त्यांपैकीं त्यांचा हा विनोदी स्वभाव मुख्य होय. विषय कितीही घोटाळ्याचा असेना, हे त्याचा सरळ रीतीनें व मोकळ्या मनानें विचार करीत.

ह्यामुळें त्याचा उलगडा लागण्यासाठीं यांच्याकडून कांहीं तरी अशी शक्कल निघावयाचीच कीं जी तुमच्या ध्यानांत पूर्वीं आलेली नाहीं. ”

लॉर्ड डार्बी पुढें म्हणतातः—“ राज्यकारभाराच्या कामीं यश येण्यास, ज्या लोकांशीं आपला संबंध जडेल त्यांचें मन वळवून घेणें किती महत्त्वाचें आहे ह्याचें ज्ञान त्यांना पूर्णपणें होतें. तथापि ह्या ज्ञानाचा उपयोग त्यांना केवळ अनुमानधपक्यानें करावयाचा नव्हता; तर त्यांचा स्वभावच असा होता कीं, तेणेंकरून असा परिणाम सहजीं घडून यावा. ते उदारपणाचीं कृत्यें करीत, व उदारपणाच्याच गोष्टी बोलत. परंतु असें करण्यांत एक प्रकारचें राजधोरण आहे, किंवा अशा तऱ्हेनें वागल्यास राजकीयदृष्ट्या आपलें महत्त्व वाढणार आहे, अशा समजुतीनें त्यांचें तसें वर्तन नसे; तर तो त्यांचा देहस्वभावच होता, व ह्यामुळें तसें वर्तन त्यांना टाळतां येण्याजोगें नव्हतें. ह्या जगांत त्यांना कोणी वैरी असेल असें मला वाटत नाहीं. तसेंच दुसऱ्याच्या मनांत काय विचार घोळत आहेत, हें जितकें जाणतां येण्यासारखें आहे, तितकें जाणून मी असें म्हणतों कीं, सूड उगवणें म्हणजे काय, ही कल्पना त्यांच्या अंतःकरणाला कधीं शिवली नाहीं. ज्या प्रसंगीं मनोनिग्रह दाखविणें अवश्य, तेव्हां तो दाखविल्याशिवाय ते राहात नसत; अडचणीच्या प्रसंगीं त्यांचे विचार मोठे परिपक्व असत, व अशा अडचणीही त्या काळीं अनेक येत; आणि त्यांचा सर्वांत महत्त्वाचा गुण ह्मणजे त्यांच्या आंगची शांतवृत्ति होय. अति आणीबाणीच्या प्रसंगीं तर ही वृत्ति विशेषच स्पष्टपणें

ध्यानांत येत असे. ऐर्लंडसंबंधी प्रकरणीं आम्हांला त्यांज-बरोबर कामें करण्याचे प्रसंग येत; ह्यामुळें त्यांच्या आंगच्या ह्या गुणांची साक्ष आम्हांस देतां येते. "

ह्यांच्या संबंधानें अभिप्राय देण्याचा ज्यांना योग्य अधिकार पोहोंचतो, असे एक गृहस्थ लिहितातः—" हे एका मोठ्या खात्याचे अधिकारी असून तशा अधिकाऱ्यास अवश्य असे उत्कृष्ट गुण ह्यांच्या आंगीं होते. पहाटेस उठणें, वेळच्या वेळीं कामें करणें आणि सदा सर्वकाळ उद्योगांत असणें, ह्या गुणांच्या संबंधानें त्यांचें उदाहरण मोठें अनुकरणीय होय. तसेंच आपल्या हाताखालच्या प्रत्येक कामगाराकडून होण्याजोगें असेल तितकें सर्व काम कोणत्याना कोणत्या प्रकारें कसें करून घ्यावें, ही खुबी त्यांना पक्की कळून आली होती. आपल्यापुढें आलेल्या कामकाजांच्या कागदांत एकादीच चूक असली तरी तेवढी नेमकी दाखवून देण्याची हातोटी त्यांना साधली होती. दुसऱ्या कोणत्याही अधिकाऱ्याच्या आंगीं ही हातोटी इतक्या पूर्णपणें आल्याचें मला दिसून आलें नाहीं. एकदां मीं असें पाहिलें कीं त्यांनीं सरकारी कागदपत्रांची एक मोठी फाईल उघडली; आणि क्षणांत एका प्रकरणाच्या मूळच्या मजकुरांतील किंवा विषयांतील चूक ताडकन् दाखवून दिली. मी एकदां कायद्याचा एक मोठा मसुदा त्यांच्या हातीं दिला. तो मसुदा सरकारी कायदेपंडितांनीं फार काळजीपूर्वक तपासून सुधारलेला होता. तरी देखील त्यांनीं एका क्षणांत कारकुनाचा हस्तदोष दाखवून दिला, असें मीं पाहिलें. पुढें असेंही आढळून आलें कीं, ही एवढीच चूक त्यांत राहि-

लेली होती. एकाद्या खात्याचा मुख्य अधिकारी कसा असावा, ह्याचें प्रत्यक्ष उदाहरण माझ्या दृष्टीनें लॉर्ड नास हे होत; म्हणजे कामाच्या प्रत्येक शाखेचें त्यांना ज्ञान असे; आपल्यापूर्वीं होऊन गेलेल्या अधिकाऱ्यांनीं केलेल्या बहुतेक सर्व कृत्यांची त्यांना पुरी माहिती असे; आणि अडचणी उपस्थित झाल्या असतां घोटाळून न जातां त्या दूर करण्यास ते सदा तत्पर असत.

लॉर्ड नास यांजकडे फक्त एका खात्याचें काम होतें; आणि त्यांच्या वीस वर्षांच्या पार्लमेंटांतील कारकीर्दींत जेव्हां जेव्हां त्यांच्या पक्षाकडे राज्यसूत्रें येत, तेव्हां तेव्हां ह्याच खात्याचें काम यांजकडे येत असे. ह्या कामासंबंधीं इतकी विलक्षण हातोटी त्यांना साधण्याचें मुख्य कारण प्रायः हें होय. आरंभापासूनच ऐर्लंड हा त्यांनीं आपला प्रधान विषय ठरविलेला होता; आणि त्यांचा कपडालत्ता जसा त्यांच्या आंगवळणीं पडला होता, त्याचप्रमाणें तें चीफ सेक्रेटरीचें काम, त्या कामासंबंधीं नियम, मामूल वहिवाटी व तत्संबंधीं अगदीं किरकोळ गोष्टी देखील त्यांच्या आंगवळणीं पडल्या होत्या.

१८५२ त कॉन्सर्व्हेटिव्ह पक्षाकडून राज्यसूत्रें गेलीं; आणि पुढील सात वर्षे त्यांजकडे प्रतिपक्षाचें कर्तव्य आलें. तेव्हां पार्लमेंटांत त्या पक्षाचे जे ऐरिश सभासद होते, त्यांचा पुढारीपणा पुनः लॉर्ड नास यांजकडे आला. यांचें कोणाशीं वांकडें नव्हतें; मात्र कॉन्सर्व्हेटिव्ह व लिबरल ह्या दोन्ही पक्षांचे जे कट्टे लोक ऐर्लंडांत होते, त्यांतील कित्येकांशीं यांचें बरें नव्हतें. राजकीय बाबतींत यांच्या

ेरुद्ध पक्षाला असलेले लोक—म्हणजे लिबरल पक्षाचे लोक—
:खील वारंवार यांचा सल्ला घेत; व त्यांजकडून त्यांना
या प्रत्यक्ष उपयुक्त सूचना होत, त्या मान्य करण्यास ते
त्पर असत. ह्यांतील तत्त्व हेंच कीं, ऐर्लंडच्या हिताचे
ायदे मंजूर होण्याविषयीं ते फार उत्सुक असत; ते कायदे
ोणत्या पक्षाकडून होत आहेत इकडे त्यांचें तितकें लक्ष
से. त्यांच्या एका जोडीदार कामदाराचा उतारा मागें दिला
ाहे; त्यांतही ह्या गोष्टीचा उल्लेख आलेला आहे. इतकेंच
वळ नव्हे, तर १८४९ त पार्लमेंटांत यांनीं केलेलें
ाषण ह्यांच्या विरुद्ध पक्षाच्या प्रधानमंडळाच्या तर्फेचें
तें. तसेंच पुढें त्यांच्या पक्षाकडून त्यांना हुद्द्याची जागा
ाळाल्यानंतर जेव्हां जेव्हां आपल्या पक्षाचीं मतें त्यांना
ान्य नसत, तेव्हां तेव्हां त्यांना प्रत्यक्ष आपल्या पक्षाविरुद्ध
ाषण करितां येईनासें होई, हें ठीकच होतें. तथापि ऐर्लंडच्या
रोखर कल्याणासाठीं एकादा मनुष्य झटतो आहे, असें
ांना कळून आलें, म्हणजे ते त्याला मदत देण्यास सदा
:सुक असत.

कॉन्सर्व्हेटिव्ह सभासदांकडे सात वर्षें केवळ प्रतिपक्षाचें
र्तव्य असतां लॉर्ड नास यांनीं ह्या मुदतींत आपल्या देशा-
बंधानें अनेक विषयांवर मोठीं जोरदार भाषणें केलीं.
ांतील कित्येक विषय येणेंप्रमाणें:—तुरुंगाची व्यवस्था;
नाथांस आश्रय; राष्ट्रीय आणि मिश्र—मुलांमुलींस एकत्र
ळणारें—शिक्षण; पोलीसखात्याची व्यवस्था; शेतकीच्या
ीनें देशाची सप्रमाण स्थिति; व रेजिस्ट्रेशनसंबंधीं कायदा
मोठे नांवाजण्यासारखे वक्ते होते असा कांहीं भाग नाहीं

परंतु हे आपले विचार मोठ्या सयुक्तिक रीतीनें व जोरानें प्रदर्शित करीत; आणि ज्या विषयावर बोलावयाचें त्याचें पूर्ण ज्ञान करून घेऊन नेहमीं भाषण करीत. १८६६ त कॉन्सर्व्हेटिव्ह पक्षाकडे पुनः राज्यसूत्रें आलीं; तेव्हां लॉर्ड डार्बी यांनीं प्रधानमंडळांत यांचा समावेश करून ऐर्लंडच्या चीफ सेक्रेटरीची जागा यांना तिसऱ्यानें दिली; आणि १८६८त हिंदुस्तानांत येण्यास निघेपर्यंत त्यांनीं ह्या हुद्दयाचें काम केलें. ह्यांच्या राजकीय चळवळीची कमाल ह्याच मुदतींत झाली. पार्लमेंट सभेपुढें ह्या दोन वर्षांत त्यांनीं आणिलेल्या म्हणा, किंवा हुद्द्याच्या नात्यानें त्यांनीं मंजूर करून घेतलेल्या म्हणा, कायद्यांच्या मसुद्यांची नुसती यादी येथें देऊं लागलें असतांही कित्येक पानें भरतील. हे कायदे ज्यांचा उल्लेख मागें वेळोवेळीं आलेला आहे त्याच विषयांवर होते, आणि ऐर्लंडची स्थिति व ऐर्लंडच्या गरजा ह्यांचा बहुतेक सर्व बाजूंनीं त्यांत विचार झालेला होता. आणि ह्या दोन वर्षांत फीनियन लोकांनीं ऐर्लंडांत फारच चळवळ उडविल्यामुळें तशा दृष्टीनें मुख्यत्वें हीं वर्षें इंग्लंडांत प्रसिद्ध आहेत. ह्या चळवळी ह्या काळापूर्वीं व नंतरही सुरू असून त्या निरनिराळ्या नांवांखालीं मोडत होत्या; व त्याजमुळें ऐर्लंडसंबंधीं प्रधानाचा मोठाच गोंधळ उडे. तथापि ऐर्लंडच्या प्रत्यक्ष राज्यकारभारांत ह्या दोन वर्षांत नीट विचारपूर्वक ठरविलेली सुधारणा झाल्यामुळें त्या देशांत हीं दोन वर्षें त्या दृष्टीनें प्रसिद्ध आहेत.

हीं दोन वर्षें म्हणजे लॉर्ड नास यांच्या पक्क्या परीक्षेचाच काळ होता. ह्या मुदतींत त्यांच्या एका जोडीदार

कामगारानें त्यांच्या संबंधानें असें लिहिलें आहे:— " १८६७ त यांच्या हातून कायद्याचे मसुदे तयार होत होते त्यांची संख्या ३५ हून कमी नव्हती. हे सर्व विषय भिन्न भिन्न तऱ्हेचे असून ह्यांतील प्रत्येक विषय बिकट होता. असें असतांही ह्या सर्व विषयांसंबंधीं इतकी माहिती एका माणसाला आपल्या डोक्यांत कशी सांठवितां आली, याचें मला राहून राहून मोठें आश्चर्य वाटे. तथापि मला नेहमीं असें आढळून येई कीं, ह्यांतील प्रत्येक विषयाचें त्यांना इत्थंभूत ज्ञान असे. मीं एकादा फेरफार सुचविला असतां त्या संबंधानें तत्क्षणीं चर्चा करण्यास ते सिद्ध असत. आणि मीं जी कांहीं एक व्यवस्था सुचविली असती, तिच्या अनुरोधानें आपण आपला मसुदा कां बनविला नाहीं, ह्याचें कारण देण्यास ते तयार असत. त्यांचें प्रसंगावधान केव्हांही नाहींसें होत नसे. १८६७ तील मार्च महिन्यांत एके दिवशीं उजाडतें न उजाडतें तोंच लॉर्ड नास यांजकडून मला निरोप आला कीं, आपल्या भेटीची मला इच्छा आहे. त्या दिवसाचें मला पक्कें स्मरण आहे. ऐर्लंड-संबंधीं ऑफिसामध्यें त्यांच्या खोलींत मी गेलों तेव्हां आपल्या टेबलापाशीं ते एक पत्र लिहीत बसले होते. त्या प्रसंगीं ते नेहमींपेक्षांही चांगल्या स्थितींत असून कामकाजामुळें त्यांना थकवा आल्याचें मुळींच चिन्ह नव्हतें; आणि त्यांच्या मनाची किंचितही चलबिचल झालेली नसून ते अगदीं शांत दिसत होते. त्यांनीं माझ्या हातांत एक तार दिली, व आपलें पत्र लिहिण्याचें काम सुरू केलें. डब्लिन शहरानजीक फीनियन लोकांनीं गेल्या रात्रीं बंडावा माज-

विल्याचा मजकूर त्या तारेंत मीं वाचिला. मी कबूल करितों कीं, तो वाचल्याबरोबर माझी तर फार गाळण उडाली, व ती दृष्टोत्पत्तीस न येऊं देण्याचा प्रयत्नही मीं केला नाहीं. तथापि लॉर्ड नास यांच्या तेव्हांच्या वर्तणुकीचें विस्मरण मला केव्हांही व्हावयाचें नाहीं. त्या तारेची नक्कल राणीसरकारांकडे पाठविण्यास व प्रधानमंडळापुढें ठेवण्यासाठीं एकंदर हकीगतीचें प्रकरण तयार करण्यास त्यांनीं क्षणभरही विलंब लाविला नाहीं. सर्वांत एका गोष्टीनें मात्र त्यांचें मन विशेष बुचकळ्यांत पडलें. ती कोणती म्हणाल तर त्या तारेनंतर तिकडील बातमी येण्याचें एकाएकीं अजी बंद पडलें. आम्ही इकडून तारांवर तारा करीत होतों; तथापि दोन प्रहरांनंतर बराच वेळ जाईपर्यंत स्पष्ट तऱ्हेचें एकही उत्तर आम्हांस मिळालें नाहीं. त्यांनीं सर्व हुकूम अगदीं शांत रीतीनें व व्यवस्थितपणें दिले; जणूं काय ते नेहमींचेंच कामकाज पाहत आहेत. रात्रींच्या रात्रीं ऐर्लंडास जाऊन पुनः शांतता होईपर्यंत तेथें राहण्याचा त्यांचा निश्चय तेव्हांच ठरला होता.

“ आपण केलेल्या बंदोबस्तासंबंधानें त्यांना पक्का भरंवसा होता; आणि बंडाचा विशेष भयंकर फैलाव कधीं व्हावयाचा नाहीं असें आपलें मत त्यांनीं स्पष्टपणें व्यक्त केलें होतें. तथापि लांब लांब अंतरावर राहणाऱ्या लोकांच्या सुरक्षिततेविषयीं त्यांना मोठी काळजी होती. तसेंच लुच्चे लोकांच्या ज्या लहान लहान टोळ्या ऐर्लंडांत होत्या, त्यांचीही त्यांना धास्ती होती; कारण ह्या राजकीय पुंडाव्याच्या धामधुमीची संधी साधून ठिकठिकाणीं इतर गुन्हे करण्यास

तें नीच लोक प्रवृत्त होण्याचा संभव होता. ते आणखी ह्मणतातः—' वर्तमानपत्रांतील बातम्यांच्या योगानें सर्वत्र हाहाकार उडून जाईल, आणि ऐर्लंडाला वेढा घालून तेथें लष्करी कायदा सुरू केलाच पाहिजे, अशी ओरड सुरू होईल; याचें मला सर्वांत विशेष भय वाटतें. ह्या ओरडीला मान देऊन त्याप्रमाणें करण्याचें मीं नाकारिल्यास त्याचा विपरीत अर्थ केला जाईल, व तेणेंकरून थोडा वेळ जास्तच दहशत उत्पन्न होईल, हें मी जाणतों; तथापि तशा ओरडीला मी कधीं भिणार नाहीं. "

लॉर्ड मेयो यांचें चरित्र हा प्रस्तुत पुस्तकाचा विषय असल्यामुळें फीनियन लोकांच्या त्या बंडाचे काय काय प्रकार घडले, त्यांचें वर्णन येथें देण्याची आवश्यकता नाहीं. त्यांचे सदहू जोडीदार कामगार असें लिहितातः—" त्या दंग्याला बंड हें नांव देणें म्हणजे त्याचें फाजील स्तोम वाढविणें होय. ह्या बंडाचा त्यांनीं तेव्हांच शेवट लाविला. आपणा स्वतःस योग्य वाटेल तेच उपाय योजून लॉर्ड नास यांनीं तें बंड मोडिलें; म्हणजे त्यांनीं कोणाच्या धमक्यांना किंवा कोणाच्या विनवण्यांना जुमानिलें नाहीं; जें करणें तें विचारानें व दृढनिश्चयानें केलें; आणि वर्तमानपत्रांनीं निष्कारण उडविलेला हाहाकार, कॉमन्स सभेंतील ऐर्लंडसंबंधीं देशाभिमानी सभासद किंवा बंडवाले ह्यांच्या योगानें त्यांनीं आपल्या मनावर परिणाम होऊं दिला नाहीं. बंड मोडून ते लंडन शहरीं परत आल्यानंतर त्यांनीं सरकारी कायद्याचे मसुदे सभेपुढें ठेवण्याचें काम सुरू केलें; जणूं काय मध्यंतरीं कांहीं विशेष

प्रकार घडलाच नाहीं. अशा रीतीनें ह्या वर्षांत त्यांनीं तयार केलेल्या कायद्याच्या मसुद्यांपैकीं निदान १८ मसुद्यांना राणी सरकारचा रुकार मिळाला."

१८६७ च्या जान्युआरी महिन्यांत त्यांची आई मृत्यु पावली. तसेंच त्यांचे वडील तिच्यामागून सहा महिन्यांनींच वारले; आणि १८६७ च्या आगस्ट महिन्याच्या बाराव्या तारखेस लॉर्ड नास हे अर्ल आफ् मेयो झाले.

मध्यंतरीं कॉन्सर्व्हेटिव्ह प्रधानमंडळाकडे कॉमन्स सभेंत निमेहून कमी सभासद राहिले. तेव्हां १८६८ त असें स्पष्टपणें दिसून आलें कीं, ह्या पक्षाच्या सर्वच राजधोरणासंबंधानें विरुद्ध पक्षाकडून—लिबरल पक्षाकडून—अपवाद घेण्यांत येईल; आणि ह्या कामीं ऐर्लंड प्रकरणावर विशेष भिस्त ठेवण्यांत येईल. ह्याप्रमाणें त्या वर्षाच्या बैठकींत मि. मग्यूर यांनीं अशी सूचना आणिली कीं, ऐर्लंडच्या स्थितीचा विचार करण्यासाठीं सर्व कॉमन्स सभेची एक कमिटी नेमण्यांत यावी. मि. मग्यूर हे त्या वेळीं कॉर्कच्या वतीनें सभासद होते. ह्या प्रसंगीं सरकारतर्फे भाषण करण्याचें काम लॉर्ड मेयो यांजकडे होतें. ह्यांच्या या वेळच्या पार्लमेंटांतील भाषणापासून तेव्हां कांहीं फायदा झाला नाहीं खरा. तथापि ऐर्लंडच्या राजकीय इतिहासांत ह्या भाषणाच्या योगानें अतिमहत्त्वाच्या माहितीची भर पडली.

ह्या प्रसंगीं यांच्याबरोबर काम करीत असलेले एक अधिकारी लिहितातः—हें भाषण फार काळजीपूर्वक तयार करणें अवश्य होतें. ऐर्लंडांत फीनियन लोकांच्या चळवळी सुरू असून तेथील प्रजेंत असमाधान उत्पन्न झालेलें

होतें खरें; तरी देखील ऐर्लंडची एकंदरीनें सतत भरभराट होत होती, हें दाखविण्याचा त्यांचा हेतु होता. तेथें प्रत्यक्ष घडलेल्या गोष्टी, तेथील लोकांच्या स्थितीविषयीं आंकडे आणि इतर प्रमाणें दाखवून त्यांनीं आपलें म्हणणें निर्विवाद सिद्ध केलें. इतकी सप्रमाण माहिती गोळा करून ती व्यवस्थित रीतीनें जुळविण्याचें काम चांगल्या सशक्त माणसाचीही खात्री करणारें होतें; आणि दुःखाची गोष्ट ही कीं, लॉर्ड मेयो यांची प्रकृति त्या वेळीं फार अस्वस्थ होती. ह्यांचें भाषण झालें त्याच्या आदल्या दिवशीं ह्यांना घराबाहेरही पडवत नव्हतें; आणि प्रत्यक्ष भाषण झालें त्या दिवशीं तरी त्यांची प्रकृति त्यापेक्षां किंचित् बरी असेल इतकेंच. त्या दिवशीं त्यांनीं एकंदर बारा तास आपल्या भाषणाची माहिती व आंकडे ह्यांचा ताळमेळ पाहण्यांत घालविले. इतक्या वेळांत त्यांनीं कांहीं एक खाल्लें नाहीं; कारण अशा प्रकारें कामकाजांत गुंतलें असतां कांहीं खावयाचें नाहीं, असा त्यांचा शिरस्ता असे. ते बोलावयास उभे राहिले, तेव्हां आजारी असून अशक्तही झालेले होते; व एकदां तर त्यांना बहुतेक बोलवेनासेंच झालें. ह्यांना अगदीं किरकोळ व निरस गोष्टी सभेपुढें मांडावयाच्या होत्या. तेव्हां वरील एकंदर हकीगतीवरून सहज ध्यानांत येईल कीं, ह्या किरकोळ गोष्टी मोठ्या जोरदार भाषेनें किंवा मनोरंजक रीतीनें त्यांना सांगतां आल्या नाहींत. वास्तविक पाहिलें असतां ह्यांचें भाषण खरोखर मुद्देसूद असून त्यांत कोणत्याही गोष्टीसंबंधानें व्यंग नव्हतें. तरी श्रोतृसमाजाला तें फार लांबलचक व कंटाळवाणें वाटलें.

तथापि मागाहून तेंच भाषण वाचलें तेव्हां आम्हां सर्वांची अशी खात्री झाली कीं, तें माहितीनें भरलेलें आहे, ती माहिती सत्याला धरून आहे, ती काळजीपूर्वक जुळलेली आहे, आणि न्यायशास्त्रदृष्ट्याही ती निर्दोष आहे. सारांश, ह्या सर्व बाजूंनीं पाहिलें असतां प्रतिपक्षानें आणिलेल्या आरोपांना तें अगदीं बिनतोड उत्तर होतें.

लॉर्ड मेयो यांच्या मनालाही ह्या भाषणामुळें कित्येक दिवस समाधान नव्हतें. असा प्रकार घडण्याचें कारण इतकेंच दिसतें कीं, कित्येक भाषणांतून किरकोळ गोष्टी पुष्कळ येऊन त्या फार घोंटाळ्याच्या असतात; ह्यामुळें तशीं भाषणें प्रत्यक्ष ऐकण्यापेक्षां वाचण्यालाच बरीं असतात. तशांतलेंच त्यांचें हें भाषण होतें. ऐर्लंडच्या स्थितीसंबंधानें हें भाषण आधारभूत धरण्यास योग्य आहे, ही गोष्ट आतां सर्वसंमत आहे; आणि त्या देशासंबंधीं सप्रमाण माहितीचें हें भाषण म्हणजे एक कायमचें भांडार झालें असल्यामुळें दोन्ही पक्षांतील मुत्सद्दी ह्यांतील आधार घेतात. ‘ विशेष उदात्त ’ अशा प्रकारचें एक राजधोरण तेव्हां प्रसिद्ध होतें; आणि लॉर्ड मेयो यांनीं वरील भाषण केलें तेव्हां अशी बातमी उठली कीं, त्यांचा उद्देश तशा प्रकारच्या राजधोरणाकडे आहे. त्यांचे हेतु ज्यांस माहीत होते असे एक गृहस्थ लिहितातः—“ आपल्या देशबांधवांच्या शिक्षणासाठीं, त्यांच्या दुःखाचा परिहार करण्यासाठीं, किंवा त्यांना मदत देण्यासाठीं ज्या ज्या संस्था स्थापिलेल्या असतील त्यांना सरकारांतून द्रव्याची मदत असावी; मग त्या संस्था क्याथलिक पंथाच्या आहेत किंवा प्राटेस्टंट पंथाच्या आहेत, इकडे

लक्ष देण्याचें प्रयोजन नाहीं; तसेंच कोणतीही शाळा, दवाखाना अथवा अनाथाश्रम, ह्यांतील एकादी संस्था अमुक एक धर्मपंथाची आहे, अथवा तिच्या चालकांचा धर्मपंथ अमुक आहे, एवढ्याच कारणानें मोडकळीस येणें योग्य नाहीं; अशी त्यांची इच्छा असे. ऐर्लंडांतील धर्मखात्यासंबंधीं खर्च भागावा ह्मणून जो एक कर गोळा होत असे, त्यापैकीं त्या कामीं अगदीं अवश्य तितकाच खर्चून बाकीचा पैसा वरील संस्थांकडे लाविल्यानेंही त्यांना विशेष समाधान वाटलें असतें; असें माझें मत आहे. केवळ इतक्या दृष्टीनें मात्र त्यांचा कल ' विशेष उदात्त ' अशा प्रकारच्या पद्धतीकडे होता. "

दहा वर्षांपूर्वी चीफ सेक्रेटरीचें काम हे दुसऱ्यानें पाहत असतां अशा गोष्टी घडून आल्या कीं तेणेंकरून ऐर्लंडच्या खरोखर कल्याणाचें कृत्य आपल्या हातून घडणें फार कठीण आहे, अशी त्यांच्या मनाची समजूत होणेंच साहजिक होतें; व तेव्हांपासून ही समजूत विशेष दृढ होत गेली. मध्यंतरीं कांहीं काळ ह्यांच्याकडे केवळ प्रतिपक्षाचें कर्तव्य असतां त्या वेळची स्थिति, तसेंच तिसऱ्यानें चीफ सेक्रेटरीचें काम यांजकडे आलें तेव्हांचा अनुभव; ह्या दोन्हींवरून तर ऐर्लंडच्या राज्यकारभारांत सुधारणा होणें अति आवश्यक आहे, अशी त्यांची पक्की खातरी होऊन चुकली. तथापि त्यांच्या मनाचाही कल विशेष दृढ झाला कीं, अशी सुधारणा करूं लागल्यास आपणास अडथळे येण्याचा संभव आहेच. ह्या संबंधानें एखादें मत खात्रीपूर्वक देतां येण्याजोगें नाहीं. तथापि असें ह्मणण्यास हरकत नाहीं कीं,

कॉन्संर्व्हेटिव्ह पक्षाच्या मानानें लॉर्ड मेयो यांचे विचार विशेष उन्नत होते; तरी ते इतके उन्नत नव्हते कीं विरुद्ध —लिबरल—पक्षांतील लोकांनीं हें सुधारणेचें काम त्यांजकडे सोंपवावें. ह्यास्तव ऐर्लंडसंबंधानें विशेष उदात्त असे कायदे ठरविण्याचें काम थोड्याच काळानें त्या लिबरल पक्षाकडे गेलें.

शिवाय सर्व इंग्लिश लोकांचें मतही असेंच दिसत होतें कीं, ज्यांचें एकंदर राजधोरण उदात्त तत्त्वांवर कायदेकानू वगैरे करण्याचें ठरलेलें आहे, त्यांजकडूनच हें ऐर्लंडच्या सुधारणेचें काम उत्तम प्रकारें होईल. ऐर्लंडसाठीं अशा प्रकारचे कायदेकानू वगैरे ठरविण्याची आवश्यकता आहे, असा लॉर्ड मेयो यांचा पक्का ग्रह झालेला होता. परंतु ते इंग्लंडांतील सुधारणापक्षापैकीं—लिबरलपक्षापैकीं—नव्हते; किंवा ज्या तजविजीमुळें लिबरल पक्षाच्या लोकांचें समाधान होऊन आपल्या पक्षाचीही अनुकूलता आपणास राहील, अशी एकादी तजवीज त्यांना काढतां येणें शक्य नव्हतें. ह्यास्तव मन कितीही उद्विग्न झालें तरी आपलें काम इमानेंइतबारें चालू ठेवणें एवढेंच त्यांचें कर्तव्य होतें. त्यांनीं १८६६—६८ पर्यंतच्या तीन वर्षांत तयार करून पार्लमेंटांत मंजूर करून घेतलेल्या कायद्यांच्या खर्ड्यांच्या संख्येवरून म्हणा, किंवा ऐर्लंडांतील राज्यकारभाराच्या उपायांच्या प्रत्यक्ष अंमलबजावणींत केलेल्या सुधारणांवरून म्हणा; हीं तीन वर्षें त्यांच्या इंग्लंडांतील एकंदर कारकीर्दींतील अत्यंत उपयुक्त होत. तथापि आपल्या हातून फार मोठी कामगिरी बजा-

वली जाईल अशी प्रारंभीं त्यांना मोठी उमेद होती, व तितकी कामगिरी बजावणें आतां त्यांना अशक्य वाटूं लागलें होतें. त्या आरंभींच्या अजमासाशीं ताडून पाहतां ह्यांजकडून ह्या तीन वर्षांत प्रत्यक्ष घडलेली देशसेवा अगदीं क्षुल्लक असल्यामुळें त्यांना निराशा उत्पन्न झाली; व आपल्या हातून विशेष काय घडलें असा प्रश्न मनांत येऊन ह्यांच्या मनाला टोंचणी लागली. पुढें थोड्याच काळानें यांच्या एका भावाचा इंग्लंडांतील एका विभागातर्फे पार्लमेंटांत शिरकाव झाला. तेव्हां त्यांची नुकती झालेली निराशा त्यांच्या मनाला खातच होती. म्हणून त्यांनीं आपल्या बंधूला लिहिलें:—“ ऐर्लंडप्रकरणांत मन न घालण्याविषयीं माझा तुम्हांला उपदेश आहे. तेथील राजधोरणांत हात घालण्यापासून कांहींएक यशप्राप्ति व्हावयाची नाहीं; आणि तसें करणें तुमचें कर्तव्य आहे, अशी कांहीं तुमची स्थिति नाहीं. ”

तथापि ह्या सर्व अडचणी त्यांनीं ज्या प्रकारें सोशिल्या, व त्यांस न जुमानितां त्यांनीं त्या देशासाठीं प्रत्यक्ष जी कांहीं कामगिरी बजाविली, तेणेंकरून इंग्लंडांतील कोणत्याही पक्षाशीं संबंध नसणाऱ्या कामगारांनीं त्यांची फार वाहवा केली. १८६८ च्या पहिल्या सहामाहींत इंडिया* कौन्सिलमधील एक प्रमुख मंत्री लॉर्ड मेयो यांच्या एका बंधूजवळ म्हणाले कीं, लॉर्ड लॉरेन्स यांच्यामागून त्यांच्या

---

* हिंदुस्तानच्या राज्यकारभारावर देखरेख ठेवण्यासाठीं इंग्लंडांतील प्रधानमंडळामध्यें हिंदुस्तानाकरितां एका स्टेट सेक्रेटरीची नेमणूक होत असते; व त्याला मदत करण्यासाठीं एक कौन्सिल ( मंत्रिमंडळ ) असतें, त्याला **इंडिया कौन्सिल** म्हणतात. ( भा. क. )

जागीं तुमच्या बंधूंची योजना होण्याचा संभव आहे. ह्या मंत्र्यांना हिंदुस्तानांतील कामकाजांचा चांगलाच अनुभव असून हिंदुस्तानच्या राज्यकारभारावर नजर वगैरे ठेवण्यासाठीं इंग्लंडांत स्टेट सेक्रेटरींचें जें ऑफिस आहे त्यांतील कामाचाही ह्यांना उत्तम अनुभव होता. हे गृहस्थ लॉर्ड मेयो यांच्या बंधूंपाशीं असेंही बोलले कीं, इंडिया कौन्सिलमधील मंत्र्यांचा कल तुमचे बंधूच ह्या जागेला अतियोग्य आहेत, असा आहे. ही हकीगत त्यांच्या बंधूंनीं त्यांना कळविली, तेव्हां त्यांनीं उत्तर दिलें:—"असा कांहीं मुळींच भाग नाहीं. ते दुसरे एक गृहस्थ माझ्याप्रमाणेंच त्या जागेला लायक आहेत, व माझ्याहून त्यांचा हक्कही अधिक पोहोंचतो." परंतु पार्लमेंटाची ती बैठक खलास होण्याची वेळ ठेपत चालली तेव्हां एके दिवशीं ते आपल्या बंधूंस म्हणतात:—"खरें आहे; मि. *डिझरायली यांनीं हिंदुस्तानासंबंधानें मजपाशीं गोष्ट काढिली! तुमच्या पक्षाकडे राजसूत्रें आहेत तोंपर्यंतच व्हाइसरायची जागा खालीं झाल्यास कोणाचें नांव सुचविण्याचा तुमचा विचार आहे, असें राणी सरकारांनीं आपणास विचारिल्याचें त्यांनीं मला कळविलें. तसेंच, मीं कित्येक नांवें सुचविलीं असून त्यांत तुमचेंही आहे; आणि तुह्मीं ऐर्लंडप्रकरणीं कामगिरी ज्या प्रकारें बजाविली त्या संबंधानें राणी सरकारांनीं फार संतोष प्रदर्शित केला, असेंही ते म्हणाले." मि. डिझरायली यांनीं लार्ड मेयो यांस कळविलें कीं, कानड्याच्या गव्हर्नर जन-

* हे अर्ल ऑफ् डार्बी यांच्यामागून १८६८ च्या फेब्रुआरी महिन्यांत प्राइम मिनिस्टर ( मुख्य प्रधान ) झाले. ( भा. क. )

रलची जागा देखील खालीं व्हावयाची आहे, व ती तुम्हांला तेव्हांच मिळूं शकेल. मात्र हिंदुस्तानच्या व्हाइसरायची जागा पुढील जानेवारीशिवाय खालीं व्हावयाची नाहीं; आणि त्या प्रसंगीं हल्लींच्या प्रधानमंडळाकडे सत्ता राहील किंवा नाहीं, ह्याची खात्री देतां येत नाहीं; असेंही त्यांनीं सुचविलें.

ह्यानंतर कित्येक दिवस गोष्ट तशीच राहिली. कानड्याच्या गव्हर्नर जनरलची जागा लॉर्ड मेयो यांनीं पतकरिल्यास त्यांना आपल्या मुलांबाळांना तिकडे बरोबर नेतां आलें असतें. परंतु हिंदुस्तानच्या व्हाइसरायची जागा पतकरिल्यास मुलांबाळांना इंग्लंडांत ठेवून एकटेंच त्यांना इकडे यावें लागलें असतें. तथापि इकडील राज्यकारभार विशेष महत्त्वाचा असल्यामुळें आपल्या आंगची कर्तबगारी येथें दाखविण्यास त्यांना येथें विशेष जागा होती. तेव्हां मुलांवरील त्यांच्या प्रेमामुळें एकदां कानड्याची जागा पतकरण्याकडे त्यांचें मन जाई; परंतु व्हाइसरायच्या जागेचें महत्त्व विशेष, ह्यामुळें लागलेंच त्यांचें मन हिंदुस्तानाकडे वळे. आपल्या आंगची विशेष कर्तबगारी दाखवितां येण्यास हिंदुस्तानच्या व्हाइसरायची जागा योग्य असून तेथें त्यांना स्वातंत्र्यही विशेष मिळणारें होतें. म्हणून वेळ येईल तेव्हां ती जागा आपणास मिळण्याचा संभव असल्यामुळें तिजवर हवाला ठेवून कानड्याची जागा नाकारण्याचें त्यांनीं अखेरीस ठरविलें. कांहीं महिन्यांनीं व्हाइसरायची जागा पतकरण्याविषयीं त्यांना विचारिलेंच; आणि तेव्हांपासून त्यांच्या पार्लमेंटांतील कारकीर्दीची समाप्ति झाली.

लॉर्ड मेयो यांनीं ऐर्लंडांत नुकत्याच बजाविलेल्या कामगिरीसंबंधानें, व त्या कामगिरीचा मोबदला त्यांस देण्याविषयीं राणी सरकारचें मन वळण्यास झालेल्या कारणासंबंधानें, मि. डिझरायली ह्यांनीं त्याच वर्षीं नवंबर महिन्यांत बकिंग्यामशायर येथील मतदारांना अनुलक्षून केलेल्या भाषणांत पुढें लिहिल्याप्रमाणें खुलासा केलेला आहे:--" ऐर्लंडप्रकरणीं माझें पुढें म्हणणें असें आहे कीं, त्या तशा भयंकर धामधुमीशीं यांच्याहून विशेष दृढ निश्चयानें आजपर्यंत कोणी टक्कर दिली नसेल; मात्र असें करितांना त्यांनीं आपल्या मनाची थोरवीही विशेष दाखविली. तसेंच ऐरिश सरकारनें आणि तेथील लॉर्ड लेफ्टेनेंट व चीफ सेक्रेटरी अर्ल ऑफ् मेयो यांनीं ह्या फीनियन लोकांच्या जुटीवर पूर्णपणें दाब ठेवून त्यांचे हेतु निष्फळ केले, आणि त्यांचा मोड करून टाकिला. इतर कोणत्याही चळवळीचा इतक्या पूर्णपणें मोड कधीं झाला नसेल. अर्ल ऑफ् मेयो यांची धूर्तता, त्यांचे परिपक्व विचार, उत्कृष्ट स्वभाव आणि मनुष्यस्वभावाचें त्यांना असलेलें ज्ञान, ह्या त्यांच्या गुणांमुळें हिंदुस्तानच्या व्हाइसरायची जागा त्यांना देण्याविषयीं राणीसरकारची मर्जी झाली आहे; आणि मला असा भरंवसा आहे कीं, हिंदुस्तानचे व्हाइसराय ह्या नात्यानें ते जो लौकिक संपादितील त्याजबद्दल त्यांच्या देशबांधवांस मोठा अभिमान वाटेल; व ह्यांच्यापूर्वीं होऊन गेलेल्या अति प्रख्यात गव्हर्नर जनरलच्या कारकीर्दीप्रमाणेंच यांची भावी कारकीर्द होईल. "

पार्लमेंटांत लॉर्ड मेयो यांची एकंदर कारकीर्द (१८४७-६८) एकवीस वर्षांची झाली. ह्या मुदतींत त्यांचीं १४० भाषणें झालीं; ऐर्लंडच्या चीफ सेक्रेटरीचें काम त्यांनीं तीन वेळां केलें; कायद्याचे ३६ मसुदे तयार करून ते पार्लमेंट सभेपुढें आणिले; आणि तेथें ३३ कायदे अखेर मंजूर करून घेतले. यांच्या १३३ मुख्य भाषणांचा मजकूर हॅनसर्डच्या ५२४ कॉलम भरला; व आपल्या जन्मदेशाच्या राज्यकारभारासंबंधीं प्रत्येक विषयाचें विवेचन ह्या भाषणांतून झालेलें आहे.

तथापि लॉर्ड मेयो यांचा त्यांच्या पक्षाला महत्त्वाचा उपयोग झाला तो त्यांच्या पार्लमेंटांतील हजर राहण्यापासून विशेषतः नव्हे; तर ऐर्लंडच्या प्रत्यक्ष राज्यकारभारांतील किरकोळ गोष्टींसंबंधानें होय. आपण जे कायद्यांचे मसुदे सभेपुढें आणणार, ते विशेष उदात्त विचाराचे वाटून आपल्या पक्षांतील मित्रमंडळींपैकीं पुष्कळांना पसंत पडावयाचे नाहींत; तसेंच उलट पक्षाला ते अवश्य तितके उदात्त न वाटल्यामुळें ते लोक तर विरुद्धच राहणार; अशी दुहेरी चिंता त्यांना सर्वकाळ असे. आपल्या मूळच्या निकट मित्रमंडळीपासून ह्याप्रमाणें तुटकपणानें वागावें लागल्यामुळें त्यांना अति दुःख वाटलें; व ह्या संबंधानें त्यांना कित्येक पत्रें लिहावीं लागलीं. ह्या कामीं आपण स्वतःच्या सामर्थ्यावर भिस्त ठेविल्याचें त्यांनीं त्या पत्रांतून दर्शविलें असून आपल्या मित्रमंडळीस सोडून चालावें लागल्याबद्दल दुःख व खेदही प्रदर्शित केला असल्यामुळें मोठें विलक्षण वाटतें. एका बड्या गृहस्थांस १८६८ त त्यांनीं अशा

प्रकारचें एक पत्र लिहिलें आहे. आपल्या देशांतील परस्परविरुद्ध अशा धर्मपंथांसंबंधानें आपले विचार उदात्त कां असावे, ह्याचें समर्थन त्यांनीं सदहू पत्रांत केलें आहे. तें पत्र फार विस्तृत असल्यामुळें सर्व येथें देतां येत नाहीं. तथापि, कोणत्याही सरकारच्या ताब्यांत जी प्रजा असेल, तिचा जो धर्म तोच त्या सरकारचा धर्म समजावा, आणि त्या प्रजांपैकीं कोणत्याही विवक्षित प्रजेच्या धर्मपंथाचा दुरभिमान त्या सरकारला असूं नये; अशा अर्थाचें माथ्यू आर्नोल्ड* यांचें एक वचन आहे. त्याच वचनाचा विशेष विस्तार त्या पत्रांत लॉर्ड मेयो यांनीं केला आहे, असें तें वाचिलें असतां वाटतें.

लॉर्ड मेयो यांच्या कारकीर्दीवरून त्यांच्याशीं ज्यांचा प्रत्यक्ष संबंध नाहीं अशा राष्ट्रांतील इतर लोकांस ते मोठे भाग्यशाली वाटले. सार्वजनिक कृत्यांत हे पडूं लागले न लागले तोंच आपल्या स्वतःच्या परगण्याच्या वतीनेंच त्यांची पार्लमेंटांत निवड झाली; ऐन तरुणपणांतच ऐर्लंडच्या चीफ सेक्रेटरीच्या जागीं यांची नेमणूक झाली; पुढें दोन वेळां ह्यांच्या पक्षाकडे राज्यसूत्रें आलीं, तेव्हां त्या जागीं ह्यांचीच पुनः पुनः नेमणूक झाली; पार्लमेंटांत व आपल्या गांवाकडील शेजारपाजारच्या मंडळींत हे मोठे लोकप्रिय झाले; आणि प्रमुख प्रधानमंडळांत यांचा समावेश होऊन लोकांचें कल्याण करण्याचें पुष्कळ यांच्यहातीं आलें. शिवाय ऐन तारुण्यांत असतांच वडिलोपा.

* हे एक कवि व विविध विषयांवरील लेखक होऊन गेले. (१८२२–१८८८). (भा. क.)

र्जित इस्टेट यांच्या ताब्यांत येऊन एका प्राचीन बड्या घराण्याचे हे प्रमुख झाले. ह्यांचा बांधा मोठा मजबूत असून शारीरिक आणि मानसिक ह्या दोन्ही प्रकारच्या करमणुकींचा ह्यांना कधीं कंटाळा येत नसे; व समाजांतील आपल्या पदवीस साजेल अशा रीतीनें राहण्यास अवश्य ती संपत्तिही यांजपाशीं हल्लीं होती. तसेंच इंग्लंडांतील बडे लोकांच्या इस्टेटीचा कारभार पाहणें म्हणजे त्यांच्यामागें अनेक प्रकारचें जोखीम असावयाचेंच. परंतु तसलें जोखीमही ह्यांच्या ह्या मोठ्या इस्टेटीसंबंधानें ह्यांजवर न्हवतें.

अशी वस्तुस्थिति होती खरी. तथापि सार्वजनिक कामांत प्रारंभीं पडतांना त्यांनीं जो पक्ष स्वीकारिला, त्यापासून ते सतत अधिकाधिक विलग होत चालले; ह्यामुळें त्या वेळीं त्यांना फार असमाधान वाटत असे. ह्यांचे एक स्नेही असें लिहितात:—“ मला स्मरतें कीं, उन्हाळ्यांत एके दिवशीं संध्याकाळीं आम्ही उभयतां बरेच उशिरापर्यंत एकत्र बसलों होतों; तेव्हां त्यांनीं मोकळ्या मनानें आपलें हृद्गत त्या वेळीं पहिल्यानेंच मला कळविलें. तेव्हां त्यांजविषयीं मला फार वाईट वाटलें. कारण ऐर्लंडच्या हितार्थ त्यांनीं किती प्रकारें कष्ट केले, व त्याचा मोबदला त्यांना किती यःकश्चित् मिळाला, हें मी जाणत होतों. शिवाय माझ्या असेंही ध्यानांत आलें होतें कीं, लोकांचें कल्याण करण्याची संधि सांपडेल असा एकादा हुद्दा आपणांस मिळावा, अशी त्यांना उत्कट इच्छा असे; कारण अशी संधि आल्यास आपल्या आंगचें कर्तृत्व त्यांना जगाला दाखवितां आलें असतें; व आपल्याला वाटतें तितकी शक्ति आपल्या आंगीं वस्तुतः आहे

किंवा नाहीं ह्याची परीक्षा त्यांस पाहतां आली असती. परंतु आपल्या आंगचें सामर्थ्य दाखविण्याचा प्रसंग त्यांना कधीं मिळाला नाहीं.'' सार्वजनिक कामांत ह्याप्रमाणें लॉर्ड मेयो यांचें मन वरचेवर खट्टू होत असे. अशा स्थितींत मनाला समाधान व्हावें म्हणून ते आपल्या कुटुंबांतील माण-सांकडे वळत. मुलांबाळांना आपण त्यांचे स्नेहीसोबतीच आहों असें वाटावें, ह्मणून त्यांचा सदोदित प्रयत्न असे. १८६८ त त्यांनीं मुलांना लिहिलेल्या पत्रांतून तर अति ममतेनें लिहिलेले मौजेचे प्रकार आढळतात; आणि त्या वेळची त्यांच्या स्वतःच्या मनाची अस्वस्थता ध्यानांत आणिली असतां ह्या प्रकाराबद्दल कोणाच्याही मनांत करुणा उत्पन्न झाल्याशिवाय राहणार नाहीं.

ते कोठेंही असोत, तसेंच ते कितीही विलक्षण काळ-जींत असोत अथवा त्यांच्यावर कामाचा केवढाही बोजा पडो; आपल्या मुलांकरितां वेळ त्यांना नेहमीं सांपडत असे. ह्यांनीं मुलांना कित्येक पत्रें कॉमन्स सभेंतच खरडलीं असून कित्येक आपल्या ऐरिश कचेरींत लिहिलेलीं आहेत. तसेंच शिकार किंवा गोळीबाराकरितां हे मधून मधून एखादे दिवशीं खेडेगांवीं जात; तेथूनही अनेक पत्रें त्यांनीं लिहि-लेलीं आहेत. त्या एकंदर पत्रांवरून हे मोठे ममताळू व सुस्वभावाचे गृहस्थ असल्याविषयीं मनाचा पक्का ग्रह होतो. तसेंच आपल्या मुलांबाळांना आपल्या स्नेह्यां-सोबत्यांप्रमाणें वागविण्यांत काय धोरण आहे ह्याचा उमज त्यांना पडलेला होता, असेंही त्या पत्रांवरून स्पष्ट दिसतें.

आपल्या मुलांना पत्रें लिहिण्याचे ह्यांचे मायने मोठे

विनोदाचे असत. ते कोणाला *बटन्स् तर कोणाला **प्रेसि-डेंट** असें म्हणत. ह्यांचा एक मुलगा टेम्स नदीमध्यें होडीं-तून फिरावयास निघण्याच्या बेतांत होता; त्याला त्यांनीं विचारलें कीं, " आपण आपल्या जंगी जलप्रवासाला कधीं निघणार ?" पुढें असें लिहिलें कीं, "माझ्या **पौडर मंकीचें*** कल्याण असो; आणि ईटनहून† तुम्ही कधीं निघणार तें मला कळवा. " दुसऱ्या एका मुलाला ते लिहितातः—" शाळेंतील खालच्या वर्गांतूनच तूं रखडत आहेस हें ऐकून मला फार वाईट वाटतें; कारण अशानें तूं इतःपर मागें मागें पडत जाशील; व तें अनिष्ट होय. परंतु आतां एकच उपाय आहे. तो कोणता म्हणशील तर अति झटून अभ्यास करणें; आणि प्रत्येक सहामाहीस एक एक किंवा दोन दोन इयत्ताही पुऱ्या करून वर जाणें. " काकरमौथ शहरातर्फें कॉन्सर्व्हेटिव्ह पक्षाचे हे सभासद असतां त्या शहराहून त्यांनीं आपल्या एका मुलास लिहिलें:—" मी आपला पत्ता सोबत तुला पाठवीत आहें. तूं आ-पल्या खोलींत तो चिकटवून ठेव, आणि एकादा राडि-कल पक्षांतील मुलगा त्याची थट्टा करील तर त्याचा चांगला समाचार घे. " ते आणखी लिहितातः—" तुझी शाळा तुला आवडते ह्याचा मला आनंद वाटतो. तथापि ती तुला इतकी आवडते, ह्यावरून मला शंका आहे कीं,

---

* आपल्याकडे लहान मुलांना बाळ्या, धोंडू, बज्या इ० टोपण नांवें ज्याप्रमाणें विशेष अर्थ मनांत न आणितां दिलेलीं असतां त्याप्रमा-णेंच हीं टोपण नांवें होत.

† हें विंडसरनजीक एक ठिकाण असून सार्वजनिक शाळांच्या संबंधानें प्रसिद्ध आहे. ( भा. क. )

तुला मानसिक श्रम अवश्य तितके करावे लागत नसतील; तसेंच तुला मारही फारसा खावा लागत नसेल. " दुसऱ्या एका मुलाला वर्गणीसाठीं ३० शिलिंग पाठवून असेंच कांहीं विनोदात्मक त्यांनीं लिहिलें आहे.

प्रसंगीं मुलांना चार उपदेशाच्या गोष्टीही त्यांना सांगतां येत असत. ज्यांशीं सहवास ठेवणें फारसें युक्त नव्हतें अशा कित्येक मुलांशीं आपला एक मुलगा स्नेह करीत आहे, असें लॉर्ड मेयो यांच्या कानीं आलें. ह्या संबंधानें त्यांनीं त्याची कानउघाडणी केली; तेव्हां त्यानें एक जोरदार उत्तर पाठवून त्यांत लिहिलें कीं, माझ्या मित्रांचा स्नेह मला तोडितां यावयाचा नाहीं. पुढें त्यांनीं त्याला उत्तर लिहिलें, तें असें:-" माझ्या लाडक्या, मला तुझें पत्र फार आवडलें; कारण तूं आपलें मन मोकळें करून तें लिहिलें असून आपले विचार मला कळविले आहेस. तूं आपल्या मित्रांचा स्नेह तोडावा, किंवा दुसरें एकादें नीच कृत्य करावें, अशी माझी इच्छा नाहीं. तथापि माझ्या कानावर खचित आलें आहे कीं, एक दोन मुलांशीं तुझें विशेष सख्य झालें आहे; परंतु त्या मुलांविषयीं शाळेंत चांगलासा लौकिक नसून ते तुझ्या योग्यतेचे तर खरोखर नाहींत. हें ऐकून मला फार खेद झाला. कारण माझ्या एकाद्या मुलाला आपल्याच बरोबरीच्या मुलांशीं स्नेह करितां येत नाहीं, हा विचार मला पसंत नाहीं. माझें मत असें आहे कीं, तूं जास्त मुलांशीं ओळख करून घ्यावी; आणि आपल्या जुन्या मित्रांपैकीं कोणाचाही स्नेह न तोडतां सर्वांशींच जास्त दळणवळण ठेवून त्यांच्या

असें ध्यानांत आणून द्यावें कीं, त्यांजपैकीं कोणत्याही मुलाच्या आंगीं तुजपेक्षां अधिक चांगुलपणा नाहीं. उठल्या बसल्या एकदोन मुलांच्याच सहवासांत असणें ठीक नाहीं. तेणेंकरून इतर मुलांच्या मनांत मत्सर उत्पन्न होऊन तीं आपल्यावर विशेष लक्ष ठेवूं लागतात; तसेंच ज्या कित्येक लोकांच्या जोडीनें पुढें तरुणपणीं तुला कामधंदा करण्याचा प्रसंग येईल, किंवा ज्यांशीं तुला टक्कर द्यावी लागेल, अशा अनेकजणांच्या स्वभावांचें परिशीलनही तुला करितां यावयाचें नाहीं. ह्याप्रमाणें माझे विचार आहेत. ह्या विचारांप्रमाणें वागलें असतां काय परिणाम घडतील तें पाहून तूं चालशील, अशी माझी खात्री आहे."

लॉर्ड मेयो यांना खेडेगांवांतून राहाण्याची व तेथील मोकळ्या प्रदेशांत अनेक प्रकारचे खेळ खेळण्याची हौस असे. ह्यामुळें सार्वजनिक कामकाजांतून मनाला अनुत्साह उत्पन्न झाला असतां करमणूक करून घेण्यास हेंही एक साधन होतें. इंग्लंडांत हे एक सामान्य प्रतीचे मुत्सद्दी गणिले जात; हे मोठे धनाढ्य म्हणून किंवा ह्यांच्या घराण्याकडे परंपरागत मोठी सत्ता चालत आली आहे म्हणून ह्यांची प्रसिद्धी नव्हती. तसेंच वक्तृत्वाला अवश्य असे अंगविक्षेप वगैरे यांच्या ठिकाणीं नसून ती एक उणीवच होती. तथापि यांच्या आंगीं व्यवहारज्ञान अति होतें; तसेंच किरकोळ बाबींचीही इत्थंभूत माहिती करून घेण्याचें आणि आपल्या कामकाजांत जिवापाड परिश्रम करण्याचें सामर्थ्य यांच्या आंगीं होतें. ह्यामुळें अखेरीस इंग्लंडांत हे प्रसिद्धीस आले.

परंतु ऐर्लंडांत यांची प्रसिद्धी कांहीं निराळ्याच कारणांनीं होती. तीं कोणतीं म्हणाल तर, शिकार वगैरे खेळांचा यांना केव्हांही कंटाळा नसे; हे अति आनंदी स्वभावाचे असल्यामुळें आपल्या प्रांतांतील मंडळींना यांचा शेजार प्रिय असे; आणि आपल्या मित्रमंडळीसाठीं पाहिजे तितका वेळ व पैसा खर्चण्यास ते नेहमीं तयार असत. दुष्काळांत यांनीं केलेल्या परिश्रमामुळें किल्डेअर परगण्यांत यांचा मोठा लौकिक झाला होता; आणि यांचें अंतःकरण मोठें कनवाळू असून आपल्या सहवासास असलेल्या मंडळींच्या मर्जीप्रमाणें वागण्याचा ऐरिश लोकांचा मोहक गुणही यांच्या अंगीं असल्यामुळें हे उत्तरोत्तर अधिकाधिक लोकप्रिय होत चालले. लॉर्ड मेयो यांचें वर्णन करीत असतां त्यांच्या स्वभावांतील ह्या गुणांचा उल्लेख न केल्यास तें अपुरें राहील. त्यांच्या स्वभावांतील ह्या गुणांमुळेंच आपल्या बहुतेक मित्रमंडळींत ते अति प्रसिद्ध होते. शिवाय ऐर्लंडच्या हितार्थ अनेक कृत्यें करण्याचा ह्यांचा मूळचा हेतु होता; व त्यांपैकीं फार थोडीं आपल्या हातून मंडळी प्रत्यक्ष घडूं देतील असें त्यांना पुढें वाटूं लागलें. हा विलक्षण फरक ध्यानीं येऊन त्यांचें मन बरेंच व्यग्र होई. तशा प्रसंगीं आपलें मन प्रसन्न ठेवून स्वभाव आनंदी ठेवण्याच्या कामीं ह्यांना खेड्यापाड्यांतील गोष्टींच्या असलेल्या हौसेचा कांहीं कमी उपयोग झाला नाहीं.

लॉर्ड मेयो यांच्यांत सामान्य खेळगड्यांपेक्षां कांहीं विशेष होता. अनेक प्रकारचे मर्दानी खेळ स्वतां खेळण्याची ह्यांना अति हौस होतीच. शिवाय त्यांसंबंधीं इतर

माहिती मिळविण्याच्या कामीं हे विशेष परिश्रम करीत; तितका फारसा कोणी करीत नसेल. नुसत्या शिकारीची मौज मारून हे स्वस्थ राहिले नाहींत; शिकारीसंबंधीं इतर बाबतींचेंही त्यांनीं विशेष मनन केलें. घोड्यांची आणि शेतकीसंबंधीं इतर जनावरांची वीण सुधारण्याच्या संबंधानें त्यांनीं पामर्स्टन येथें एक संस्था स्थापून तिची व्यवस्था स्वतां चालविली*.

आतां ह्यांच्या सार्वजनिक कारकीर्दीकडे पुनः वळूं. १८६८ च्या पार्लमेंटाच्या बैठकींत यांचा पक्ष हळू हळू मोडकळीस येत चालला; तसतशा लॉर्ड मेयो यांना आपल्या कामकाजांत अडचणीही विशेष उपस्थित होऊं लागल्या. ह्यामुळें हिंदुस्तानच्या व्हाइसरायची जागा पतकरिल्यानें प्राप्त होणारें स्वातंत्र्य मिळविण्याकडे यांचे डोळे कसे लागून राहिले, ह्याची कल्पना वाचकांस सहज होईल. त्यांचे जोडीदार कामगार लिहितातः—“ त्यांना एकाच गोष्टीचें थोडें वाईट वाटे. त्या जागेवर आपल्या एका मित्राचा डोळा आहे अशी त्यांची समजूत होती; म्हणून आपली त्या जागीं नेमणूक झाल्यास त्याला वाईट वाटेल, अशी त्यांना शंका होती. व्हाइसरायचें काम योग्य रीतीनें पार पाडण्याचें सामर्थ्य आपल्या आंगीं आहे असा त्यांना पूर्ण भरवसा होता खरा; तथापि त्यांच्या वर्तनांत योग्य प्रकारचा विनयही होता; ह्याचें मला फार आश्चर्य वाटे. आपल्या आंगीं पूर्ण सामर्थ्य आहे अशी त्यांची

* ह्यापुढें किल्डेअर परगण्यांत शिकारीच्या वगैरे संबंधानें ह्यांनीं केलेल्या सुधारणांची हकीकत आहे. परंतु ती इकडील वाचकांस विशेष महत्त्वाची नसल्यामुळें येथें दिली नाहीं. ( भा. क. )

समजूत असे; तथापि आपल्यावर किती प्रकारची जबाबदारी पडणार व आपणांस किती अडचणी येणार, त्याही त्यांनीं पूर्णपणें लक्षांत आणिल्या होत्या ! तथापि एक विशेष विचार मनांत येऊन, त्यांना मोठी उमेद उत्पन्न होई. हा विचार म्हणजे, स्वतःस फार प्रशस्त वाटेल तें करण्यास, कोणत्याही गोष्टीचा मर्जीस वाटेल त्याप्रमाणें विचार करण्यास आणि मर्जीस येईल तसा वर्तनक्रम ठेवण्यास आतां आपणांस पूर्ण मुभा आहे, असें मनांत येऊन वाटणारा आनंद. एकाद्या माणसास कांहीं काळ अंधारकोठडींत कोंडून ठेवून नंतर त्याला एकदम उजेडांत आणून सोडावें; तशासारखी त्यांची स्थिति मला भासली. त्यांच्या मनांत घोळणाऱ्या एकंदर विचारांचा निर्देश ‘ अखेरीस साधलें ’ एवढया दोन शब्दांतच होणार आहे. ”

१८६८ मधील पार्लमेंटाच्या सबंध बैठकींत प्रधानमंडळाची सत्ता बहुतेक ढासळत चालली होती. ह्यामुळेंच १८६९ च्या जानेवारीपर्यंत जी जागा वास्तविक खालीं व्हावयाची नाहीं, अशा त्या महत्त्वाच्या जागीं त्यांनीं आपल्यापैकीं एकाची नेमणूक करून ठेविली; अशी लोकांत विशेष टीका झाली. आक्टोबर—नोवेंबरच्या सुमारासच ही नेमणूक प्रसिद्ध करण्याचें कारण वस्तुतः निराळें होतें. तें असें कीं, आपल्या हुद्द्यावर रुजू होण्यापूर्वी राजकीय चळवळीचीं हिंदुस्तानांतील मुख्य मुख्य ठिकाणें प्रत्यक्ष पाहाण्याची इच्छा लॉर्ड मेयो यांना होती. ह्यांत त्यांचा हेतु इतकाच होता कीं, त्या सुमारास विचारांत

असलेल्या कित्येक महत्त्वाच्या प्रश्नांचें सूक्ष्म ज्ञान आपणांस त्या त्या ठिकाणीं करून घेतां यावें. व्हाइसरायची जागा पतकरल्यानंतर लागलींच कित्येक महिन्यांत ह्या प्रश्नांसंबंधीं त्यांजबरोबर वाटाघाट करण्याचा ज्यांना ज्यांना प्रसंग आला, त्यांतील प्रत्येकाच्या स्पष्ट अनुभवास आलें कीं, त्यांनीं तो आपला हेतु पूर्णपणें तडीस नेला. एक सुवेजच्या कालव्यासंबंधी प्रश्न, तर दुसरा मुंबई व मद्रास शहरांतील लोकांचें महत्त्वाच्या विषयांवरील लोकमत; अशा अनेक तऱ्हेचे हे विषय होते. नेमणूक झाली न झाली तों इंग्लंडांत असतांच आपल्या सुदैवानें आपल्याकडे आलेल्या ह्या भावी कामकाजांत त्यांनीं मन घातलें. राहिलेले कित्येक दिवस ऐर्लंडमध्यें घालविण्याची ह्यांची एक अखेरची इच्छा होती; परंतु तीही त्यांनीं तृप्त केली नाहीं. वेळीं अवेळीं इंडिया आफिसांत जाण्याचा क्रम सुरू केला; हिंदुस्तानविषयक प्रश्नांसंबंधानें ज्यांच्या मतांना मोठा मान असे, अशा लोकांची प्रत्यहीं सल्लामसलत घेऊं लागले; त्या लोकांनीं दिलेल्या कागदपत्रांचें मनन करण्यासाठीं रात्रीं दहादहा बाराबारा वाजतपर्यंत परिश्रम चालविले; आणि आपल्या सहवासास असलेल्या मंडळींना हिंदुस्तानासंबंधीं पुस्तकें व कागदपत्रें जमविण्यास त्यांनीं लाविलें.

तथापि हिंदुस्तानच्या व्हाइसरायची जागा प्रत्यक्ष खालीं होईल त्या वेळीं कान्सर्व्हेटिव्ह पक्ष अधिकारारूढ असेल किंवा नाहीं, ह्याची सर्व लोकांस शंकाच होती, व ती खरी ठरली. कारण ती जागा खालीं होण्यापूर्वींच त्या

पक्षानें राजीनामा दिला. शिवाय इंग्लंडांतील वर्तमान-पत्रांच्या दृष्टीनें लॉर्ड मेयो यांचें पार्लमेंटांतील कर्तृत्वही विशेष प्रशंसा करण्याजोगें नव्हतें; ह्यामुळें त्यांच्यावर टीका झाल्याशिवाय राहिली नाहीं. हिंदुस्तान, चीन व आस्ट्रेलिया ह्या संबंधाचीं त्यांचीं कित्येक भाषणें बाजूला ठेविलीं असतां असें आढळून येईल कीं, ह्यांनीं आपणांस केवळ ऐर्लंडाला वाहून घेतलें होतें. इंग्लंडसंबंधीं तत्कालीन राजकारणांत विशेष आस्था ह्यांनीं कधीं दाखविली नसून त्यांचें विशेष ज्ञानही त्यांना असल्याचें दिसून आलें नव्हतें. ते फक्त एका विषयांत निष्णात असून तो विषय म्हणजे ऐर्लंड; आणि हा विषय तर त्या काळीं असा होता कीं, इंग्लिश लोकांना ह्याची कळकळ नसून तो त्यांना पसंत पडणाराही नव्हता. खरोखर पाहिलें असतां ऐरिश प्रश्नांचा वादविवाद सुरू झाला असतां पार्लमेंटांतलि बाकें बहुतेक प्रसंगीं अगदीं रिकामीं पडत. विशेष चळवळीच्या प्रसंगांखेरीज हिंदुस्तानसंबंधीं वादविवादाची जी स्थिति सांप्रत आढळते, तशीच बहुतेक ऐरिश वादविवादांची तेव्हां होती. सारांश, गेल्या वीस वर्षांत ह्यांच्या पक्षाकडे राज्यसूत्रें आलीं तेव्हां प्रत्येक प्रसंगीं पार्लमेंटांतील ऐर्लंडासंबंधीं अति मोठ्या हुद्दयाचें काम ह्यांनीं केलें खरें; तथापि ह्या मुत्सद्दयाची माहिती इंग्लिश लोकांना फारशी नव्हती. *ट्रेझरी बेंचावर ज्याचा पहिल्यानेंच समावेश झाला

* सार्वजनिक पैशाची व्यवस्था ठेवण्यासाठीं, तो गोळा करण्यासाठीं व त्याच्या खर्चासाठीं जें एक सरकारी खातें असतें त्यास इंग्लंडांत **ट्रेझरी** म्हणतात; व त्यांतील कामगारांसाठीं पार्लमेंटांत जीं बाकें असतात, त्यांना ट्रेझरी बेंचें म्हणतात. ( भा. क. )

आहे अशा एकाद्या तरुण वक्त्याची प्रसिद्धिही इंग्लिश लोकांत ह्यांच्यापेक्षां जास्त असेल.

ह्याचें पर्यवसान असें झालें कीं वर्तमानपत्रांनीं ह्या नेमणुकीसंबंधानें एकच गिल्ला उडवून दिला; आणि खुद्द लॉर्ड मेयो व त्यांचे साथीदार ह्या उभयतांचाही सारखाच समाचार घेतल्याशिवाय त्यांची तृप्ति झाली नाहीं. इंग्रज लोकांमध्यें पक्षाभिमान किती असतो, ह्याचे खरोखर विलक्षण मासले त्या काळच्या त्या टीकालेखांपैकीं कित्येक लेख वाचिले असतां ध्यानीं येऊन मोठें आश्चर्य वाटतें. कारण पुढील प्रत्यक्ष अनुभवावरून त्या वेळची ती टीका व्यर्थ ठरते. तथापि येथें असेंही सांगणें वाजवी आहे कीं, ह्यांच्या नेमणुकीविरुद्ध ज्या वर्तमानपत्रांनीं विलक्षण गिल्ला केला होता, त्यांनींच पुढें त्यांची मनःपूर्वक प्रशंसा करण्यांत पुढाकार घेतला. इंग्लंडांत **पंच** नांवाचें एक प्रख्यात विनोदी पत्र आहे. त्या पत्रांत लॉर्ड मेयो यांच्या मृत्यूपूर्वीं तीन वर्षें ह्यांची नेमणूक झाली तेव्हां थट्टामस्करीचा एकसारखा वर्षाव झाला होता. परंतु हे मृत्यु पावल्याबरोबर इंग्लिश लोकांच्या नैसर्गिक न्यायप्रीतीला उकळी फुटली; तेव्हां ह्यांची खरी योग्यता उदार अंतःकरणानें कबूल करण्यांतही त्या पत्राचा पहिला नंबर लागला. त्यांच्या योग्यतेसंबंधानें त्या पत्राच्या ता. २४ फेब्रुआरी १८७२ च्या अंकांत पुढील अर्थाच्या कविता आल्या आहेतः—

१. ऐर्लंडसंबंधी सेक्रेटरीच्या कमी दर्जावरून लॉर्ड मेयो यांची हिंदुस्तानच्या राजप्रतिनिधीच्या ( व्हाइस-

रायच्या ) महत्त्वाच्या पदावर नेमणूक झाल्याचें आपणांस आढळलें; तेव्हां सामान्य अज्ञान लोक ज्याप्रमाणें वरवरच्या बातम्यांवरून कोणत्याही मनुष्याची योग्यता ठरवितात, त्याचप्रमाणें आपणही त्यांच्या योग्यतेचा अंदाज प्रथमतः वरवरच्या माहितीवरून केला होता.

२. तथापि लॉर्ड मेयो यांची ज्यांना पक्की माहिती होती, त्यांना ह्यांची योग्यता विशेष चांगल्या प्रकारें कळली. हे वरून आनंदी व उल्हासी असत; तथापि मुत्सद्दीपणाला अवश्य अशी दूरदृष्टि व जागरूकता ह्यांच्या आंगीं असून इतरांच्या मेहेरबानीखातर त्यांच्या मनांत पक्षपात उत्पन्न होत नसे व त्यांच्या गैरमर्जीच्या भीतीनें ह्यांचें मन उद्विग्न होत नसे; ही गोष्ट त्यांशीं दृढपरिचय असणारांना कळून चुकली.

३. सत्य काय आहे तें हुडकून काढण्याची खुबी त्यांच्या आंगीं असून सत्यालाच अनुसरून वागण्यास अवश्य तितका निर्धारही त्यांच्या आंगीं असे; व हे आनंदवृत्तीचे असल्यामुळें तर ह्या गुणांचा पगडा विशेष पडून कर्तव्य बजावण्याचें जोखमाचें काम त्यांना हलकें जाई; कारण क्षुब्ध झालेल्या लोकांस गोंजारण्याच्या कामीं व अडाणी लोकांस सुधारण्याच्या कामीं त्यांच्या आनंदवृत्तीचा मोठा उपयोग होत असे.

४. ह्याप्रमाणें त्यांचा स्वभाव आनंदी होता खरा; तथापि तशा स्वभावामुळें त्यांची कामकाजांतील तरतरी कमी झाली होती असा कांहीं प्रकार नव्हता; तर सर्व गोष्टी ऐकून घेऊन व सर्वत्र नीट नजर राखून त्यांनीं त्या

अफाट राष्ट्राचा राज्यकारभार चालविला; तो अशा रीतीनें कीं, थेट उत्तरेपासून दक्षिणेपर्यंत व पूर्वेपासून पश्चिमेपर्यंत एकंदर राष्ट्राच्या राज्यरूपी नौकेचें सुकाणूं एका खंबीर नावाड्याच्या हातीं असल्याचें सर्वांच्या अंतःकरणांत नेहमीं वागूं लागलें.

५. येथें व हिंदुस्तानांत दोन्ही ठिकाणीं सर्व लोकांचे उद्गार ह्यांच्याबद्दल चांगले निघत व बहुतेकांचें मतही ह्यांच्याबद्दल चांगलेंच असे; तसेंच ह्यांच्या मित्रांना तर ह्यांच्याबद्दल अभिमान वाटत असे; शत्रुबुद्धि उत्पन्न होण्याजोगें कृत्य ह्यांनीं केलेंच नाहीं. घरीं म्हणा, दारीं म्हणा, सभोंवतालची मंडळी ह्यांच्यावर प्रेमच करी; असें आढळून येई.

६. मेयो यांच्या मृत्यूमुळें एक सार्वजनिक हस्थ गेला; एवढेंच दुःख व्हावयाचें नसून जास्त दुःख झालेंच पाहिजे. कोणत्याही माणसानें आजपर्यंत विजयश्रीची उत्कृष्ट अशी जी माळ मिळविली असेल, तशीच ह्यांनीं चांगल्या प्रकारें मिळविली असून ती त्यांच्या शिरोभागाला शोभवीत आहेच. तथापि ह्यांच्या मृत्यूबद्दल अकृत्रिम दुःख व त्यांच्याविषयीं खरी आदरबुद्धि व्यक्त केल्यानें जर लोकांच्या विव्हल अंतःकरणांस कांहीं समाधान वाटणें शक्य असेल, तर मेयो यांच्या त्या प्रशांत झालेल्या मस्तकावर हीं पद्यरूपी दोन पुष्पें आम्ही अर्पण करितों.

७ विजयश्रीची माळ ह्यांच्या गळ्यांत उशिरां पडली खरी; परंतु त्याच कारणानें ती अद्यापि विशेष टवटवीत आहे; व एकाएकीं रोग उद्भवल्यामुळें तिच्या पाकळ्या

झडून पडल्या आहेत. तेव्हां वाडवडिलांजवळ त्यांना पुर ण्यासाठीं इकडे आणणाऱ्या तारवा, आपल्यांतील ह्या वजनदार प्राण्यासह तूं सावकाश व उद्विग्नतेनेंच प्रवास करीत ये.

लिबरल पक्षाचीं वर्तमानपत्रें देखील आपल्याविरुद्ध आहेत असें आढळल्यामुळें तर लॉर्ड मेयो यांना विशेष खेद वाटला. कारण ऐर्लंडसंबंधी कामें करणें हेंच आपल्या जन्माचें सार्थक्य अशी त्यांची समजूत असून त्या कामीं त्यांचीं स्वतःचीं मतेंही कांहीं अंशीं लिबरल पक्षाप्रमाणें होतीं. तथापि ह्या नेमणुकीची लोकदृष्ट्या एकंदर जबाबदारी प्रधानमंडळावर होती; व ह्यांचें मन खट्टू झालें तें स्वतःच्या संबंधानें फारसें नसून ह्या प्रधानमंडळासंबंधानें होय. त्यांची नेहमींचीच चाल अशी होती कीं स्वतःचा प्रश्न बाजूला ठेवावयाचा. सर स्टॅफर्ड नार्थकोट* यांना त्यांनीं ह्या संबंधानें लिहिलें:—" माझ्या नेमणुकीविषयीं वर्तमानपत्रांतून जे भलभलते लेख येत आहेत, त्यांजबद्दल माझ्या मनाला फार दुःख होतें. स्वतःसंबंधानें मला मुळींच फिकीर नाहीं. तरी ह्या टीकेमुळें सरकारचें नुकसान होऊन हिंदुस्तानांत मी कधींकाळीं प्रत्यक्ष गेलोंच तर माझा चांगलासा बोज तेथें राहाण्यास जड जाईल, अशी भीति मनांत उत्पन्न होतेच. माझें मन ह्या लेखांमुळें अस्वस्थ झालें आहे; तथापि धैर्य खचलें नाहीं. " ते पुनः लिहितातः—" कित्येक दिवस काळजीपूर्वक विचार करू-

---

* हे त्या वेळीं हिंदुस्तानचे स्टेट सेक्रेटरी होते. हल्लींचे (१९०२) मुंबईचे गव्हर्नर हे त्यांचेच वंशज होत. ( भा. क. )

नच मी ही मोठ्या हुद्द्याची जागा पतकरिली आहे. हा देश सोडून जातांना माझ्या मनाला चांगला भरंवसा वाटत आहे; व माझ्या आंगच्या कर्तृत्वाविषयीं माझ्या मित्रमंडळीची असलेली समजूत खरी ठरेल, अशी मला आशा आहे. ह्या नेमणुकीविरुद्ध गिल्ला होणार असें मी धरून चाललोंच होतों; तथापि माझी अशी कल्पना होती कीं, मजवर व्यक्तिविषयक जो गहजब चालला आहे तसा गहजब, माझ्याहातून बरींच वर्षें घडलेल्या लोकसेवेकडे लक्ष देऊन मंडळी उडविणार नाहीं. ह्या संबंधानें माझ्या निंदकांचा मी द्वेष धरीत नाहीं; आणि माझी देवापाशीं सविनय इतकीच प्रार्थना आहे कीं, त्यांचें म्हणणें चुकीचें आहे असें लवकरच सिद्ध करून दाखविण्याचें सामर्थ्य माझ्या आंगीं यावें."

कोणत्याही गोष्टीसंबंधानें सारासार विचार करण्याची लॉर्ड मेयो यांना चांगली सवय असल्यामुळें कोणाशीं हाडवैर धरण्याचा किंवा कोणाचा सूड उगविण्याचा विचार त्यांच्या मनाला क्षणभरही शिवला नाहीं. १८६८ च्या आक्टोबर महिन्यांत ह्यांच्यावर पक्षाभिमानामुळें वर्तमान-पत्रांतून टीका सुरू असून ह्यांची चलबिचल उडाली असतां त्यांनीं आपल्या मृत्युपत्रांत पुढील मजकूर नमूद करून ठेविला आहे:—"माझी अशी इच्छा आहे कीं, जेणेंकरून कोणत्याही प्राण्याला, फार काय, नाहीं नाहीं तीं किटाळें उठवून अदावतीनें मला त्रास देऊन माझी अप्रतिष्ठा करण्याचा ज्यांनीं प्रयत्न केला त्यांनाही—दुःख किंवा त्रास पोहोंचेल असा कोणताही मजकूर माझ्या मर-

णानंतर प्रसिद्ध होऊं नये. " काकरमौथ येथील आपल्या मतदार लोकांना अनुलक्षून ते म्हणतातः—" ही व्हाइसरायची जागा अति उत्कृष्ट असून माझ्यावर पडणारें कामही मोठें अवघड आहे. तथापि हिंदुस्तानांतील ज्या लाखों लोकांच्या संरक्षणाचें काम आपणांकडे आलें आहे, त्याचा फायदा होऊन त्यांना सुख होईल अशा रीतीनें तेथील राज्यकारभार चालविण्याची योग्यता माझ्या आंगीं येण्यास अवश्य तें सामर्थ्य व शहाणपण ईश्वर मला देईल, असा पूर्ण भरंवसा ठेवून व आशा बाळगून मी तिकडे जात आहें. हें मोठ्या जबाबदारीचें काम बजावीत असतां माझ्या हातून चुका घडल्यास तिकडे कोणीं कानाडोळा करावा असें माझें मुळींच म्हणणें नाहीं. माझ्या हातून बरीं वाईट जशीं कृत्यें घडतील तीं लक्षांत घेऊनच अखेर माझ्या कारकीर्दीचा निकाल ठरवावा. तसेंच आपल्या राष्ट्राचें नांव राखण्यासाठीं, सुधारणेचा प्रसार करण्यासाठीं आणि शांतता कायम ठेवण्यासाठीं इमानें इतबारें प्रयत्न केला असतां त्या कामीं माझ्या देशबांधवांची मला नेहमीं सहानुभूति राहून पाठबळ मिळेल, हें मी जाणून आहें. "

ह्या आणीबाणीच्या काळांत मि. डिझरायली यांचा लॉर्ड मेयो यांशीं अव्याहत स्नेहभाव असल्यामुळें त्यांना बरेंच समाधान झालें. पुढें कांहीं काळानें हिंदुस्तानांत यांना चांगलें यश आल्यानंतर त्यांच्या मनाला स्थैर्य प्राप्त होऊन त्यांनीं तेव्हां मोठ्या शांतपणें ह्या पूर्वावस्थेचें सिंहावलोकन केलें. त्या प्रसंगीं आपल्या प्रतिपक्ष्यांविषयीं

विपरीत भाव त्यांच्या अंतःकरणांत मुळींच नव्हता. आपल्या पक्षाचे पुढारी मि. डिझरायली यांनीं त्या काळीं दाखविलेलें अढळ धैर्य व सतत प्रेम ह्यांजबद्दल कृतज्ञता-बुद्धि मात्र त्यांच्या ठिकाणीं होती. मि. डिझरायली यांनीं आपल्या परीक्षेच्या माणसाचीच निवड केली होती; आणि ह्या माणसाविरुद्ध चाललेला गिल्ला निराधार तर खराच, तरी तेणेंकरून त्यांना बराच त्रास होत होता, असें असतांही त्यांनीं तो न जुमानितां लॉर्ड मेयो यांना चांगली मदत दिली.

ऐरिश सेक्रेटरीच्या हुद्द्यावर असतां म्हणा किंवा हिंदुस्तानच्या व्हाइसरायच्या जागीं असतां म्हणा, आपल्या हाताखालच्या कामगारांची बाजू पूर्णपणें कशी सांभाळावी, ह्याचें लॉर्ड मेयो हे स्वतःच प्रत्यक्ष मूर्तिमंत उदाहरण होते. ह्या कामगारांसंबंधानें अभिप्राय देण्याची ज्यांच्या आंगीं योग्यता नाहीं, अशा माणसांनीं त्यांची स्तुति किंवा निंदा केली असतां ती ते निमूटपणें बाजूला ठेवीत; आणि त्या कामगारांच्या मनांत अशी कल्पना भरवून देत कीं, व्हाइसराय साहेबांचें पाठबळ मिळविण्यास आपण पात्र आहों तोंपर्यंत तें मिळावयाचेंच; इतर बाह्य कारणांमुळें किंवा उलाढालींमुळें तें मिळण्यास हरकत कधीं यावयाची नाहीं. अशा रीतीनें आपल्या हाताखालच्या कामगारांसंबंधानें आपला अभिप्राय त्यांच्या प्रत्यक्ष कामकाजावरून ते सत्याला स्मरून ठरवीत. एकदां त्यांची पक्की परीक्षा होण्याचा प्रसंग आला असतां ते शांतपणानें म्हणालेः—" सार्वजनिक कामांत

पडणाऱ्या माणसासंबंधानें वर्तमानपत्रांतून वेडीवांकडी टीका आल्यास त्याचें नुकसान होतें किंवा कसें, असा प्रश्न मीं एकदां मि० डिझरायली यांस केला. तेव्हां ते म्हणाले ' जो नुकताच व्यवहारांत आला असून ज्याला अनुभव मुळींच नाहीं, अशा तरुण माणसाच्या भरभराटीला तशा टीकेमुळें प्रत्यवाय येण्याचा संभव आहे. परंतु माणूस एकदां प्रसिद्धीस आल्यानंतर अशा टीकेचें कांहीं भय नाहीं. उलट ही टीका विनाकारण होत असेल तर परिणामीं तिजपासून फायदाच होतो. ' "

आक्टोबरमध्यें ते ऐर्लंडास गेले; व तेथील आपल्या बाळपणांतील ओळखीचीं स्थळें पाहाण्यासाठीं ते एकटेच सर्वत्र फिरले. तो प्रकार ध्यानीं आला असतां मन कळवळल्याशिवाय राहात नाहीं. हीं स्थळें इतःपर त्यांच्या कधीं दृष्टीस पडलीं नाहींत. येथून निघण्याच्या आदल्या दिवशीं किल्डेअर येथील आपल्या जमीनजुमल्यावरील एका लहानशा निवांत ठिकाणीं असलेल्या देवळाच्या आवारांत एक सावलीची जागा त्यांनीं पाहिली; आणि तेथें अशी प्रार्थना केली कीं, आपणास ह्या ठिकाणीं जिवंत परत येण्याचा प्रसंग कधीं न आल्यास आपलें शव येथें आणून ह्या आवारांत आपणास पुरावें. ह्या सुमारास त्यांच्या रोजनिशींत पुढील त्रोटक उल्लेख आहे:—
" १२ आक्टोबर—पामर्स्टनहून निघालों; तेव्हां सर्वांना रडें कोसळून मोठा आकांत झाला; पुष्कळजणांचा निरोप घेतला· व फार दुःख झालें. "

बुधवार तारीख ११ नोवेंबर १८६८ रोजीं डोव्हर

येथील कड्यांचें त्यांनीं शेवटचें दर्शन घेतलें, व त्याच रात्रीं ते पारिस शहरीं पोहोंचले. हिंदुस्तानास येतांना जलप्रवासांत जे दिवस घालवावे लागतात त्यांत त्यांना मजेची विश्रांति लवकरच मिळावयाची होती. शिवाय कामकाजाचें दडपण नसल्यामुळें आपला वेळ पाहिजे त्या प्रकारें अद्यापि त्यांना घालवितां येत होता. म्हणून आपल्या नवीन कर्तव्यकर्मासंबंधानें ज्या ज्या गोष्टींच्या योगानें आपणांस जास्त ज्ञान होण्याचा संभव आहे, अशी प्रवासांत आढळणारी हरएक गोष्ट पाहाण्याचा त्यांनीं संकल्प ठरविला. इंडिया ऑफिसमध्यें कित्येक गोष्टी त्यांच्या नजरेस आणिल्या तेव्हांच, हिंदुस्तानांत सरकारी दप्तराची होत असलेली अनास्थाही त्यांच्या विशेष नजरेस आणिली होती. तसेंच त्या वेळीं नुकत्या प्रसिद्ध झालेल्या एका पुस्तकांतही ही गोष्ट त्यांच्या नजरेस आणिली होती. वास्तविक पाहिलें असतां हिंदुस्तानचें राज्य आपणांस कसें प्राप्त झालें हें दाखविण्यास अति उत्कृष्ट तऱ्हेची खरी सामुग्री यथास्थित आहे. तरी देखील हिंदुस्तानांतील इंग्रज लोकांसंबंधानें युरोपांतील कोणताही इतिहासकार करील ती निंदा अद्यापि त्यांना सोसावी लागत आहे. इंग्लिशांच्या इतिहासाला ते इतिहासकार असें स्वरूप देतात कीं, त्यांनीं हें राज्य मिळविलें तें केवळ लष्करी सामर्थ्याचा एक अद्भुत खेळ असून तरवारीच्या जोरावरच त्यांनीं तेथील कारभार चालविला आहे. खरोखर महत्त्वाचा इतिहास म्हटला म्हणजे असा कीं, आपण येण्यापूर्वी चालत

आलेल्या सर्व हक्कांची जोपासना इंग्लिशांनीं मोठ्या कळकळीनें केली; आणि हिंदुस्तानांतील रयतेसंबंधानें त्यांना दिवसेंदिवस विशेषच जबाबदारी वाटूं लागली आहे. ऐर्लंडचे चीफ सेक्रेटरी असतांना लॉर्ड मेयो यांनीं एक कायदा मंजूर करून घेतला होता; त्याच्याच आधारावर ऐरिश दप्तर–खात्याची व्यवस्था आहे. हा कायद्याचा मसुदा तयार करितां यावा म्हणून ह्या संबंधाच्या इंग्लंडांतील पद्धतीचें त्यांनीं स्वतः चांगलें मनन केलेल होतें; व फ्रान्स देशांतील पद्धतीविषयीं माहिती कळविण्यासाठीं आपले स्नेही सर बर्नर्ड बर्क यांस त्यांनीं तिकडे पाठविलें होतें.

हिंदुस्तानांतील सरकारी दप्तराची होत असलेली अनास्था; तसेंच हें दप्तर सुरक्षित रीतीनें ठेवून मागील काळीं घडलेल्या गोष्टींचा इतिहासदृष्ट्या तलास लावण्याच्या कामीं त्यांचा उपयोग करितां यावा ह्यासाठीं एकादा उपाय योजण्याची आवश्यकता, ह्या दोन गोष्टींकडे त्यांचें लक्ष हल्लीं लागलें होतें. म्हणून पारिस येथील ह्या खात्याची स्थिति लक्षपूर्वक स्वतः पाहाण्याचा त्यांनीं निश्चय केला. यांच्या रोजनिशींत १४ नोवेंबर रोजीं पुढील उल्लेख आढळतोः—सरकारी दप्तरखाना पाहाण्यास गेलों, व तेथील डायरेक्टरनें आमचा सत्कार करून सर्व खोल्या आम्हांस दाखविल्या. ह्या खोल्यांची रचना मोठी भव्य असून त्या जुन्या ‘ओटेल सुबीस’ नांवाच्या इमारतींत आहेत. तेथेंच चमत्कारिक पत्रांचा व महत्त्वाच्या सरकारी कागदांचा संग्रह एका खोलींत केला असून सर्व

लोकांना त्यापासून मोठी करमणूक होते. त्या सर्व कागदपत्रांचे कालानुरोधानें निरनिराळे भाग पाडिले आहेत; ते असेः— प्राचीन राजांचा काल; मिड्ल* एजेस; स्वसत्ताक अमलाचा काल; बादशाही अमलाचा काल; आणि बादशाही अमलानंतर सर्वत्र शांतता झाल्यानंतरचा काल. स्वसत्ताक अमलांतील कागदपत्र एक प्रकारच्या पातळ पुठ्यांतून ठेविले असून त्यांची संख्या साठ हजारांवर आहे. येथील रचना अगदीं साध्या तऱ्हेची असून पाहिजे तो कागद सहज सांपडावा अशी योजना आहे. खालच्या मजल्यावर सार्वजनिक वाचनालयासाठीं एक खोली आहे; परंतु ती लहान असून वाचनाच्या कामीं लोकांना चांगल्याशा सवलती दिलेल्या दिसत नाहींत. डायरेक्टर यांना योग्य वाटल्यास कोणताही कागदपत्र पाहाण्यास मनाई करण्याचा त्यांना अधिकार आहे. नेपोलियनचें मृत्युपत्र, आणि सोळावा लुई व मेरी ॲन्टॉइनेट यांचीं शेवटचीं पत्रें; हे व अशा तऱ्हेचे अत्यंत महत्त्वाचे कागद सुरक्षित राहावे म्हणून लोखंडाचा एक भक्कम अवाढव्य पेटारा आहे; व एक चोरखण असून त्यांत फ्रान्स देशच्या कित्येक राजांचीं पत्रें आहेत; व तीं कोणांस पाहूं देत नाहींत. हे कागदपत्र प्रसिद्ध करण्याच्या उद्देशानें त्यांच्या यादी वगैरे होत असल्याचें दिसत नाहीं; चमत्कारिक

---

* रोमन राष्ट्राच्या ऱ्हासापासून युरोपांत ज्ञानाची पुनः अभिवृद्धि होऊं लागेपर्यंतच्या, म्हणजे **आठव्या** शतकापासून **पंधराव्या** शतकाच्या मध्यापर्यंतच्या, काळास **मिड्ल एजेस** म्हणतात. ( भा. क. )

कागदपत्रांच्या मात्र हुबेहुब नकला करविण्यांत येत आहेत.

उद्योगी पुरुषाला हिंदुस्तानांत येत असतां जलप्रवासाच्या मुदतींत मिळणाऱ्या विश्रांतीमुळें पुष्कळच सुख होतें. अशा सुखाची प्रेरणा लॉर्ड मेयो यांच्या अंतःकरणांत लवकरच उत्पन्न झाली. प्रवासांत लागलेलें प्रत्येक हॉटेल ( खाणावळ ) त्यांना चांगल्या स्थितींत आढळलें; व एकंदर रस्ता मोठा रमणीय भासला; अशाविषयीं त्यांच्या रोजनिशींतील त्रोटक उल्लेख साक्ष देतात. फ्रान्समधून रेलवेनें प्रवास करीत असतां सेंट मायकेल येथें त्यांनीं मुक्काम केला; कारण तेथें त्यांना एका प्रख्यात एंजिनीयरची गांठ घ्यावयाची होती. ह्या एंजिनीयरला हिंदुस्तानसंबंधी महत्त्वाच्या बाबतींत अनुभव आलेला होता. मांट सेनिस नांवाच्या डोंगरांतील बोगद्याचें काम तेव्हां सुरू होतें. सबब मुद्दाम स्पेशल ट्रेननें जाऊन तें काम त्यांनीं बारकाईनें पाहिलें. नंतर राणी सरकारच्या 'फसायरबी' ( आत्मा ) नांवाच्या जहाजांतून हे भावी व्हाइसराय आपल्या लवाजम्यासह ब्रिंडिसीहून अलेक्झांड्रिया येथें आले. मध्यंतरीं *सेफालोनियामधील आरगास्टली नांवाच्या बंदरीं मात्र ह्यांनीं थोडा मुक्काम केला, व तेथें त्यांना मोठी मौज वाटली. ह्या बंदरासंबंधानें त्यांनीं आपल्या रोजनिशींत असा उल्लेख केला आहेः—"हें बंदर फार टुम-

* हें भूमध्य समुद्रांतील आयोनियन बेटांमधील एक बेट असून ग्रीसच्या ताब्यांत आहे. आरगास्टली हें सेफालोनियांतील बंदर असून मुख्य शहरही आहे. ( भा. क. )

दार असून बहुतेक सर्व बाजूंनीं जमिनींत गुरफाटलेलें आहे व इतकें मोठें आहे कीं सर्व ब्रिटिश आरमार ह्या ठिकाणीं राहूं शकेल. ”

ह्यांच्यासारख्या प्रतिष्ठित पाहुण्यांचा जितका आदर-सत्कार ठेवणें शक्य, तितका ईजिप्तमध्यें तेथील खेदिवांनीं ठेविला. तेथील युद्धखात्यासंबंधीं प्रधानाच्या एका लहानशा तापट अरबी घोड्यावरून पिरामिड नांवाच्या इमारती पाहाण्यास ते गेले; तेव्हां घोड्याचें खोगीर सैल बांधलेलें असल्यामुळें आपण खालीं येण्याच्या अगदीं बेतांत कसे आलों होतों, ती हकीगत त्यांनीं मजेदार रीतीनें आपल्या रोजनिशींत लिहून ठेविली आहे. त्यांच्याबरोबरच्या मंडळी-पैकीं दुसऱ्या एका गृहस्थांचें इतकें सुदैव नव्हतें; कारण रस्त्यानें जात असतां ते खालीं आलेच; मात्र इजा झाली नाहीं. तथापि ईजिप्तमध्यें लॉर्ड मेयो यांचा मुक्काम असतां गमतीचे देखावे पाहाण्याकडे त्यांनीं थोडाच वेळ घाल-विला. ईजिप्तची तेव्हांची स्थिति व त्या वेळीं त्या देशांत सुरू असलेलीं मोठमोठीं सार्वजनिक कामें, ह्यांसंबंधीं त्यांनीं मिळविलेल्या माहितीनें त्यांची रोजनिशी भरलेली आहे. एंजिनीयरखात्यांतील व मुलकी खात्यांतील अति हुशार कामगारांकडून त्यांनीं ही माहिती मिळविली. सुएजच्या कालव्याचें काम तेव्हां पुरें झालें नव्हतें; तें काम त्यांनीं मोठ्या शांतपणानें पाहिलें. तेव्हां आपल्या मनाचा झालेला ग्रह नमूद करण्यांत त्यांनीं रोजनिशीचीं कित्येक पानें भरलीं आहेत; व ह्यांनीं प्रत्यक्ष पाहिलेल्या व ह्यांच्या कानीं आलेल्या गोष्टींसंबंधानें त्यांत टीका

केलेली आहे. पुढें सुएज येथें हिंदुस्तान सरकारची फेरोझ नांवाची आगबोट ह्यांच्यासाठीं येऊन तयार होती.

सुएझ येथून निघाल्याबरोबर यांच्या आंगीं इतका आळस भरला कीं आपली रोजनिशीही त्यांना लिहवेना; आणि सुएझपासून एडनपर्यंतच्या सात दिवसांची हकीगत त्यांनीं तितक्याच ओळींत आणिली आहे. एडन येथें हे पुनः जागे झाले; आणि हिंदुस्तान सरकारच्या अमलाखालीं मोडणाऱ्या बाह्य ठिकाणांपैकीं ह्या पहिल्या ठाण्यासंबंधीं पुरी माहिती करून घेण्याचा ह्यांनीं प्रयत्न केला. लष्करी दृष्टीनें ह्या ठिकाणाची मजबुती व पूर्वेकडील देशांशीं व्यापार सुरू ठेवण्यासाठीं इंग्लंडला कोळशांचा भरपूर सांठा ठेवण्याच्या कामीं ह्याची उपयुक्तता, ह्या दोन बाबतींत त्यांनीं तपास केला; व त्या तपासणींत अखेर निष्पन्न झालेल्या गोष्टी संक्षिप्त रीतीनें लिहून ठेवण्याकडे यांच्या रोजनिशींतील बरींच पानें गेलीं आहेत.

एडनच्या स्थितीसंबंधानें ह्यांनीं सर्व बाजूंनीं मनन करून लिहिलेला लेख बराच विस्तृत झाला आहे; आणि त्याच्या अखेरीस त्यांनीं खालीं लिहिल्याप्रमाणें निर्णय दिला आहे. इतकें मात्र लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, त्यांनीं हें आपलें मत बावीस वर्षांपूर्वीं ( १८६८ त ) नमूद केलेलें आहे; आणि त्यांच्या वजनामुळें त्यांच्या सूचनांपैकीं अनेक प्रत्यक्ष अमलांत येऊन चुकल्या आहेत.

‘ एडनसंबंधानें माझ्या मतें अखेरीस अनुमानें निघतात, तीं अशीं:—( विशेष व्यक्तींनीं केलेल्या कृत्यांबद्दल त्यांनीं बारकाईनें तपास करून प्रतिकूल टीका केली आहे; परंतु ती येथें गाळिली आहे. )

( १ ) लोखंडी पत्र्यांनीं मढविलेल्या जहाजांनीं किंवा ज्यांवर मोठमोठ्या तोफा आहेत अशा साध्या जहाजांनींही हल्ला केला असतां लष्करी संरक्षणाच्या सोई येथें अगदीं नाहींत, असेंच म्हटलें पाहिजे.

( २ ) त्या देशांतील मूळच्या जातींचे लोक व ज्यांच्यापाशीं वेढा घालण्यासाठीं तोफखाना वगैरे नाहीं असें खुष्कीवरील सैन्य; ह्यांशिवाय इतर कोणाशीं टक्कर देण्यासारखें हें मजबुतीचें ठिकाणच नाहीं.

( ३ ) ह्याच्या बचावाचा अति थोड्या खर्चांत अत्युत्कृष्ट उपाय प्रायः असा दिसतो कीं, ज्यांवर मोठमोठया तोफा आहेत अशीं लोखंडी पत्र्यांनीं मढविलेलीं उथळ जहाजें येथें ठेवावीं; तसेंच वाळवंटांत मोरचे उभारून त्यांजवर किंवा मॉनक्रीफ पद्धतीच्या तोफा ओढणाऱ्या गाड्यांवरून कांहीं जड तोफा येथें ठेवाव्या.

( ४ ) ह्या बंदरीं व्यापारवृद्धि फार झपाटयानें होऊन तेणेंकरून येथील लोकसंख्याही निःसंशय वाढणार असल्यामुळें पाण्याच्या पुरवठयाच्या प्रश्नाचा उलगडा ताबडतोब लाविला पाहिजे.

( ५ ) छोटें एडन नांवाचा जो भाग आहे तो होईल तितका लवकर स्वाधीन करून घेतला पाहिजे.

( ६ ) लष्कर ( कँन्टोन्मेंट ) व संयोगी भूमी ह्यांजपासून आगबोटीच्या धक्क्यापर्यंत आगगाडीचा रस्ता तयार करावा; व हा तयार करण्यास लागणारें सामानसुमान अगदीं हाताशीं असल्याप्रमाणेंच आहे. असें केलें असतां फार थोड्या सैन्यानें एडनचा बचाव करितां येईल.

( ७ ) सुएझचा कालवा फार लवकर पुरा होण्याचा सुमार दिसतो; व ह्या कालव्यामुळें ज्यांवर मोठमोठ्या तोफा आहेत अशा आगबोटी युरोपांतून ह्या समुद्रांत किती येऊं लागतील त्यांचा अंदाज करणें अशक्य आहे; ह्यामुळें ह्या कामीं उशीर लावितां कामा नये. तसेंच एडन आपल्या ताब्यांत ठेवणेंच असेल तर त्याच्या योग्य बचावाची व तेथें पाण्याचा पुरवठा होण्याची तजवीज ताबडतोब लाविली पाहिजे. तथापि आगबोटीचा धक्का, कोळशांच्या वखारी, व बंदरांत शिरण्याचा मार्ग ह्या तिहींच्याच संरक्षणाचा विचार झाला असतां तूर्त पुरें आहे; आणि हा एवढा भाग एडनच्या इतर भागांपासून सहज विलग करितां येण्याजोगा आहे. असें केलें असतां लष्करचा भाग व संयोगीभूमीचा भाग ह्यांवर हल्ला करण्यास आपल्या विरुद्ध होणाऱ्या राष्ट्राला उत्तेजन राहाणार नाहीं; कारण कोळशांच्या वखारी नसल्यामुळें ह्या भागांना व्यापारदृष्ट्या किंवा राजकीयदृष्ट्या मुळींच महत्त्व राहाणार नाहीं. '

येथें वाचकांस पुनः स्मरण दिलें पाहिजे कीं, हा अभिप्राय त्यांनीं बावीस वर्षांपूर्वीं दिलेला आहे. ह्यांनीं सुचविलेल्या धोरणावर बरीच सुधारणा तेव्हांपासून प्रत्यक्ष अमलांत आली आहे.

ह्यानंतर दहा दिवस हिंदी महासागरांतून एडनहून मुंबईस येण्यास लागले; व ह्या मुदतींतील हकीकतीचें कांहीं एक टांचण त्यांनीं करून ठेविलेलें नाहीं. हिंदु-

स्तानासंबंधीं पुस्तकें वाचण्यांत व लॉर्ड नेपियर* ऑफ् मागडाला यांजबरोबर हिंदुस्तानविषयक प्रश्नांची चर्चा करण्यांत त्यांनीं हा काळ घालविला. लॉर्ड नेपियर हे ह्या जलप्रवासांत त्यांजबरोबर आले होते.

ह्या सुमाराचा त्यांच्या रोजनिशींतील उतारा असाः— " मुंबईपासून कांहीं अंतरावर; शनिवार, १९ डिसेंबर १८६८. बारा वाजतां जमिनीचा मागमूस दिसूं लागला; व बराच वेळ संशयांत घालविल्यानंतर गरगर फिरणारा तांबडा दिवा† आमच्या दृष्टीस पडला; आणि एक बंदरवाटाड्या आम्हीं बोटीवर घेतला. प्रधानमंडळ बदलल्याची बातमी आतांच प्रथमतः लागली; ती ऐकून अति आश्चर्य वाटलें. कारण डिझरायली यांना पुनः पार्लमेंट भरेपर्यंतही वेळ काढितां येणार नाहीं, हा विचार माझ्या ध्यानींमनीं कधीं आला नव्हता. '

लॉर्ड मेयो यांच्या नेमणुकीविरुद्ध पक्षाभिमानामुळें गिल्ला उडाला होता. तथापि ती संधि साधून त्यांची नेमणूक रद्द करण्याचें मि. ग्लाडस्टन व त्यांचें लिबरल प्रधानमंडळ यांनीं नाकारिलें; व आपल्या पूर्वींच्या प्रधानांनीं केलेली नेमणूक योग्य रीतीनें अमलांत

---

*हे ब्रिटिश सैन्यांतील एक जनरल असून ह्यांचा जन्म १८१०त झाला. मागडाला नांवाच्या आबिसीनियांतील डोंगरी किल्ल्याचा नाश ब्रिटिश सैन्यानें १८६८त केला; त्या प्रसंगीं हे मुख्य असल्यामुळें ह्यांना लॉर्ड नेपियर ऑफ् मागडाला म्हणतात. [ भा. क. ]

† मुंबई बंदरांत किनाऱ्यापासून थोड्याच अंतरावर एक मोठा स्तंभ असून त्यावरील दिवा गरगर फिरतो. हा दीपस्तंभ कुलाब्याच्या दांडीवर आहे. [ भा. क. ]

आणिली; हें येथे सांगण्याची फारशी आवश्यकता नाहीं.

ता. २० डिसेंबर १८६८ रोजीं लॉर्ड मेयो हे मुंबई येथें मोठ्या थाटमाटानें उतरले. तेथें असलेल्या मुदतींत ते मुंबईच्या गव्हर्नरांचे पाहुणे होते. पुढील दहा दिवस त्यांनीं मुंबईतील सार्वजनिक महत्त्वाची अशी हरएक गोष्ट पाहाण्यांत घालविले. हौस आफ् करेक्शन ( व्रात्य, उनाड वगैरे माणसांना ताळ्यावर आणण्यासाठीं स्थापिलेली संस्था ), सेंट्रल जेल, गोद्या, कापसाचे गठ्ठे बांधण्याच्या गिरण्या, बराकी व व्याहाड येथील तलाव, इत्यादि महत्त्वाचीं कामें तर त्यांनीं पाहि-लींच; शिवाय नेटिव्ह पायदळ पलटणींच्या लायनींतील लहानशी शाळा, म्युनिसिपालिटीचें मार्केट, शहरांतील मलमूत्रादि वाहून नेण्याचे कारखाने; हींही त्यांनीं पाहिलीं. पार्शी लोकांच्या मुख्य उपाध्यायांपासून तें कॉटन फ्रॉडसंबंधाचे ( कापसांतील लबाड्यांवर देखरेख ठेवणारे ) इन्स्पेक्टर यांजपर्यंत प्रत्येक वर्गातील लोकां-च्या भेटी त्यांनीं घेतल्या. पार्शी लोकांच्या उपाध्यायां-विषयीं त्यांच्या डायरींत असा उल्लेख आहे:—"हे एक संभा-वित वृद्ध गृहस्थ असून बंडाच्या धामधुमींत यांनीं दाखवि-लेल्या राजनिष्ठेबद्दल राणी सरकारांकडून त्यांना सोन्याचें मोठें पदक बक्षीस मिळालें आहे." मुंबईच्या संरक्षणाच्या तजविजी, ऑक्ट्राय ( शहरांत येणाऱ्या मालावरील ) कर व लष्करी इमारतींना लागणारा अचाट खर्च; ह्यांसंबंधानें त्यांनीं अभिप्राय लिहिले असून ह्यांच्या व्हाइसरायच्या

कारकीर्दींत ह्या बाबतींत पुढें महत्त्वाचे फेरफार करण्याच्या कामीं हे अभिप्रायच मूळ आधारभूत झाले आहेत. घारापुरी ( एलिफंटा येथील कोरींव लेणीं पाहण्यास हे गेले; तेव्हां तेथील गुहेंत दारू पिऊन धुंद झालेले कित्येक ब्रिटिश शिपाई उतरलेले होते व कांहीं अमेरिकन मंडळीही तेथें उतरली असून त्यांतील एकजण एक प्रकारचें तंतुवाद्य वाजवीत होता. तेथें आढळलेल्या शोचनीय प्रकाराबद्दल यांच्या स्नेह्यांपैकीं एकानें मोठा तिटकारा दर्शविला, असें त्यांनीं लिहिलें आहे. शिवाय त्यांनीं असेंही लिहिलें आहे:—" मुंबई बंदराच्या संरक्षणार्थ लष्करी व आरमारसंबंधी योजिलेल्या उपायांचा अंदाज मला आज करितां आला. "

ता. ३० डिसेंबर रोजीं लॉर्ड मेयो हे आपल्या परिवारासह मुंबईहून निघाले, व समुद्रकिनाऱ्यानें कारवार व बेपूर हीं बंदरें पाहण्यासाठीं जलमार्गानें गेले. बेपूरहून आगगाडीनें हे उलट बाजूस पार मद्रास येथें गेले. तेथें त्यांनीं सार्वजनिक संस्था पाहिल्याच. शिवाय कधीं सकाळीं ते शिकारीस जात, कधीं शर्यतींना जात; आणि संध्याकाळीं सरकारवाड्यांत तर एकामागून एक समारंभ चालत. मोठ्या पहाटेपासून बरीच रात्र होईपर्यंत ते एकसारखे कामकाजांत असत. ता. २ जान्युआरीच्या रोजनिशीच्या अखेरीस असा मजकूर आहे:—" पब्लिक*

* सरकारी खर्चानें रस्ते, पूल, इमारती वगैरे बांधण्यासंबंधीं जें खातें त्याला पब्लिक वर्क्स् खातें म्हणतात. ( भा. क. )

वर्कस् व इरिगेशन* खात्यांच्या मुख्य अधिकाऱ्यांबरोबर जेवणानंतर त्या त्या बाबतींत संभाषण झालें. आपण तयार केलेले नमुने व नकाशे त्यांनीं आणिले; त्यांवरून मद्रास इलाख्याचा निमेहून अधिक भाग तलावांनीं कसा गच्च भरून गेला आहे तें कळून येतें." तथापि वास्तविक पाहिलें असतां त्यांच्या रोजनिशीच्या प्रत्येक पानावर पुढें दर्शविल्या प्रकारचा कांहींनाकांहीं उल्लेख आहे. " कर्नाटक राजघराण्यांतील पुरुषांची हालहवाल व त्यांच्या हालचाली, ह्यांसंबंधानें कर्नल विलसन ह्यांशीं बोलणें झालें." " प्रांतांप्रांतांना जमेच्या बाबी तोडून देणें, पोलीस खात्यांतील अंमलदारांच्या नेमणुकी व नेटिव्ह सैन्याची स्थिति; ह्या चालू प्रश्नांवर मि. आर्बथनाट यांजबरोबर संभाषण झालें."

जान्युआरीच्या ६ व्या तारखेस ते फेरोझ बोटीवर अखेरीस कलकत्त्यास जाण्यासाठीं चढले. मद्रासेस त्यांचा मुक्काम असतां बराच थाट उडाला, परंतु त्यांना अति दगदग झाली. ह्या जलप्रवासांत जान्युआरीच्या ८ व्या तारखेस त्यांच्या रोजनिशींत असा उल्लेख आहे:— " मद्रास येथील माझ्या अविचाराचें व फाजील दगदगीचें प्रायश्चित्त मिळालें; आज सकाळीं मला सणसणून ताप भरला." तथापि समुद्रावरील मंद हवा हें रामबाण औषध त्यांना मिळालें. १२ जान्युआरी १८६९ रोजीं ते कलकत्त्यास उतरले; तेव्हां किल्ल्यावरून तोफांची सलामी

---

* सरकारी खर्चानें पाटबंधारे वगैरे बांधण्यासंबंधीं जें खातें त्याला इरिगेशन खातें म्हणतात. ( भा. क. )

झडली व राष्ट्रीस्तोत्राचा घोष झाला. नंतर फौजेच्या रांगांतून व लोकांच्या झुंडींतून हे गाडींतून चालले. तेव्हां लोकसमुदाय इतका होता कीं, नदीतीरापासून सरकार-वाड्यापर्यंत दुतर्फा माणसें लागून गेल्यामुळें थेटपर्यंत जणूं काय एक सजीव गल्लीच आहे, असें भासत होतें. ह्या प्रसंगीं त्यांच्या चेहऱ्यावर अशक्तपणाची कांहींच छाया नव्हती.

कलकत्ता येथील सरकारवाड्याच्या भव्य जिन्याच्या पायऱ्यांवर नवीन व्हाइसराय यांचा आदरसत्कार करण्यांत येतो; आणि लागलींच हिंदुस्तानचीं राज्यसूत्रें त्यांच्या हवालीं करण्यांत येतात. हा एकंदर देखावा मोठा भव्य असतो. हल्लींच्या प्रसंगीं तर ह्या देखाव्यानें मन कळव-ळावें अशीच स्थिति होती. थकले भागलेले अनुभविक व्हाइसराय सर जॉन लॉरेन्स हे जिन्याच्या वरच्या पायरी-वर होते; व त्यांनीं आपल्या हुद्द्याचा भव्य भरपोषाख केला असून तशा प्रकारचा पोषाख घालण्याचा तो त्यांना शेवटचाच दिवस होता. त्यांच्या तोंडावर तजेला मुळींच नव्हता. तसेंच त्यांच्या शरीराची मूळची काठी उंच खरी, परंतु हिंदुस्तानांत चाळीस वर्षें नौकरींत घालविल्यामुळें ते वांकले होते. तथापि त्यांची मान ताठ असून त्यांच्या डोळ्यांचें विलक्षण पाणी अद्यापि कायम होतें. हिंदुस्ता-नावरील अत्यंत बिकट प्रसंगीं त्यांचें हें पाणी फार उत्कृष्ट रीतीनें व्यक्त झालेंच होतें. ज्यांच्या सहवासांत त्यांनीं आपला आयुष्यक्रम घालविला, ते त्यांचे अनुभविक सल्ला-गार स्तब्ध रीतीनें शांतपणें त्यांच्या समोंवतीं अर्धचंद्राकार

उभे असून त्यांचे पोषाख निळ्या व सोनेरी वर्णांचे असून मधून मधून थोड्या एकजात तांबड्या वर्णाची झांक मारत होती. जिन्याच्या पायथ्याशीं नवीन गव्हर्नर जनरल यांनीं तटकन गाडींतून उडी मारिली; तेव्हां फौजेची सलामी झडत असून शस्त्रांचा लकलकाट सुरू होता. त्यांच्या शरीराचा बांधा मोठा व घट्टा-कट्टा असून त्यांनीं उन्हाळ्याला योग्य असा अगदीं साधा पोषाख केलेला होता; व लहानशी रंगाची गळपट्टी घातली असून त्यांच्या चेहऱ्यावर आरोग्यामुळें व तजेल्यामुळें लाली चढलेली होती.

त्या लांबलचक जिन्याच्या पायऱ्या चटाचट चढून लॉर्ड मेयो वर पोहोंचतात, तोंच त्यांचें स्वागत करण्या-साठीं सर जॉन लॉरेन्स हे नित्यसंप्रदायानुसार जिन्याच्या वरच्या पायरीकडे तीन पावलें त्यांना सामोरें गेले; तेव्हां ते फार अशक्त झाले होते असें स्पष्ट दिसत होतें. नंतर हे उभयतां मंत्रिसभेच्या दिवाणखान्यांत गेले; तेव्हां कित्येक कामगारमंडळी त्यांच्या मागोमाग तेथें गेली; त्यांत सर विल्यम हंटर ह्या मूळ इंग्लिश पुस्तकाचे कर्ते ) हेही होते. ही मंडळी तिकडे जात असतां त्यांच्या एका मित्रानें त्या वेळ-च्या देखाव्याची तुलना त्याच जिन्यावरील ह्याहूनही विशेष स्मरणीय अशा प्रसंगींच्या देखाव्याशीं केली. १८५७ सालीं हिंदुस्तानच्या बचावासाठीं सर जॉन लॉरेन्स यांच्या इतके परिश्रम कोणाही एका इंग्रज गृहस्थाच्या हातून झाले नसल्यामुळें ते अगदीं थकून गेले होते; व ज्यांना इकडील कामकाजांचा काडीमात्र अनुभव नाहीं अशा

आपल्या जागीं आलेल्या गृहस्थांच्या हवालीं तेंच हिंदुस्तान ते आतां करीत होते. त्याचप्रमाणें मोठे कडक गव्हर्नर जनरल जे लॉर्ड डलहौसी त्यांनीं हिंदुस्तानांतील ब्रिटिश राज्याची इमारत उभारण्यास जितका हातभार लाविला, तितका कोणत्याही इंग्रज गृहस्थाकडून लागला नाहीं. त्या डलहौसींनींही तेरा वर्षांपूर्वीं ह्याच जिन्यावर अशाच रीतीनें आपल्या हुद्दयाचें काम दुसऱ्याच्या हवालीं केलें होतें. त्या प्रसंगीं रोगग्रस्त व चिंताग्रस्त असल्यामुळें त्यांचा चेहरा सर जॉन लॉरेन्स यांच्यापेक्षांही सुकलेला होता; मानसिक व शारीरिक दगदगीमुळें ते अधिक त्रस्त झालेले होते; आणि स्वदेशहितार्थ त्यांनीं बजाविलेल्या कामगिरीमुळें पुढें लवकरच येणाऱ्या मृत्यूचें बीजारोपण त्यांच्या शरीरांत त्या प्रसंगीं झालेलें होतें.

त्या दिवाणखान्यांत सर जॉन लॉरेन्स व त्यांचे मंत्री मेजाशीं आपापल्या नेहमींच्या स्थानीं विराजमान झाले; निरनिराळ्या खात्यांचे चीफ सेक्रेटरी सभोंवतीं उभे राहिले; इतर कामगारांची दिवाणखान्यांत एकच गर्दी उसळली; आणि मागील काळांत हिंदुस्तान जिंकून ज्यांनीं ताब्यांत राखिलें, त्या इंग्रज गृहस्थांच्या तसबिरी भिंतींना टांगिलेल्या होत्या तेथून ते जणूं काय हा सर्व प्रकार पाहूं लागले. नंतर ह्या हुद्दयाचें काम पतकरितांना ज्या शपथा घ्याव्या लागतात, त्या क्लार्कनें स्पष्ट रीतीनें वाचून दाखविल्या; व लॉर्ड मेयो यांनीं त्यांस रुकार दिला. तत्क्षणीं सरकारवाड्याच्या बागांत असलेल्या व्हाइसराय साहेबांच्या ब्यांडनें राष्ट्रीयगीताचा एकदम जयघोष सुरू केला; वा-

त्याच्या आसपास जमलेल्या लोकांनीं उडविलेला आनंदाचा गजर ऐकूं येऊं लागला; ह्या राजप्रतिनिधींच्या सन्मानार्थ किल्ल्यावरून तोफांची सलामी झडूं लागली; आणि हिंदुस्तानांतील १९ कोटि ६० लक्ष प्रजेवर नवीन राजसत्ता सुरू झाली.

सर जॉन लॉरेन्स यांनीं त्या दिवशीं संध्याकाळीं लॉर्ड मेयो यांना सरकारी खाना दिला. त्या प्रसंगीं लॉर्ड मेयो आपल्या हुद्द्याचा भरपोषाख करून आले होते; तेव्हां त्यांच्या आंगच्या उत्कृष्ट आरोग्यामुळें ते विशेष खुलत होते. दुसऱ्याचें मन आकर्षून घेण्याजोगी विनयशीलता त्यांच्या आंगीं असल्यामुळें कैक कामगारांना विलक्षण समाधान वाटून त्यांच्या मनांतील त्यांजविषयींचा विषमभाव नाहींसा झाला. त्यांची अशी कल्पना झालेली होती कीं, नवीन गव्हर्नर जनरल यांच्या संबंधानें आपला कांहीं चांगलासा ग्रह होणार नाहीं. इंग्लंडांतील पक्षाभिमानी वर्तमानपत्रांतून त्यांजवर झालेल्या गिल्लचामुळेंच त्यांची अशी कल्पना झालेली होती. लॉर्ड मेयो हे चांगले सशक्त असल्यामुळें कोणाच्याही मनाला मोठा उत्साह वाटे; व त्या भोजनसमारंभास जमलेल्या मंडळींत ते मिसळूं लागले, तेव्हां लोक म्हणूं लागले कीं, मि. डिझरायली यांनीं व्हाइसरायच्या जागीं हल्लीं पाठविलेले गृहस्थ निदान कामाच्या दगदगीला डगमगणारे खचित नाहींत.

# प्रकरण तिसरें.

## व्हाइसराय सरकारचा कारभार प्रत्यक्ष कसा चालतो त्याविषयीं.

[ कामास प्रारंभ.—वरिष्ठ सरकारची रचना —ग. ज. यांची सत्ता व कौन्सिलांतील कामाचा प्रकार.—कौन्सिलच्या कामकाजाच्या पद्धतींत लॉर्ड क्यानिंग यांनीं केलेली सुधारणा.—कौन्सिलांतील काम कसें चालतें ?—त्यांच्या वेळचे मंत्री व सेक्रेटरी.—कौन्सिलांत नेहमींचीं कामें कशीं चालतात?—खुद्द व्हाइसराय यांजवर पडणारें काम.—खाजगी तऱ्हेचें पडणारें काम.—प्रवर्तक शाखेंतील कामें.—विशेष वादग्रस्त प्रश्नांचा विचार कसा चालतो?—त्याचें एक उदाहरण.—अखेर निकाल कसा लागतो?—कौन्सिलांत मतभेद असतो तेव्हांची स्थिति.—वरील कामांशिवाय त्यांस पडणारीं कामें —विधायक कौन्सिलांतील कामें —त्यांचा साधारण दिनचर्या.—खाजगी तऱ्हेनें त्यांचें वर्तन.—त्यांच्या कामाच्या वेळा —त्यांना भिन्न भिन्न प्रकारचीं कामें.—त्यांना हाताखालच्या कामगारांची मिळालेली मदत.— कामकाजास योग्य असे त्यांच्या आंगचे गुण.—खात्यांचे मुख्य अधिकारी व सेक्रेटरिएट खातें यांजकडे असलेलीं भिन्न भिन्न कामें —ह्या दोन्ही प्रकारच्या कामगारांत मेळ ते कसा घालीत ?—त्यांच्यावरील कामाची जवाबदारी. ]

ता. १२ जान्युआरी १८६९ रोजीं लॉर्ड मेयो यांनीं व्हाइसरायसंबंधी कामाची शपथ घेतली; व त्याच दिवशीं त्यांनीं कामास सुरवात केली. त्यांच्या स्वभावांत असा एक विशेष होताच कीं, कामकाजासंबंधानें नेहमीं एकापायावर तयार असावयाचें. म्हणून खुद्द आपण स्वतः कोणतीं कामें केलीं पाहिजेत; तसेंच तीं अति उत्कृष्ट रीतीनें व अति थोड्या वेळांत आपल्या हातून कशीं घडतील, ह्याची माहिती माजी व्हाइसराय यांजपासून ते करून घेऊं लागले.

हिंदुस्तानचें वरिष्ठ सरकार ह्याची रचना एकाद्या व्यवस्थित यंत्राप्रमाणें असून त्यांत एक मंत्रिसभा (कौन्सिल) आहे; व गव्हर्नर जनरल हे त्या सभेचे अध्यक्ष असून त्यांचा अधिकार अप्रतिबंध आहे. आठराव्या शतकांत ह्या वरिष्ठ सरकारच्या सत्तेंत फारसा जोम नव्हता; व तशी स्थिति थेट लॉर्ड कॉर्नवालिस यांच्या काळापर्यंत कायम होती. अशी स्थिति येण्याचें कारण गव्हर्नर जनरल यांना आपल्या मंत्रिसभेमध्यें पूर्ण स्वातंत्र्य नव्हतें; म्हणजे मंत्रिसभेचें मत त्यांना झुगारून देतां येत नसे.

त्यांना एकच मत होतें; व ह्या मताची योग्यता अर्थात् इतर कोणत्याही सभासदाच्या मतापेक्षां अधिक नव्हती; सभेमध्यें मतभेद होऊन दोन्ही पंथास समसमान मतें पडतील तेव्हां मात्र त्यांना एक अधिक मत देऊन प्रश्नाचा निकाल लावितां येत असे. बंगाल्यांतील ईस्ट इंडिया कंपनीच्या आरंभींच्या कित्येक वर्षांचा राज्यकारभार अव्यवस्थित असून तेणेंकरून तिच्या त्या काळच्या राज्यकारभाराला मोठाच बट्टा लागला आहे; व बहुमतानें राज्यकारभार चालविण्याचा तेव्हां झालेला प्रयत्न हेंच ह्या बहुतेक गोंधळाचें आदिकारण होय. १७७३ तील रेग्युलेटिंग ऍक्टान्वयें नेमणुका होऊन आलेले सर फिलिप फ्रान्सिस व त्यांचे समकालीन इतर मंत्री यांच्या कृत्यांनीं तर ह्या प्रकारच्या राज्यपद्धतीची गतिच खुंटली. कौन्सिलांत जसें बहुमत पडेल त्याप्रमाणें राज्यकारभार चालविणें हें मोठं अवघड काम असून तेवढेंच कांहीं वारन हेस्टिंग्स यांना तेव्हां करावें लागलें नाहीं. तर बहुमत

आपल्या विरुद्ध असतांही त्यांना राज्यकारभार चालवावा लागला. १७८६ त लॉर्ड कॉर्नवालिस यांनीं गव्हर्नर जनरलची जागा पतकरिली; तेव्हां राज्यकारभार चालविण्याची वास्तविक सत्ता गव्हर्नर जनरल यांस असली पाहिजे असा आग्रह जागा पतकरण्यापूर्वीं त्यांनीं धरिला; ह्यामुळें हा बखेडा मोडण्याचें श्रेय त्यांना आहे.

गव्हर्नर जनरल यांची सत्ता अनियंत्रित असावी ही नवीन पद्धति १८५८ पर्यंत तींत फार करून फेरफार न होतां सुरू होती. हें वर्ष ईस्ट इंडिया कंपनीच्या अमलाचें शेवटचेंच होय. ह्या पद्धतीअन्वयें आपल्या मंत्रिसभेचें मत बाजूला ठेवण्याचा अधिकार गव्हर्नर जनरल यांना आला खरा; तथापि प्रत्यक्ष वस्तुस्थिति अशी होती कीं, हा अखेरचा अधिकार बजावण्याचे फारसे प्रसंग गव्हर्नर जनरल ह्यांनीं मोठ्या शिताफीनें येऊं दिले नाहींत. एकादी गोष्ट विलक्षण निकरास पोहोंचली असतां अथवा अकस्मात् कांहीं प्रसंग आले असतां मात्र त्यांनीं क्वचित् हा अधिकार बजाविला. हरएक हुकूम अध्यक्ष व एकंदर मंत्रिमंडळ ह्या उभयतांच्या नांवानें सुटे; म्हणजे सरकारी भाषेप्रमाणें गव्हर्नर जनरल इन् कौन्सिल यांच्या नांवानें सुटे. तसेंच कंपनीच्या अमलांत हरएक प्रकरण मंत्रिसभेच्या प्रत्येक सभासदाकडे प्रत्यक्ष जात असे. महागनी लांकडाच्या लहान लहान पेट्यांतून प्रकरणें घालून तीं सभासदांच्या घरोघर पाठवीत. अर्थात् कामें मुंगीच्या पावलानें चालत. ह्या मंत्रिसभेच्या एका माजी सभासदाचें ह्या संबंधानें असें मत आहे:—" अशा पद्धतीमुळें सभास-

त्यांना आपापले अभिप्राय नमूद करण्याच्या कामीं अति परिश्रम पडतात. ह्यांतव सांप्रत अशी पद्धति सुरू करण्याचा विचारही फारसा मनांत यावयाचा नाहीं. हल्लीं एकाद्या अंडर सेक्रेटरीकडून जीं कामें व्हावयाचीं, तीं तेव्हां गव्हर्नर जनरल व त्यांचें मंत्रिमंडळ यांना करावीं लागत."

हिंदुस्तानची राजसत्ता कंपनीकडून निघून प्रत्यक्ष राणीसरकारांकडे गेल्यानंतर लॉर्ड क्यानिंग हे पहिले व्हाइसराय आले. त्यांना असें आढळून आलें कीं, वर दर्शविल्याप्रकारची पद्धति बंद केल्याशिवाय आपणास राज्यकारभाराचें गाडें विशेष तडाक्यानें व उत्कृष्ट रीतीनें हाकतां यावयाचें नाहीं. वरिष्ठ सरकारच्या रचनेला क्याबिनेटसारखें स्वरूप देऊन ते स्वतः त्या क्याबिनेटचे प्रेसिडेंट झाले. वरिष्ठ सरकारच्या मंत्रिसभेच्या प्रत्येक सभासदाकडे त्याच्या खात्याचा वस्तुतः पूर्ण अधिकार सोंपविण्यांत आला; अथवा तो आपल्या खात्याच्या प्रत्येक कामाचा आरंभ करणारा झाला, असेंही म्हटलें असतां चालेल. त्या खात्याच्या नेहमींच्या साधारण कामांची जबाबदारी त्याजवर पडूं लागली. मात्र विशेष महत्त्वाचीं कामें त्याला व्हाइसराय यांजपुढें ठेवावीं लागत; आणि ज्या राजधोरणाच्या प्रश्नांचा निकाल स्वतः लावणें व्हाइसराय यांस युक्त दिसेल, त्यांचा निकाल ते आपल्या मर्जीप्रमाणें लावीत; व तो अखेरचा होय.

ह्यासंबंधानें सर जॉन स्ट्राची ( लॉर्ड मेयो यांच्या कौन्सिलाचे एक सभासद ) हे लिहितातः—" इंग्लंडांत क्याबिनेटमधील प्रधानांमध्यें ज्या प्रकारें कामांची वांटणी

केलेली आहे, त्याच धोरणावर बहुतांशीं हिंदुस्तानच्या राज्यकारभारासंबंधीं नेहमींच्या चालू कामकाजाची वांटणी कौन्सिलाच्या सभासदांमध्यें केलेली असून प्रत्येक सभासदाकडे एकेका खात्याचें काम सोंपविलें आहे." खुद्द गव्हर्नर जनरल हे स्वतःकडे एका खात्याचें काम मुद्दाम ठेवितात; तें प्रायः परदेशसंबंधी खातें होय. लॉर्ड मेयो यांना तर कामकाजाची विशेष हाव असल्यामुळें त्यांनीं आपल्याकडे दोन खातीं ठेविलीं; एक परदेशसंबंधीं व दुसरें अति विस्तृत असें पब्लिक वर्क्स्‌संबंधी. यांच्या व्हाइसरायच्या छोट्याशा कारकीर्दींत देखील वरिष्ठ सरकारच्या अधिकारी-मंडळांत फेरफार घडून आले. तथापि यांच्या कारकीर्दींतील अधिकारी-मंडळाची कल्पना एकाच कोष्टकावरून द्यावयाची असल्यास ती पुढील कोष्टकावरून बरीच नक्की होईल. 'हिंदुस्तान सरकार' हें त्या वेळीं कसें बनलें होतें, हें ह्या कोष्टकावरून स्पष्ट कळून येतें; मात्र खुद्द व्हाइसराय यांच्या स्वतःच्या संबंधाच्या कामगारांचा समावेश त्यांत झालेला नाहीं. म्हणून येथें इतकें सांगितलें पाहिजे कीं, लॉर्ड मेयो यांना त्यांच्या सुदैवानें मेजर ( सांप्रत जनरल-सर ) ओवेन टयूडर बर्न नांवाचे प्रायव्हेट सेक्रेटरी मिळाले होते. कामकाज बिनबोभाट व उत्कृष्ट रीतीनें कसें चालवावें ह्यांत मेजर बर्न ह्यांचा हातखंडा होता. ह्यामुळें खुद्द लॉर्ड मेयो यांस पडणाऱ्या कामाचें ओझें त्यांनीं बरेंच हलकें केलें; व ते त्यांच्या अत्यन्त विश्वासास व स्नेहास पात्र झाले. वर दर्शविलेलें कोष्टक येणेंप्रमाणें:—

| खातें. | कौंसिलाच्या कोणत्या सभासदांच्या ताब्यांत. | त्या खात्याचे चीफ सेक्रेटरी. |
| --- | --- | --- |
| १. परदेशसंबंधी खातें. | खुद्द व्हाइसराय. | सर सी यू एचिसन. के. सी. एस् आय् |
| २. पब्लिक वर्क्स् खातें. | खुद्द व्हाइसराय. | ह्याच्या पोटशाखा केलेल्या होत्या. |
| ३. आभ्यंतर व्यवस्थेचें खातें ( होम डिपार्टमेंट ). | सर ब्यारो एलिस. के. सी. एस्. आय् | सर ई. क्लाइव्ह बेली के. सी. एस्. आय्. |
| ४. महसूल, शेतकी व व्यापार-संबंधी खातें. | सर जॉन स्ट्राची. के. सी. एस् आय् | मि. ए. ओ. ह्यूम. सी. बी. |
| ५. नगदी खातें. | सर रिचर्ड टेंपल. के. सी. एस्. आय् | मि. बर्क्ले चापमन. सी. एस्. आय्. |
| ६. लष्करी खातें. | मेजर जनरल सर एच् नॉरमन. के. सी. एस्. आय् | जनरल एच्. के. बर्न. सी. बी. |
| ७. विधायक (लेजिस्लेटिव्ह) खातें. | सर फिट्झ् जेम्स स्टीफन. के. सी. एस्. आय्. | मि. व्हिट्ले स्टोक्स् सी. एस्. आय्. डी. सी. एल्. |

ह्या कौन्सिलचें प्रेसिडेंट या नात्याचें काम लॉर्ड मेयो यांस करावें लागे तसच ह्या सात खात्यांपैकीं प्रत्येक खात्यांतील कामाचा अखेर निकालही त्यांजकडूनच व्हावयाचा असल्यामुळें तेंही काम त्यांस पडे. शिवाय परदेशसंबंधी खातें व पब्लिक वर्क्स् खातें ह्या दोहोंचे तर ते

स्वतःच मंत्री होते. आभ्यंतर व्यवस्थेचें खातें; महसूल, शेतकी व व्यापारसंबंधी खातें; आणि नगदी खातें; ह्या तिहींवरील मंत्री हे इंडियन सिव्हिल सर्व्हिसपैकीं ( हिंदुस्तानसाठीं इंग्लंडांत तयार होणाऱ्या मुलकी कामगारमंडळींपैकीं ) होते. तसेंच ह्या तीन खात्यांचे आणि परदेशसंबंधी खात्याचे सेक्रेटरी व अंडर ( दुय्यम ) सेक्रेटरी हेही अशा कामगारमंडळींपैकींच होते. राहिलेल्या दोन खात्यांपैकीं लष्करी खात्यावरील मंत्री हे नांवालौकिकास चढलेले योद्धे असून विधायक खात्यावर इंग्लंडांतील ब्यारिस्टरांपैकीं ( कायदेपंडितांपैकीं ) एक प्रख्यात ब्यारिस्टर होते.

नेहमींच्या व सामान्य महत्त्वाच्या कामांचा निकाल त्या त्या खात्याचे मंत्री लावीत. ह्यांहून महत्त्वाच्या कामांच्या कागदपत्रांवर त्या खात्याच्या मंत्र्याकडून मूळ अभिप्राय होऊन नंतर तें प्रकरण व्हाइसराय यांजकडे पाठविण्यांत येई. ते केव्हां त्याप्रमाणेंच अभिप्राय देत, केव्हां त्यांत फेरफार करीत. त्यांचा अभिप्राय मूळच्या अभिप्रायाप्रमाणें पडल्यास त्या प्रकरणाचा प्रायः तो अखेरचाच निकाल समजावयाचा; आणि खात्याच्या मंत्र्याच्या त्या अभिप्रायानुसार त्या खात्याचे सेक्रेटरी हे गव्हर्नर जनरल इन्-कौन्सिल यांच्या नांवानें प्रसिद्ध होण्यासाठीं पत्र अथवा ठराव तयार करीत. तथापि महत्त्वाच्या प्रकरणीं व्हाइसराय व खात्याचे मंत्री यांचें मतैक्य झालें तरी कैक वेळां ते कागदपत्र कौन्सिलांतील सर्व मंत्र्यांकडे फिरविण्याविषयीं व्हाइसराय फर्मावितात; अथवा त्या प्रश्नासंबंधानें ज्यांचे

अभिप्राय घेणें त्यांना युक्त दिसेल, तेवढ्यांचकडे पाठविण्याविषयीं फर्मावितात. खात्याच्या मंत्र्यांचा मूळचा अभिप्राय व्हाइसराय यांना संमत नसेल तेव्हां त्या प्रकरणाचे कागदपत्र बहुधा इतर सर्व सभासदांकडे फिरवीत; अथवा ते कौन्सिलच्या बैठकीपुढें ठेवण्याविषयीं गव्हर्नर जनरल हे हुकूम देत. जरुरीचें प्रकरण असल्यास त्या खात्याचे सेक्रेटरी हे प्रत्यक्ष गव्हर्नर जनरल यांजपुढेंच तें ठेवीत, व त्यावर जो कांहीं हुकूम देणें असेल तो व्हाइसराय हे स्वतः लिहीत; अथवा ज्या खात्यांतील तें काम असेल त्यावरील मंत्र्यांकडे तो हुकूम होण्याकरितां तें प्रकरण पाठवीत.

लॉर्ड मेयो यांस पडणाऱ्या लेखी कामाची ही हकीगत झाली. सर्व हुकूम त्यांच्या नांवानें सुटत. तसेंच खरोखर महत्त्वाचें असें हरएक प्रकरण त्यांच्या हातांतून जाऊन त्याजवर त्यांचा हुकूम होत असे; अथवा खात्याच्या मंत्र्याच्या मूळ अभिप्रायाखालीं त्यांची सही होत असे. सातही खात्यांतील जरुरीचीं प्रकरणें तर प्रथमतःच त्यांजकडे जात, असें वर सांगितलेंच आहे. तसेंच खात्यांच्या मंत्र्यांस व आपणांस मिळून कोणत्या प्रकरणांचा निकाल उत्तम प्रकारें लावितां येईल, व कोणतीं प्रकरणें कौन्सिलांतील सर्व अथवा कांहीं विशिष्ट सभासदांकडे फिरविलीं पाहिजेत, ह्याचा निर्णयही त्यांनाच ठरवावा लागे. सारांश, त्यांचे हुकूम गव्हर्नर जनरल-इन्-कौन्सिल ह्या नांवाखालीं सुटत; ह्यास्तव आपल्या मंत्रिमंडळाच्या एकवट विचाराला योग्य रीतीनें अनुसरून ते

हुकूम आहेत किंवा नाहींत इकडेही त्यांना लक्ष ठेवावें लागे. कागदपत्र फिरविण्याचें काम महागनी लांकडाच्या लांबट पेट्यांतून चालत असे, व अद्यापिही तसेंच चालतें. ह्या पेट्यांत हवा शिरण्यासही मार्ग नसून त्यांना एकजात चबचीं कुलपें असत. प्रत्येक अंडर सेक्रेटरी, डेप्युटि सेक्रेटरी, चीफ सेक्रेटरी व कौन्सिलचा सभासद यांजकडे दररोज सकाळीं त्याच्या त्याच्या वांटणीच्या कामाचे कागदपत्र ह्या लहान लहान पेट्यांतून यावयाचे; प्रत्येका-जवळ त्याची स्वतःची किल्ली असावयाची; आणि आप-ल्यापुढें आलेल्या प्रकरणांचा योग्य विचार करून फाइल-वर आपलें मत दाखल करून त्यानें कुलूप लावून पेटी पुढें रवाना करावयाची. ह्याप्रमाणें सातही खात्यांकडून एका-मागून एक येणाऱ्या पेट्या सकाळपासून संध्याकाळपर्यंत केव्हांही व्हाइसराय यांजकडे येत असत. दररोजच्या सर्व प्रकारच्या कामांच्या ह्या भाऱ्यांशिवाय अति दगदगी-च्या खात्यांपैकीं दोन खातीं–परदेशसंबंधी व पब्लिक वर्क्स्‌संबंधी—त्यांच्याच हातीं असल्यामुळें त्यांचें ओझें सर्वस्वीं त्यांजवर पडे.

खुद्द व्हाइसराय यांना करावीं लागणारीं विशेष प्रका-रचीं कामें तीन प्रकारचीं असतात. दर आठवड्यास ते आपल्या प्रत्येक चीफ सेक्रेटरीची भेट घेत, तेव्हां होणाऱ्या कामांचा समावेश पहिल्या प्रकारांत होतो; प्रवर्तक (एक्झि-क्युटिव्ह) कौन्सिलांत जात तेव्हां तेथें होणाऱ्या कामांचा दुसऱ्या प्रकारांत होतो; आणि विधायक (लेजिस्लेटिव्ह) कौन्सि-लांत होणाऱ्या कामांचा तिसऱ्या प्रकारांत होतो. हीं तिन्ही

कामें दर आठवड्यांत एकेक वेळां व्हावयाचीं. सात सेक्रे-टरींपैकीं कोणीं कोणत्या वारीं गव्हर्नर जनरल यांस भेटा-वयाचें, तें ठरविलेलें असे. त्या प्रसंगीं विशेष महत्त्वाचीं प्रकरणें त्यानें त्यांजपुढें ठेवावयाचीं; त्यांसंबंधानें प्रश्न उद्भवतील त्यांचा खुलासा करावयाचा; आणि त्या प्रकर-णांची फाइल इतर सभासदांकडे फिरविण्यापूर्वीं त्या फायलीमध्यें आणखी कांहीं कागदपत्र वगैरे सामील करा-वयाचे असल्यास त्याबद्दल व्हाइसराय यांचा हुकूम घ्यावयाचा.

प्रवर्तक शाखेच्या कौन्सिलाकडे व्हाइसराय दर आठ-वड्यांत एक दिवस देत. ह्या कौन्सिलामध्यें १३२ पानांतील कोष्टकांत सांगितलेले मंत्री—म्हणजेच कौन्सिलचे मेंबर—असून हिंदुस्तानचे सेनापति ( कमांडर-इन्-चीफ ) हेहीं एक जादा सभासद असतात. ह्या थोड्याशा लोकां-च्या हातांत एकंदर राज्यसूत्रें असल्यामुळें ही एक प्रकारची अल्पजनसत्ताक राज्यपद्धतिच होती. एकंदर देशाच्या राज्यपद्धतीचें धोरण कोणत्या प्रकारें ठेवावयाचें, अशाविषयीं सर्व प्रकरणांचा खल ह्या सभेंत गुप्त रीतीनें चालतो, ( म्हणजे इतर लोकांस सभेला जाण्याची पर-वानगी नसते ); नंतर काय ते हुकूम सुटतात. सातही खात्यांचे सेक्रेटरी ह्या प्रसंगीं शेजारच्या एका खोलींत बसलेले असतात. नंतर ज्या खात्याचें काम सभेपुढें वि-चारासाठीं येईल त्या खात्याच्या मंत्र्याला मदत करण्या-साठीं त्या खात्याच्या सेक्रेटरीला मात्र सभेंत बोलावि-तात. सर्व सभासदांनीं कागदपत्र पाहून आपापले अभि-

प्राय पूर्वींच नमूद केलेले असतात; ह्यास्तव सभेंत येतात तेव्हां त्यांना एकंदर गोष्टींची पुरी माहिती झालेलीच असते. म्हणून सभेंत फारसा वादविवाद चालत नाहीं. पार्लमेंटांत चालणाऱ्या अप्रतिबंध वादविवादाची संवय लॉर्ड मेयो यांस होती. ह्या कौन्सिलांत तर अत्यंत महत्त्वाच्या प्रकरणांचा निर्णय सुद्धां केव्हांच होई; व एका दिवसांत किती तरी कामांचा उलगडा लागे. ह्यामुळें ह्या दोन्ही गोष्टींचें लॉर्ड मेयो यांस मोठें आश्चर्य वाटून त्यांना समाधानही झालें; व तसा उल्लेख त्यांनीं कागदोपत्रीं करून ठेविला आहे. कौन्सिलांत त्यांचें चांगलें वजन असल्यामुळें त्या वजनाचाही ह्या प्रसंगीं त्यांना चांगला उपयोग झाला. बहुतेक कामीं प्रत्यक्ष मतें घेण्याचा प्रसंग ते येऊंच देत नसत. प्रतिकूल असणाऱ्या सभासदांच्या मताला त्यांनीं थोडाबहुत मान देऊन त्यांना आपलेसें करून घ्यावें. महत्त्वाच्या प्रकरणांतून प्रायः बहुतेक सर्व प्रसंगीं ते बरेंचसें बहुमत आपल्या बाजूचें करून घेत; किंवा ते त्या पक्षाचा पुढाकार स्वतः घेत. तसेंच आपल्या राज्यकारभाराचें सुकाणूं कोणत्या धोरणानें वळवावयाचें ह्याचा निकाल आपल्या एकट्याच्या मर्जीनुरूप लावण्याचा आपणास कायदेशीर अधिकार आहे,—मग हा अधिकार फार क्वचित् प्रसंगीं अमलांत येईना—ह्या गोष्टीचें विस्मरण त्यांनीं आपल्या कारकीर्दींत आपल्या कौन्सिलाला कधीं होऊं दिलें नाहीं.

कित्येक प्रकरणांवर विशेष कडाक्याचा वादविवाद चालतो; तेव्हां बहुधा पुढें दर्शविल्याप्रमाणें स्थिति असते.

खुद व्हाईसराय व तें प्रकरण ज्या खात्यासंबंधीं असेल त्या खात्याचे कौन्सिलांतील मंत्री ह्या उभयतांनीं त्या प्रकरणाचा पुरा खल केलेला असतो; व कौन्सिलापुढें जी सूचना ठेवितात, ती त्या उभयतांच्या अभिप्रायानुसार असते. ह्या प्रकरणांतील कागदपत्रांसह हा अभिप्राय कौन्सिलांतील इतर सभासदांकडे फिरून आलेला असतो, व त्यावर त्यांचे शेरे झालेले असतात. ह्यामुळें हा प्रश्न कौन्सिलपुढें येतो तेव्हां कागदपत्र फिरत असतां प्रत्येक सभासदानें मोठ्या विचारपूर्वक आपला अभिप्राय देऊन ठेविलेला असतो. त्या अभिप्रायांपलीकडे कोणीं कितीही चर्चा केली तरी, एकादी नवीन गोष्ट निष्पन्न होऊन त्या प्रश्नाचा जास्त खुलासा होणें बहुतेक अशक्य असतें. तो प्रश्न ज्या खात्यासंबंधीं असतो त्या खात्याच्या सभासदानें कांहीं एक प्रकारचें राजधोरण सुचविलेलें असून व्हाइसराय साहेबांचा त्याला दुजोरा असतो; व इतर बहुतेक सभासदांचे अभिप्रायही बहुधा मूळ सभासदानें सुचविलेल्या धोरणाला अनुकूल असेच असतात; बाकीचे कित्येक विरुद्ध असतात. कौन्सिलाच्या सभेपुढें प्रकरण आलें म्हणजे, केव्हां कित्येक गोष्टींचा खुलासा करून, केव्हां दूरदर्शानें विरुद्ध पक्षाचें म्हणणें थोडेंफार मान्य करून, लॉर्ड मेयो हे बहुधा एक दोन सभासदांशिवाय इतरांना अनुकूल करून घेण्याचा प्रयत्न करीत. असें झाल्यावर ह्या एक दोघांनीं वाटेल तर बहुमताला मिळावें, वाटेल तर विरुद्ध रहावें. ह्याप्रमाणें हिंदुस्तान सरकारचा अखेर जो ठराव होईल त्याजबद्दल खलिते स्टेट सेक्रेटरी यांजकडे

जात. त्यांत प्रतिकूल असलेल्या सभासदांचीं नांवें देण्यांत येत; आणि त्यांना योग्य वाटल्यास ते जे प्रतिकूल अभिप्राय लिहून ठेवीत, ते सर्व अभिप्रायही त्याला जोडून पाठवीत.

हा क्रम ध्यानांत येण्यासाठीं आपण एकादें उदाहरण कल्पूं. सरहद्दीसंबंधानें एकादी मोहीम करण्याचा ठराव झाला असून वास्तविक रीतीनें ह्या कामाला ज्या प्रकारची फौजेची तयारी अवश्य आहे त्याहून विशेष खर्चाची तयारी करण्याची सेनापति यांची इच्छा आहे; असें मानूं. कोणत्याही मोहिमेंत आपली फत्ते खात्रीनें झालीच पाहिजे, हें पाहण्याचें काम सेनापतीचें आहे; आणि हा हेतु तडीस जावा म्हणून त्यांच्या मदतीस दोन खातीं आहेत; व त्या खात्यांतून भरपूर कामगार आहेत. हीं खातीं म्हणजे एक *आड्जूटंट जनरल यांचें व दुसरें †कार्टर मास्टर जनरल यांचें. हिंदुस्तान सरकारचें काम इतकेंच कीं मोहिमेंत फत्ते होण्यास ज्या खर्चाची आवश्यकता नाहीं, अशा कोणत्याही खर्चास परवानगी न देण्याविषयीं खबरदारी ठेवणें. हें करितां यावें म्हणून सेनापति यांनीं

---

* सरकारचे हुकूम घेऊन ते सेनापतीला वेळोवेळीं कळविण्यासाठीं कित्येक लष्करी कामगार असतात त्यांना आड्जूटंट म्हणतात. व अशा कामगारांवरील मुख्याला आड्जूटंट जनरल म्हणतात; ( भा. क. )

† पलटणीच्या जागा, बराकी, तंबू वगैरे व इतर सामानाचा सांठा ज्याच्या ताब्यांत असतो, अशा लष्करी कामगाराला क्कार्टर मास्टर म्हणतात; व त्यांजवरील मुख्याला क्कार्टर मास्टर जनरल म्हणतात. ( भा. क. )

ठरविलेले बेत व त्यांच्या खर्चाचा अजमास, हीं प्रथमतः व्हाइसराय व त्यांच्या कौन्सिलांतील लष्करी खात्याचे मंत्री मिळून बारकाईनें तपासतात; व ह्या कामीं लष्करी खात्यांतील सेक्रेटरी वगैरेंची मदत ते घेतात. नंतर त्या प्रकरणाचा विचार कौन्सिलांत होतो. सेनापति म्हटले म्हणजे त्यांना खर्चाच्या विचाराकडे बारीक दृष्टि पोहोंचविण्याची फारशी आवश्यकता नसते. तथापि कौन्सिलांतील लष्करी खात्यावरील मंत्री व त्यांचे सेक्रेटरी ह्यांची निवड त्यांना असलेल्या कामकाजांच्या अनुभवावरून व त्यांच्या हिंदुस्तानांतील अनुभवावरून प्रायः झालेली असते. ते नांवालौकिकास चढलेले योद्धे असतात. तथापि ते अशा प्रकारचे योद्धे असतात कीं, ते त्या हुद्द्यांवर आहेत तोंपर्यंत युद्धाला लागणाऱ्या खर्चाच्या बाजूकडेही धोरण ठेवणें हें त्यांचें कर्तव्य असतें. ह्याप्रमाणें केव्हां केव्हां असें घडण्याचा संभव आहे कीं, सेनापति हे सामानसुमान वाहण्यासाठीं आपल्या लवाजम्यांत हत्ती किंवा उंट मागतात; व त्याला खर्च बराच येणारा असतो. तथापि ज्या प्रदेशांतून ह्या हत्तींचा किंवा उंटांचा उपयोग करावयाचा, त्या ठिकाणांसंबंधीं चौकशी करून मिळविलेल्या माहितीवरून असें दिसून येतें कीं, हीच कामगिरी नदीमार्गानें जहाजांच्या द्वारें किंवा बैलगाड्यांच्या द्वारें तितक्याच उत्कृष्ट प्रकारें होऊन खर्च मात्र कमी लागेल. पुढें ह्या संबंधाचे कामदपत्र बाकीच्या सभासदांकडे फिरविण्यांत येतात, तेव्हां त्यांत प्रत्येक बाजूचें म्हणणें नमूद झालेलें असल्यामुळें अशा प्रकारचें मतवैचित्र्य नाहींसें होतें;

निदान कोणी तरी अशी एकादी शक्कल सुचवितो कीं तेणेंकरून कांहीं तडजोड निघेल.

तथापि हा प्रश्न प्रत्यक्ष वादविवादासाठीं कौन्सिलापुढें आल्यास व्हाइसराय व लष्करी खात्याचे मंत्री यांचें मतैक्य असतेंच; आणि नगदी खात्याचे मंत्रीही बहुतांशीं त्यांच्या बाजूला असण्याचा संभव असतो. तेव्हां सेनापतींच्या लेखी प्रमाणांवरून ज्यांच्या मनाची खात्री झालेली असते, अथवा त्यांच्या लष्करी वाकबगारीला मान देऊन, तसेंच मोहिमेची प्रत्यक्ष जबाबदारी त्यांजवर असते ही गोष्ट लक्ष्यांत घेऊन, लष्करी बाबतींत आपला हेका सोडून त्यांच्या मताला मान देणें बाकीच्या सभासदांपैकीं ज्यांना युक्त दिसतें, ते मात्र सेनापतींच्या बाजूला असतात. तसेंच अशा प्रकारें ह्या कामांत सेनापतींचें कांहीं कमी वजन पडत नाहीं. कारण हिंदुस्तानांतील कामगारांना येथें आलेल्या अनुभवावरून त्यांचा असा ग्रह झालेला असतो कीं, कोणत्याही कामांत कोणत्या गोष्टीची आवश्यकता आहे ह्याचें उत्कृष्ट ज्ञान वास्तविक पाहिलें असतां त्या धंद्यासंबंधीं माणसालाच असतें. आपली बाजू योग्य रीतीनें कौन्सिलापुढें मांडिल्यानंतरही सभासदांचें मत सेनापतींच्या सूचनेला अनुकूल दिसल्यास व्हाइसराय हे बहुधा आपला आग्रह सोडतात. उलट पक्षीं, व्हाइसराय व लष्करी खात्याचे मंत्री ह्यांनीं आणिलेल्या प्रतिसूचनेप्रमाणें व्यवस्था झाल्यास कोणतेंही व्यंग पडणार नाहीं, अशी त्यांनीं दाखविलेल्या प्रमाणांवरून खात्री झाल्यास

सेनापति हे आपली मूळची सूचना परत घेतात; अथवा नवीनच एकादी तडजोड काढितात.

सरकारचें परदेशसंबंधी राजधोरण, आगगाड्यांचे रस्ते, एकादा महत्त्वाचा कायदा अथवा दुसरें एकादें सरकारी खातें; ह्यांसंबंधानेंही वर दर्शविल्याप्रकारें मतवैचित्र्य उत्पन्न होऊन कौन्सिलांत दोन पक्ष पडण्याचा संभव असतो. कौन्सिलापुढें येणाऱ्या विवक्षित प्रश्नासंबंधानें आपल्या मनाचा पक्का निश्चय करून प्रत्येक सभासद सभेला येतो; व आपला विचार बरोबर आहे असा त्याचा दृढ ग्रह असतो. तसेंच इतर सर्वांच्या अभिप्रायांतील मुद्दे वाचिल्यानंतरही त्याची अशी पक्की खात्री असते कीं, आपल्या विरुद्ध सभासदांच्या मनाचीही स्थिति अगदीं आपल्याप्रमाणेंच झालेली असते, ही गोष्टही तो जाणून असतो. म्हणून आपल्या विचाराप्रमाणेंच प्रश्नाचा निकाल लावण्याविषयीं प्रत्येक सभासद निश्चय करून आलेला असला, तरी मतभेद उत्पन्न झाल्यास आपल्या विचाराला थोडाबहुत अनुसरून निकाल लागल्यास तेवढ्यांतच आपणास प्रायः समाधान मानावें लागेल; असें तो जाणत असतो. तसेंच एकंदर हिंदुस्तानसरकारचा म्हणून ठराव एकदां झाला कीं सर्व सभासद तो आपलाच ठराव मानितात. व्हाइसराय यांचें मत कसें काय आहे इकडे लक्ष न देतां आपल्या मनाला जो विचार सर्वोत्कृष्ट वाटेल तोच तडीस नेण्यासाठीं प्रत्येक सभासद विलक्षण उत्सुकतेनें झटत असतो; तसेंच आपल्या इतर साथीदारांचीं मतें घेऊन नंतर तदनुसार जें कांहीं राजधोरण अखेरीस ठर-

विण्यांत येईल, त्याप्रमाणें प्रत्येक सभासद मोठ्या इमानानें व उदार अंतःकरणानें वर्तन ठेवीत असतो. ह्या दोन्ही गोष्टींसंबंधानें लॉर्ड मेयो यांना मोठें आश्चर्य वाटून समाधान होई; व तें त्यांनीं कागदपत्रांतून व्यक्त करून ठेविलें आहे. वसाहतींसंबंधाचा राज्यकारभार बिनबोभाट चालविण्याचें विशेष प्रकारचें बुद्धिसामर्थ्य इंग्लिशांच्या आंगीं आहे, ह्यांतील बीज तरी इतकेंच कीं, आपल्या मताच्या प्रतिपादनार्थ सुरू असलेला वाद पुरा होऊन नंतर जो कांहीं ठराव होईल, तो सर्वजण इमानें-इतबारें पाळितात.

ह्याप्रमाणें हरएक खात्यासंबंधीं प्रश्नांचा खल करण्यासाठीं आपल्या प्रत्येक चीफ सेक्रेटरीची व्हाइसराय दर आठवड्यांत भेट घेत, व प्रवर्तक शाखेच्या कौन्सिलांतही जात. ह्याशिवाय कायदेकानू ठरविण्यासाठीं जी एक मंत्रिसभेची शाखा असते, तिजकडेही दर आठवड्यांत एक दिवस ते देत. मंत्रिसभेच्या ह्या शाखेला थोडक्यांत लेजिस्लेटिव्ह ( विधायक ) कौन्सिल असें नांव आहे. ह्या कौन्सिलांत व्हाइसराय यांच्या प्रवर्तक कौन्सिलांतील सर्व सभासद असून कौन्सिलाच्या दिवशीं व्हाइसराय हे ज्या प्रांतांत असतील त्या प्रांताचे लेफ्टेनेंट गव्हर्नर हेही असतात. शिवाय नेटिव्ह व युरोपियन लोकांच्या तर्फे कित्येक सभासद त्यांत असतात; व त्यांची नेमणूक सरकारी नौकर ह्या नात्यानें नसल्यामुळें त्यांना नॉन ऑफिशल (बिनसरकारी) म्हणतात. ह्या विधायक कौन्सिलामध्येंही व्हाइसराय हेच अध्यक्ष

( प्रेसिडेंट ) असतात. वास्तविक पाहिलें असतां ह्या विधायक शाखेंत प्रत्यक्ष कायदेकानू कांहीं तयार होत नाहींत. ह्या शाखेंतून अखेर बाहेर पडणारे बहुतेक कायदे असे असतात कीं, त्यांचे मसुदे स्थानिक सरकारांनीं ठरविले असून ते हिंदुस्तान सरकाराकडे मंजुरीसाठीं पाठविलेले असतात. ह्याप्रमाणें मंजुरीसाठीं आलेल्या ह्या कायद्यांचा विचार प्रथमतः व्हाइसराय व विधायक खात्यांतील मंत्री हे उभयतां मिळून करितात; नंतर प्रवर्तक शाखेंतील सर्व सभासदांकडे ते फिरवितात; व विधायक कौन्सिलापुढें ते 'कायद्यांचे मसुदे' अशा दृष्टीनें मांडण्यापूर्वीं प्रवर्तक कौंसिलामध्यें ते विधायक कौन्सिलापुढें ठेवावे अशाविषयीं ठराव करून ठेवितात.

पुढें ह्या विधायक कौन्सिलांतील सभासद आपल्यापैकींच कित्येकांची एक कमिटी त्या मसुद्याचा विचार करण्यासाठीं नेमितात; आणि सरकारी ग्याझेटमध्यें कित्येक वेळां तो मसुदा प्रसिद्ध केल्यानंतर अखेरीस हें कौन्सिल तो मसुदा नामंजूर करितें, त्यांत फेरफार करितें, अथवा तो कायद्याच्या स्वरूपानें मंजूर करितें. विधायक शाखेच्या कौन्सिलांत जाण्यास लोकांना मज्जाव नाहीं; तेथें चालणाऱ्या कामकाजांची हकीगत वर्तमान पत्रांतून येते; आणि सरकारी लघुलेखकाच्या टिपणांच्या आधारें ती सरकारी ग्याझेटांत प्रसिद्ध होते. इंग्रज लोकांचें मन स्वभावतःच कायद्याला अनुसरून वागण्याकडे असतें, तसेंच हिंदुस्तानांतील न्यायाचीं कोर्टें आपापलीं कामें प्रवर्तक खात्यांतील कामगारांची भीडमुरवत न धरितां

निस्पृहतेनें व कायद्याप्रमाणें चालवितात. ह्यामुळें अनेक कृत्यांना कायद्याची मंजुरी असणें भाग पडतें. अशा कृत्यांसंबंधानें कंपनीच्या अमलांत गव्हर्नर जनरल यानीं आपल्या प्रवर्तक कौन्सिलांत ठराव केले म्हणजे काम भागत असे. वास्तविक पाहिलें असतां राजधोरणासंबंधीं महत्त्वाचे बहुतेक सर्व प्रश्न कधींनाकधीं ह्या विधायक कौन्सिलापुढें येऊन तेथें त्यांचा खल व्हावयाचाच. परदेशसंबंधीं अथवा लष्करी हालचालींसंबंधीं कामांशीं ज्यांचा प्रत्यक्ष संबंध असेल, असे प्रश्न मात्र ह्या कौन्सिलापुढें यावयाचे नाहींत. सर्व सरकारी सभासद एका मताचे असतील तर ह्या विधायक कौन्सिलांत सरकारी कामगारांचेंच बहुमत व्हाइसराय यांना मिळतें. आणि गव्हर्नर जनरल यांच्या प्रवर्तक कौन्सिलामध्यें कोणत्याही कायद्यावर आधीं चर्चा होऊन तेथें त्याला मंजुरी मिळाल्याशिवाय तो ह्या विधायक कौन्सिलापुढें यावयाचा नाहीं. म्हणून विधायक कौन्सिलांत जितके सरकारी सभासद असतात, तितकीं मतें व्हाइसराय यांच्या बाजूला साधारणतः असावयाचींच.

लॉर्ड मेयो यांची वेळेच्या खर्चांत फार कडक काटकसर असे. प्रत्येक दिवशीं कोणकोणतीं कामें करावयाचीं तें नेमिलेलें असे; व प्रत्येक तासाला त्यांना कोणाची ना कोणाची तरी भेट घ्यावयाची किंवा कोणतें तरी काम करावयाचें असून त्याची योजना पूर्वींच ठरवून ठेविलेली असे. ते सूर्योदयाबरोबर उठत; तथापि सकाळींच घोड्यावरून थोडीशी रपेट करून येण्याची जी हिंदु-

स्तानांत चैनीची संवय लागते, तीप्रमाणें त्यांना क्वचित्च करण्यास सांपडे. म्हणून ९॥ वाजतां सकाळच्या नास्त्याची वेळ होईपर्यंत ते एकटेच आपल्या कामांच्या " पेट्या " उघडून बसत. १० वाजतां त्यांचे प्रायव्हेट सेक्रेटरी तोंपर्यंत आणखी जमा झालेल्या पेट्या घेऊन त्यांजकडे येत. तसेंच त्या दिवशीं जीं कामें करावयाचीं त्यांचा व्यवस्थित रीतीनें कार्यक्रमही ते करून आणीत. ह्यानंतर त्यांचे लष्करी खात्याचे सेक्रेटरी येऊन अशाच रीतीनें फौजेसंबंधीं जे विशेष प्रकारचे प्रश्न असतील, ते त्यांजपुढें ठेवीत. हे लष्करी सेक्रेटरी म्हणजे खाजगी संबंधानें जी कित्येक कामगार मंडळी व्हाइसरायांच्या नेमणुकींत असतात त्यांपैकीं होत. हिंदुस्तान सरकारचे ( गव्हर्नर जनरल-इन्-कौन्सिल यांचे ) म्हणून जे लष्करी सेक्रेटरी ते अगदीं भिन्न होते; तसेंच आड्जूटंट जनरल व क्वार्टर मास्टर जनरल यांचीं जीं मोठालीं खातीं, त्यांशींही ह्यांचा कांहीं संबंध नाहीं. ह्याप्रमाणें ज्या एकंदर पेट्यांतील कागदपत्र त्यांना त्या दिवशीं पहावयाचे असतील ते पाहण्यास ११ वाजतां लॉर्ड मेयो हे आरंभ करीत; व २ वाजतां दुपारच्या फराळाची वेळ येईपर्यंत तें काम चाले. तसेंच त्या फराळानंतर कामास पुनः सुरवात होऊन तें इतक्या उशीरापर्यंत चाले कीं, त्यानंतर घोड्यावरून थोडी भरधांव रपेट ते घेऊन येतात तों अगदीं काळोख होई. परत आल्यानंतर पुनः ८॥ वाजतां जेवणाची वेळ होईपर्यंत ते काम करीत बसत; व कपडे वगैरे घालण्याकडे जो अर्धा तास खर्च होई

तेवढ्यांत ते आपल्या अगदीं धाकट्या मुलाबरोबर खेळत, किंवा आपल्या पोषाखासंबंधाच्या टेबलावर त्याला उंच चढवून जुन्या करारांतील व शेक्सपीअरच्या नाटकांतील गोष्टी त्याला सांगत. अशा रीतीनें ह्या मुलाजवळ गोष्टींचा मोठाच सांठा झाला. आपल्या वडिलांच्या मृत्यूनंतर एक वर्षानें त्यानें त्यांपैकीं फुटकळ गोष्टी सर विल्यम हंटर यांस सांगितल्या; त्या ऐकून त्यांना फार आश्चर्य वाटलें. कारण त्याच्या स्मरणशक्तीची धांदल उडून म्याकबेथमधील* चेटकिणी एन्डॉरमध्यें* व एन्डॉरमधील चेटकीण म्याकबेथमध्यें; असा त्यानें एकच गोंधळ उडवून दिला. हा मुलगा आतां चांगला वयांत आला आहे!

लॉर्ड मेयो यांजकडे भोजनास कोणी पाहुणे नाहींत असे दिवस वर्षांत थोडेच असत. तसेंच सरकारवाड्यांत भोजनानंतर कांहीं करमणुकीचा प्रकार नाहीं, असे दिवस आठवड्यांत फारसे नसत. कधीं बॉल ( एक प्रकारचा नाच ), कधीं सरकारी गाणेंबजावणें, कधीं खाजगी नाटकें, कधीं एकाद्या नेटिव्ह राजाचें आदरातिथ्य अथवा कोणत्याना कोणत्या प्रकारचा ऍट† होम असावयाचाच. दिवसभर त्यांना

---

* म्याकबेथ नांवाचा एक स्कॉटलंडचा राजा होता; व महाकवि शेक्सपीअर ह्याच्या ह्याच नांवाच्या एका शोकपर्यवसायी नाटकांतील हा नायक असल्यामुळें ह्याचें नांव अक्षय्य झालें आहे. एंडॉर हें एक अप्रसिद्ध नाटक आहे. ह्या दोहोंतही चेटकिणींचा संबंध असून त्याला अनुलक्षून हा उल्लेख आहे. ( भा. क. )

† 'ऍट होम' हा इंग्रज लोकांतील एक आदरातिथ्याचा व शिष्टाचाराचा प्रकार आहे. सभ्य लोकांस व मित्रमंडळीस आपल्या घरीं निमंत्रण करून त्यांस फलाहाराची वगैरे व्यवस्था

कितीही कष्ट अथवा त्रास झाला असला, अथवा त्यांच्या मनोदयानुरूप कामें झालीं नसलीं, तरी दुसऱ्या दिवशीं सकाळीं त्यांच्या चेहऱ्यावर त्यांच्या मनाला अस्वस्थता असल्याचें कांहीं चिन्ह नसे. आपल्या पाहुण्यांपैकीं कोणाकडे कशा रीतीनें विशेष लक्ष पुरवावें; तसेंच ज्याला ज्या विषयाची उत्तम माहिती असेल त्याशीं थोड्याच वेळांत त्या विषयावर संभाषण कसें चालवावें; ह्या संबंधानें त्यांचें बुद्धिसामर्थ्य विलक्षण कौतुक करण्यासारखें होतें. त्यांचे प्रायव्हेट सेक्रेटरी ह्या संबंधानें लिहितातः—"लवकरच उपस्थित होणाऱ्या एकाद्या महत्त्वाच्या प्रश्नासंबंधानें ह्यांचें मन अत्यंत व्यग्र होऊन कैक वेळां आपल्या दिवाणखान्यांतून ते बाहेर पडत; आणि क्षणांत तें सर्व विसरून आपल्या पाहुण्यांचें स्वागत करीत; व त्यांच्या पाहुणचाराचा स्वीकार करण्यास जे कोणी येत—मग ते युरोपियन असोत वा नेटिव्ह असोत—त्या सर्वांचीं अंतःकरणें, आपल्या आंगच्या ममताळूपणानें, आनंदवृत्तीनें व सरकारी नात्याचा आपल्या वर्तनांत मागमूसहीं न ठेविल्यानें, ते मोहून टाकीत. त्यांच्याशीं संबंध असलेल्या माणसांत, ज्यांना वर दर्शविल्या प्रकारचे अनेक प्रसंग स्मरणार नाहींत, अशीं थोडींच सांपडतील.

पहिल्या पहिल्यानें ते रात्रींही काम करीत; म्हणजे

---

केलेली असते; व घरचे यजमान व यजमानीण उभयतां सर्वांशीं मोकळ्या मनानें बोलून त्यांचें स्वागत करितात. कलेक्टर, कमिशनर, गव्हर्नर, गव्हर्नर जनरल वगैरे अधिकारी असे समारंभ करितात; व त्या वेळीं आपला वरिष्ठ दर्जा विसरून सर्वांशीं मोकळेपणानें वागतात. ( भा. क. )

दिवसास चालू असलेलें कामकाज, रात्रीं पाहुणेमंडळी व घरचीं माणसें झोंपीं गेल्यावरही बराच वेळ ते करीत बसत. तथापि आपल्यासारख्या मजबूत बांध्याच्या प्रकृतीच्या मनुष्याला देखील हिंदुस्तानच्या हवेमुळें मनःपूत वागतां यावयाचें नाहीं, असें त्यांना लवकरच आढळून आलें; व त्यांना ती संवय सोडून द्यावी लागली. वर दर्शविलेल्या लॉर्ड मेयो यांस कराव्या लागणाऱ्या लेखी कामांचा व्यवस्थित रीतीनें कार्यक्रम जुळवितां येण्यास फार सूक्ष्म तऱ्हेची दूरदृष्टि पाहिजे, असें वाचकांच्या ध्यानीं येईल. तशी दूरदृष्टि असेल तरच, व्हाइसराय ह्या नात्यानें त्यांना विशेष सार्वजनिक स्वरूपाचीं जीं कामें करावीं लागणार, त्यांमुळें त्यांच्या त्या कार्यक्रमास होतां होईल तितका कमी व्यत्यय येईल. आपल्या प्रत्येक सेक्रेटरीच्या भेटी, तसेंच प्रवर्तक व विधायक कौन्सिलाच्या बैठकी, कोणत्या दिवशीं व किती वाजतां व्हावयाच्या तें नक्की ठरविलेलें असे; व ह्याप्रमाणें जो छापील कार्यक्रम त्यांच्या टेबलावर ठेविलेला असे, त्यांत थोडाही फेरफार करण्याची परवानगी नसे. तथापि आदरातिथ्यासंबंधीं वगैरे समारंभ व स्वतःच केलीं पाहिजेत अशीं इतर कामें त्यांना बहुत असत; व त्यांचा वर दर्शविल्या प्रकारचा कार्यक्रम पूर्वींच लावून ठेवणें अशक्य असे.

आज परराष्ट्रासंबंधीं एकादा वकील किंवा हजार मैलांवरून एकादा मोठा मांडलिक राजा आपल्या लवाजम्यानिशीं व्हाइसराय यांच्या भेटीस यावयाचा; उद्यां त्यांनीं त्याला परतभेट द्यावयाची; परवां एकाद्या इमारतीच्या पायाचा

दगड बसवावयाचा; तेरवां शहरांतील एकादी संस्था किंवा दवाखाना पहावयाचा; पांचव्या दिवशीं कांहीं नवीन कामें पाहण्याकरितां अथवा ज्या नदीमुखाजवळील एकाद्या खाडीवर पूल बांधण्याची शक्कल निघणें इंजिनीयर खात्याला आजपर्यंत अशक्य वाटत होतें, अशा एकाद्या पुलाची पाहणी करण्यासाठीं आगगाडीनें चटकन जाऊन यावयाचें; सहाव्या दिवशीं एकाद्या कालव्याच्या मूळ बंधाऱ्यांत पाणी सोडावयाचें; सातव्या दिवशीं कलकत्ता युनिव्हर्सिटीचे चान्सेलर ( मुख्य पंडित ) ह्या नात्यानें एकादें महत्त्वाचें व्याख्यान द्यावयाचें, किंवा एकाद्या कॉलेजांतील अथवा शाळेंतील बक्षिससमारंभाचे वेळीं विद्यार्थ्यांना उत्तेजनार्थ दोन शब्द सांगावयाचे. सारांश, यांच्या कर्तव्यांत अशा नानाविध विषयांचा समावेश होत असल्यामुळें त्यांच्यासंबंधानें अगदीं ठरावीक अशी योजना करितां येत नसे. तथापि ह्या कृत्यांमुळें आपल्या नियमित कामाला होईल तितका कमी व्यत्यय येईल अशी व्यवस्था आपल्या प्रायव्हेट सेक्रेटरींनीं ठेवावी अशी त्यांची इच्छा असे; व ह्या कामीं त्यांजवर हवाला ठेवणें न्यायाचें होतें. वर दर्शविलेल्या अनेक प्रकारच्या समारंभांपैकीं जेव्हां जेव्हां सोईचें पडेल तेव्हां तेव्हां, त्या दिवसाच्या कामास व्यत्यय येऊं नये म्हणून आपल्या सायंकाळच्या रपेटीचा वेळ ते तिकडे देत.

लॉर्ड मेयो यांच्या कारकीर्दीत राज्यव्यवस्थेसंबंधानें ज्या मोठमोठ्या उपायांची सुरवात झाली, अथवा जे पूर्णपणें अमलांत आले, त्यांची हकीकत पुढें ६, ७ व ८

ह्या प्रकरणांत दिली आहे. ह्या हकीकतींत अनेक गोष्टी गाळिलेल्या आहेत; व त्या गाळणें लॉर्ड मेयो यांना अति अयोग्य वाटलें असतें. त्यांनीं स्वतः केलेल्या कृत्यांपैकीं कांहीं गाळिलेलें नाहीं; तर इतरांपासून त्यांना जी मदत मिळाली तिचा उल्लेख केलेला नाहीं. त्यांच्या मदतनिसांपैकीं कांहीं थोड्या इसमांशिवाय बाकीचे आज मित्तीस हयात असून त्यांपैकीं कित्येक अद्यापि मोठमोठ्या हुद्द्यांवर आहेत. तेव्हां हयात असलेल्या इसमांपैकीं कोणाची स्तुति अथवा निंदा करण्याच्या उद्देशानें हें पुस्तक लिहिलें नाहीं. तथापि आपल्या चरित्रनायकाला अशा रीतीनें त्याच्या सभोंवतालच्या मंडळीपासून विलग काढिल्यानें त्याच्या संबंधानें आपण अन्याय करीत आहों, असें प्रायः प्रत्येक पान लिहितांना वाटणें साहजिक आहे. लॉर्ड मेयो हे अशाच प्रकारचे गृहस्थ होते कीं, त्यांनीं आपला आयुष्यक्रम स्नेह्यासोबत्यांत कंठिला. ह्यास्तव त्यांच्या स्वभावांतील ह्या गुणाची अभिवृद्धि कशी होत गेली, हें त्यांच्या चारित्रांत दिलें नाहीं तर तें अर्धवटच होय. तथापि एकाद्या समकालीन पुरुषाचें चरित्र लिहावयाचें असतां तें कित्येक नियमांना अनुसरून लिहावें लागतें; त्यांपैकीच त्यांच्या मित्रांची हकीकत त्यांत गाळणें हा एक होय. हा नियम पाळिल्यामुळें ह्या चरित्रास कांहींसें असभ्यतेचें स्वरूप येण्याचा संभव आहे. परंतु ह्या संबंधानें खुद्द आपणांस सर्वांहून विशेष वाईट वाटणारें आहे, असें सर विल्यम हंटर यांनीं मूळ ग्रंथांत म्हटलें आहे.

ह्याप्रमाणें पुढील हकीकतींत लॉर्ड मेयो यांना त्यांच्या

मदतनिसांपेक्षां विशेष प्राधान्य दिलेलें आहे; इतकें प्राधान्य देणें त्यांना स्वतःला न्याय्य दिसलें नसतें. तथापि यांची काम करण्याची पद्धति अशी कांहीं होती कीं, तेणेंकरून इतर कित्येक व्हाइसरायांच्या कारकीर्दींत हा अन्याय जितका भासला असता, तितका यांच्या कारकीर्दींत भासला नाहीं. कोणत्याही विषयावर जितका कांहीं ऊहापोह होणें शक्य असेल, तितका सर्व ऐकून घेऊन नंतर अशा भिन्न भिन्न प्रकारच्या सल्लामसलतींच्या आधारें खुद्द स्वतःचाच एकादा मार्ग ठरविण्याचें त्यांच्या आंगीं कांहीं विलक्षण सामर्थ्य होतें. त्यांचे स्वतःचे विचार काय आहेत ते त्यांना प्रथम व्यक्त करण्यास लावून नंतर त्यांनीं आपल्या सल्लामसलतगारांचा अभिप्राय त्यांसंबंधानें घ्यावा; असा भलताच प्रयत्न कोणी करूं लागल्यास ते कधीं फसत नसत. कोणीही आपल्या मतांचें प्रतिपादन करूं लागला असतां त्या संबंधानें ते इतकी आस्था दाखवीत कीं, जणूं काय त्याची त्यांना स्वतःच्या अभिप्रायाप्रमाणेंच किंमत वाटत आहे असें त्या माणसाला भासावें. तथापि ते त्याला असेंही भासवीत कीं, आपली ही आस्था एकाद्या न्यायाधिशाप्रमाणें सत्य काय आहे तें काढण्यापुरती आहे; कोणताही पक्ष दुरभिमानानें स्वीकारण्यासाठीं नाहीं.

राज्यव्यवस्थेसंबंधीं उपाय सुचविण्याचें काम हिंदुस्तानांत स्थानिक सरकारें व खात्यांचे वरिष्ठ अधिकारी यांचें असतें; आणि त्या उपायांची युक्तायुक्तता ठरविण्याचें काम सेक्रेटरिएट (सरकारच्या सेक्रेटरींची

कचेरी ) यांतील कामगारांकडे असतें. कोणत्याही खात्याचा वरिष्ठ अधिकारी म्हटला ह्मणजे त्याला प्राय: आपल्या हुद्याच्या नात्यानें कांहींना कांहीं सूचना कराव्या लागतातच. आतां आपल्या खात्याच्या सुधारणेसाठीं त्यानें सुचविलेले हे उपाय प्रत्यक्ष कितीही प्रसंशनीय असले, व प्रथमदर्शनीं कितीही काटकसरीचे वाटण्यासारखे असले, तरी परिणामीं तेणेंकरून खर्च वाढावयाचाच, असा अर्थ समजावा. तेव्हां अशा प्रकारच्या ज्या ज्या सूचना येतील त्यांचें पृथक्करण करणें, त्यांतील दोषस्थलें व्यक्त करणें, व ज्या सूचनेच्या योगानें आज ना उद्यां पैसा खर्चावा लागणार तिला हरकती आणणें; हें सेक्रेटरिएटमधील कामगारांचें कर्तव्य होय. ह्याप्रमाणें ह्या दोन प्रकारच्या प्रेरणा सतत सुरू असतात; व व्हाइसराय हे चांगले खंबीर असले म्हणजे ह्या दोन पक्षांतील मध्यस्थाचें काम ते करितात.

व्हाइसराय यांच्या कर्तव्यामध्यें हें मध्यस्थीचें काम मोठें नाजुकपणाचें होय. तथापि हें बजावण्यास ज्या गुणांची आवश्यकता आहे, ते सुदैवेंकरून लॉर्ड मेयो यांच्या आंगीं एकवटलेले आढळल्यामुळें त्यांच्याशीं संबंध असलेल्या कामगारांना वारंवार मोठें आश्चर्य वाटे. कामगार मंडळीमध्यें विशेष उत्साहानें काम करणारे असत ते तर ह्यांना फार पूज्य मानीत; कारण त्यांच्या सूचनांकडे हे फार आस्थापूर्वक लक्ष देत. प्रत्येकाला खात्री असे कीं, आपलें म्हणणें ते योग्य रीतीनें ऐकून घेणार. तथापि आपल्या आंगच्या विनयशीलतेमुळें ते जी ही कळकळ

दाखवीत, तिचा कोणी भलताच असा अर्थ करीत कीं, आपल्या म्हणण्याला त्यांनीं सरकारी नात्यानें संमति दर्शविली. परंतु यांच्या कामकाजाच्या पद्धतीचा यत्किंचित् अनुभव आल्याबरोबर त्यांना आढळून येई कीं, आपला तो समज चुकीचा होय. कारण कोणतीही सूचना मूळारंभीं त्यांजपुढें येऊन तिचा अखेर निकाल लागे तोंपर्यंत दरम्यान त्या सूचनेसंबंधानें तपासणी होऊन व तिजवर टीका होऊन ती तावून सुलाखून निघत असे. सारांश, त्या सूचनेची खरोखर उपयुक्तता किती आहे, तें तंतोतंत ठरविण्याची ही एक रीति होय. तसेंच ह्या पुढें आलेल्या सूचनेच्या उपयुक्ततेसंबंधानें, त्यांना योग्य सल्लामसलत देण्याची जबाबदारी ज्यांवर आहे, अशा कामगारांची खात्री झाली असली; तरी त्यांच्या मनांत ह्या संबंधाचा विचार केव्हां केव्हां फिरून सुरू होत असे. आपल्या हाताखालच्या कामगारांकडून प्रत्येक प्रश्नाची पूर्णपणें चर्चा झाली पाहिजे असा त्यांचा आग्रह असे. ह्या कामीं अवश्य असल्यास प्रकरण कैक वेळां परत जाऊन यावें लागो; परंतु प्रत्येक वादग्रस्त मुद्द्याची पक्की शहानिशा झाली पाहिजे; आणि असें होईपर्यंत ते आपले स्वतःचे विचार कधींही प्रदर्शित करीत नसत. तसेंच कोणत्याही प्रकारचा नवीन पुरावा उपस्थित होऊन आपल्या विचारांत फरक पडण्याचा आतां अगदीं संभव उरला नाहीं, अशी खात्री होईपर्यंत कोणत्या तऱ्हेनें प्रकरणाचा निकाल लावावयाचा, हें ते ठरवीत नसत. त्यांचे मंत्री त्यांना परस्परविरुद्ध अशी सल्लामसलत देत. परंतु

सर्वांच्या अभिप्रायांतील सार तेवढें एकत्र करून घेण्याची हातोटी त्यांना साधलेली होती. ह्यामुळें ते अखेर जो निकाल देत तो आपल्या अति महत्त्वाच्या मुद्द्यांना अनुसरूनच आहे असें प्रत्येकजणास वाटे. तथापि त्याला असेंही वाटे कीं, तो निकाल त्यांनीं स्वतःचा म्हणून दिलेला आहे; व त्याला सोडून ते काडीमात्र जाणार नाहींत. दुसऱ्यांच्या सूचना व राज्यकारभारांतील सुधारणांसंबंधीं तजविजी यांचा मोकळ्या मनानें स्वीकार करणें; पुढें विचारपूर्वक बरेच दिवस त्यांजवर चर्चा करून त्यांची बारकाईनें तपासणी करणें; आणि अखेरीस जो कांहीं निर्णय ठरेल, त्याला अनुसरून दृढनिश्चयानें प्रत्यक्ष अम्मल करणें; ह्यांतच लॉर्ड मेयो यांना हिंदुस्तानच्या व्हाइसरायच्या कामीं यश आलें त्याची गुरुकिल्ली आहे.

ह्यांच्या कारकीर्दींत अमलांत आलेल्या उपायांत ह्यांची स्वतःची विलक्षण छाप दिसते. तथापि ह्यामुळें त्या उपायांसंबंधानें तितक्याच मानानें स्वतःवर विशेष जबाबदारी त्यांच्या मनाला वाटूं लागे. त्यांना आलेल्या अडचणींची व प्रसंगांची हकीकत लवकरच सांगण्यांत येईल. तशा स्थितींत तर ही जबाबदारी त्यांच्या मनाला इतकी खात असे कीं, त्यांची शरीरप्रकृति इतकी सुदृढ असतांही ती खचून जाई. यांच्या कारकीर्दीच्या प्रारंभींचे कित्येक महिने मोठ्या विवंचनेंत गेले. कारण जमाखर्चांत आलेली तूट भरून काढण्यासाठीं त्या मुदतींत ह्यांची एकच त्रेधा उडून गेलेली होती. त्या वेळीं त्यांनीं आपल्या एका मित्रास असें लिहिलें आहे:—

"हें काम मोठें अवघड आहे; व ज्यांच्याकडून आपणास अडथळा येण्याचा मला अगदीं कमी संभव वाटत होता, त्यांजकडून विलक्षण अडथळा येण्याची भीति मला आहे. तथापि हें शेवटास नेण्याचा माझा संकल्प ठरला आहे. मीं ह्या कामाला एकदां हात घातला आहे; व आतां मी माघार घेणार नाहीं; आणि हिंदुस्तानच्या राज्यकारभारांतील थोडी बहुत घाण मला मृत्यु येण्यापूर्वीं मी समूळ नाहींशी करीन."

# प्रकरण चौथें.

## मांडलिक राजांशीं लॉर्ड मेयो यांचें वर्तन.

[ बंडापूर्वींची व नंतरची स्थिति.–कंपनीच्या अमलांत संस्थानांसंबंधीं राजधोरण.–बंडानंतर त्यांत फेरफार.–नवीन फेरफारामुळें झालेला परिणाम.–रजपूत राजांच्या दरबारांत त्यांचें भाषण.–ह्या संबंधानें त्यांच्या एका सल्लागाराचें मत.–संस्थानांसंबंधानें त्यांचें एकंदरीनें मत.–त्यांचा संस्थानिकांशीं खाजगी संबंध.–त्यांच्या आचरणावरून संस्थानिकांस होणारा बोध.–संस्थानांशीं त्यांचा सरकारी संबंध कोणत्या प्रकारचा असे त्याविषयीं चार नियम.–काठेवाडांत सुधारणा करण्याचा प्रयत्न.–काठेवाडांतील अव्यवस्थेचें मूळ.–ह्यांच्या कारकीर्दींत अव्यवस्थित राज्यकारभार चालल्याचीं उदाहरणें.–अलवार.–तेथील राजाच्या खर्चाचा मासला.–ह्या एकंदर अव्यवस्थेचा परिणाम.–व्हाइसराय यांचा ती अव्यवस्था मोडण्यासाठीं प्रयत्न.–त्यांच्या व्यवस्थेमुळें घडलेला परिणाम.–राजेसाहेबांच्या वर्तनांत फरक न पडणें.–दुसऱ्या एका संस्थानिकाच्या वर्तनाचा उल्लेख.–उत्तम राज्यकारभार चालत असलेलें संस्थान:–भोपाळ.–त्याची पूर्वपीठिका.–तेथील बेगम साहेबांची हकीगत.–सरहद्दीवरील रानटी जातींसंबंधानें त्यांच्या मतें हिंदुस्तानसरकारचें कर्तव्य.–वायव्य सरहद्दीच्या संरक्षणार्थ त्यांचे विचार.–त्यांनीं पूर्वींच्या स्थितींत केलेला फेरफार.–त्यांच्या सूचनेवर आक्षेप.–सरहद्दीसंबंधीं दंग्याधोप्यांचा समावेश लष्करी कृत्यांत न करितां पोलिस खात्यांत करणें इष्ट आहे.–ईशान्य सरहद्दीवरील स्वारी.–ह्या स्वारीसंबंधानें त्यांचें मत.–अल्पवयी संस्थानिकांसंबंधानें ब्रिटिश सरकारचें कर्तव्य.–त्यांच्या शिक्षणार्थ त्यांनीं योजिलेले उपाय:–राजकुमार कॉलेज.–मेयो कॉलेज. ]

१८६९ सालीं हिंदुस्तानचा राज्यकारभार लॉर्ड मेयो यांनीं हातीं घेतला. तेव्हांची हिंदुस्तानची स्थिति व

अकरा वर्षांपूर्वीं हिंदुस्तानचें राज्य कंपनीकडून निघून प्रत्यक्ष राणी सरकाराकडे आलें तेव्हांची स्थिति, ह्यांत महदंतर होतें. हिंदुस्तानांत ब्रिटिश राजसत्तेचा पाया घालणारांचा असा दृढ ग्रह होता कीं, ह्या देशांतील एतद्देशीय संस्थानिकांच्या मनांत, आपलें स्वतःचें अस्तित्व कायम रहावें म्हणून, ब्रिटिश सत्तेसंबंधानें वैरभाव असणारच; मग ते तो प्रत्यक्ष व्यक्त करोत वा मनांत ठेवोत. तसेंच उत्तम प्रकारची राज्यपद्धति ठेविल्यानें, आणि लोकांचे धर्म, त्यांचे रितीरिवाज व त्यांचे हक्क, ह्यांसंबंधानें मोठ्या दक्षतेनें आदरबुद्धि दाखविल्यानें खुद्द ब्रिटिश सरकारच्या अमलांतील प्रजेचें मन आकर्षून घेतां येईल, असें ते मानीत. परंतु हिंदुस्तानांतील स्वतंत्र अथवा मांडलिक राजे ह्यांकडून ब्रिटिश सत्तेला सर्वकाळ धोकाच असला पाहिजे, असें त्यांचें मत होतें.

ह्या कारणास्तव ईस्ट इंडिया कंपनीच्या अति प्रसिद्ध कामगारांचें राजधोरण अशा प्रकारचें होतें कीं, एतद्देशीय संस्थानिकांशीं तह करून त्यांचें स्वातंत्र्य नष्ट करावयाचें. तसेंच प्रत्यक्ष अन्याय न होतां बारीकसारीक संस्थानें करितां येतील तेव्हां खालसा करून ब्रिटिश राज्यांत सामील करावयाचीं. १८४१ त हिंदुस्तान सरकारनें सर्वकाळ लागू पडण्याजोगें एक तत्त्व ठरविलें तें असें:—" न्यायानें व अब्रूस धक्का न पोहोंचतां मुलूख किंवा जमाबंदी वाढवितां येईल असा एकही प्रसंग वायां जाऊं द्यावयाचा नाहीं; व ह्या एकाच प्रकारच्या उघड उघड धोरणानें सतत चालावयाचें; तथापि अशा प्रसंगीं चालू

असलेल्या रास्त रीतीच्या हक्कांचें संगोपन मात्र फार दक्षतेनें करावयाचें. ”

संस्थानें खालसा करण्याचें हें राजधोरण बंडानंतर जाणूनबुजून कसें रद्द करण्यांत आलें, हें सर्वांस माहीतच आहे. इंग्लंडच्या राणीसाहेबांकडे हिंदुस्तानची ही राजसत्ता गेली, तेव्हां, हिंदुस्तानांतील सर्व दर्ज्यांच्या लोकांचें संरक्षण करणें, हें त्यांचें कर्तव्य झालें. त्या प्रसंगीं त्यांनीं अत्यंत आस्थापूर्वक आपली इच्छा प्रदर्शित केली ती अशीः—“ निरनिराळे राजे व संस्थानिक जे आपापल्या मुलखांचें हल्लीं राज्य करीत आहेत, त्यांचा राज्याधिकार सर्वकाळ कायम राखावा, व त्यांचीं घराणीं व त्यांचा दर्जा चालू असावा. ” लॉर्ड क्यानिंग यांनीं १८६२ त पहिले व्हाइसराय ह्या नात्यानें ह्या नवीन स्थित्यंतराचें दिग्दर्शन पुढें लिहिल्याप्रमाणें केलें आहेः—

“ आमच्या स्वतःच्या सोईसाठीं दिल्ली येथील राजघराण्याकडून दिवाणगिरीचा अधिकार मिळवून बरेच दिवस आम्ही स्वस्थ राहिलों. त्या घराण्यांतील अखेरीस अवशिष्ट राहिलेल्या पुरुषांचाही आतां मागमूस राहिला नाहीं. मराठे सरदारांतील प्रमुख सत्ताधीश जे पेशवे, त्यांच्या गादीला हक्क सांगणाऱ्याचा पत्ता नाहीं. ह्यास्तव सर्व हिंदुस्तानभर इंग्लंडच्या राजसत्तेला कांहींएक अपवाद राहिला नसून ती सार्वभौम सत्ता झाली आहे; आणि येथील मांडलिक राजांशीं अशा तऱ्हेचा तिचा प्रत्यक्ष संबंध हा प्रथमच घडत आहे. इंग्लंडच्या राजाकडेच हिंदुस्तानची सार्वभौम सत्ता प्रथमतः गेली, हें म्हणणें

यथार्थ आहे; कारण अशी सार्वभौम सत्ता आजपर्यंत हिंदुस्तानांत कधीं नव्हती. तसेंच ही सत्ता संस्थानिकां-नाही भासूं लागली आहे; इतकेंच नाहीं, तर ते मोठ्या उत्सुकतेनें ती मान्यही करीत आहेत."

ह्याप्रमाणें राज्यें खालसा करण्याच्या पद्धतींत फरक झाल्यामुळें मांडलिक राजांच्या ताब्यांतील मुलूख हा कांहीं परकीय मुलूख इतःपर राहिला नाहीं; ह्यामुळें तो खालसा करितां येईनासा झाला. अशा मुलखाचें क्षेत्र-फळ सहा लक्ष चौरस मैल असून लोकसंख्या जवळ जवळ पांच कोटि आहे. एवढा हा मुलूख इतःपर संपूर्ण ब्रिटिश साम्राज्याचा एक अवयव झाला; व ह्यांतील लो-कांच्या कल्याणाची जबाबदारी ऐहिकदृष्ट्या राणीसरका-रांवर पडली. संस्थानांवर प्रत्यक्ष राज्य करणारांवर जी जबाबदारी असावयाची ती कांहीं राणी सरकारांवर न-व्हती खरी. तथापि त्या संस्थानिकांवरील ह्या सार्व-भौमिनी असल्यामुळें तशा दृष्टीनें त्यांजवर जबाबदारी होती. ह्या नवीन राज्यपद्धतीअन्वयें एतद्देशीय संस्थानें एका साम्राज्याखालीं आणण्याचें मोठें जोखीम लॉर्ड क्या-निंग व लॉर्ड लॉरेन्स यांजवर पडलें. तथापि ह्या उभ-यतांच्याही एकंदर कारकीर्दींत लोकांना बंडाचें विस्मरण झालेलें नसल्यामुळें हिंदुस्तानांत एक प्रकारची उद्विग्नता होती. लॉर्ड मेयो हे आले तेव्हां त्यांचा हिंदुस्तानाशीं कांहींच संबंध नव्हता; व त्या भयंकर धामधुमींत ज्यांनीं ज्यांनीं कामगिरी बजाविली होती, त्यांच्या त्यांच्या अंतःकर-णांवर बंडांतील कृत्यांचा जसा पक्का ठसा उमटलेला होता,

तसा ह्यांच्यावर उमटलेला नव्हता. सारांश, बंडवाल्यांस जिंकून मुलूख परत घेण्याचें काम ह्यांच्या पूर्वींच्या अधिकाऱ्यांनीं करून टाकिलें होतें; लोकांचीं मनें आकर्षून घेण्याचें काम त्यांना आतां करावयाचें होतें.

रजपूत राजांच्या दरबारांत लॉर्ड मेयो यांनीं पुढें लिहिल्याप्रमाणें त्यांना उघड रीतीनें कळविलें आहे:—"पुरातन काळापासून चालत आलेल्या आपल्या हक्कांचा तुम्हांस पूर्ण उपभोग घेतां यावा, व कायदेशीर चालीरितींना अनुसरून वागतां यावें; अशी राणी सरकारची इच्छा आहे. तसेंच तुम्हीं व तुमच्या वाडवडिलांनीं ह्या देशांत कित्येक शतकें जें वैभव भोगिलें व जी सत्ता चालविली, ती कायम राखण्यासाठीं तुम्हांस साहाय्य द्यावें, अशीही त्यांची इच्छा आहे. ही गोष्ट राणी सरकारचा प्रतिनिधि ह्या नात्यानें तुम्हांस जाहीर करावी, म्हणून मी येथें आलों आहें; आणि आजपर्यंतही अनेक वेळां तें तुम्हांस कळविण्यांत आलेलें आहे.

"तथापि ह्या आमच्या दृढनिश्चयाप्रमाणें तुम्हांस पूर्णपणें चालतां यावें, म्हणून तुम्हीं आम्हांस मनःपूर्वक व खऱ्या कळकळीनें मदत दिली पाहिजे. तुमच्या हक्कांचें व अधिकारांचें संगोपन करण्यास आम्ही तयार आहों; त्या अर्थीं तुमच्या ताब्यांतील लोकांच्या हक्कांचें संगोपन करून त्यांच्या अधिकाराला मान देण्यास तुम्हींही तत्पर असलें पाहिजे. तुमची सत्ता तुमच्या संस्थानांवर चालावी म्हणून आम्हीं तुम्हांला मदत देतों. ह्याचा मोबदला आम्ही असें इच्छितों कीं, तुमचा राज्यकारभार चांगल्या प्रका-

रचा असावा. एकंदर राजपुतान्यांत सर्वत्र न्याय व बंदोबस्त असावा; हरएक मनुष्याची मालमत्ता सुरक्षित रहावी; प्रवाशाला सुरक्षितपणें प्रवास करितां यावा; शेतकऱ्याला स्वकष्टार्जित उत्पन्नाचा व व्यापाऱ्याला आपल्या नफ्याचा उपभोग घेतां यावा; तुम्ही सडका बांधाव्या, व ज्यांच्या योगानें तुमच्या प्रजेची स्थिति सुधारून तुमच्या संस्थानांची जमाबंदी वाढेल अशीं पाटबंधाऱ्यांचीं कामें तुम्हीं हातीं घ्यावीं; आणि शिक्षणाला उत्तेजन देऊन आजारी माणसांच्या औषधपाण्याची तजवीज करावी; असें म्हणण्याचा आम्हांस हक्क पोहोंचतो.

" ह्या सर्व गोष्टी केवळ तुमच्याच हितार्थ करण्यास आम्ही सांगतों; ह्यांत अन्य हेतु नाहीं, अशी तुमची खात्री असूं द्या. तुम्हीं दुर्बळ असावें, अशी आमची इच्छा असती तर आम्हीं तुम्हांला उपदेश केला असता कीं, तुम्ही निकृष्टावस्थेंतच असा; अज्ञानांत असा; व तुमच्या संस्थानांतून बेबंदशाई चालू द्या. परंतु तुमच्यांत जोम रहावा अशी आमची इच्छा असल्यामुळें तुम्ही संपत्तिमान् असावें, सुशिक्षित असावें आणि तुमच्या संस्थानांतून उत्तम प्रकारचा बंदोबस्त असावा, अशी आमची इच्छा आहे; व ह्यामुळेंच वरील उपदेश आहे. अशा प्रकारचा उद्देश सिद्धीस जावा म्हणूनच राणी सरकारचे कामगार हिंदुस्तानांत राज्यकारभार चालवितात; आणि प्रजेच्या कल्याणार्थ राज्यकारभार चालविणाऱ्या कामगारांना जगन्नियंत्याचें पाठबळ नेहमीं असावयाचेंच.

" मला या देशांत कांहीं वर्षेंच रहावयाचें आहे.

माझ्या हाताखालीं असलेले हुशार व आस्थापूर्वक कामें करणारे अधिकारीही थोड्याच काळानें इंग्लंडास आपल्या घरीं जातील. तथापि आम्ही ज्या सत्तेच्या वतीनें येथें कारभार पाहात आहों, ती सत्ता कैक वर्षें टिकणारी आहे. आपल्या राणी सरकारच्या गादीशीं ह्या मोठ्या राष्ट्राचा संबंध प्रतिघटकेस अधिकाधिक निकट होत आहे. आगबोटींच्या व आगगाड्यांच्या साधनांमुळें जणूं काय प्रतिवर्षीं इंग्लंड हें हिंदुस्तानाला आलिंगन देण्यासाठीं नजीक येत चाललें आहे. तथापि हिंदुस्तानाला आलिंगन देण्याच्या कामीं लोखंडी बिड्यांचा उपयोग करण्याचा इंग्लंडचा प्रयत्न नाहीं; तर प्रेमाच्या व शांततेच्या सोनेरी पाशांचा उपयोग करण्याचा प्रयत्न आहे.

" संस्थानिक व राजेलोकहो, योग्य मार्गानें आपापली प्रगति होऊं द्या. तसेंच तुमच्या कल्याणाची आस्था बाळगणाऱ्या ह्या सत्तेचा उपयोग आपल्या मुलांनातवांच्या व आपल्या पुढील पिढ्यांतील प्रजेच्या संरक्षणाच्या कामीं करून द्या. "

ह्यांच्या मृत्यूनंतर ह्यांच्या एका मंत्र्यानें असें म्हटलें आहे:—" लॉर्ड मेयो हे मोकळ्या मनाचे, सभ्य व सुशिक्षित गृहस्थ असून वरील भाषणांतील प्रत्येक ओळीवरून त्यांची प्रत्यक्ष साक्ष पटते. तथापि, त्या भाषणावरून असेंही दिसून येतें कीं, राणी सरकारचे ते मोठे खंबीर व नांवाजण्यासारखे प्रतिनिधि असून ह्या हिंदुस्तानचा राज्यकारभार स्वतः हाकणारे होते, दुसऱ्याच्या ओंजळीनें पाणी पिणारे नव्हते, ह्याविषयीं वाद नाहीं.

इंग्लिश व्हाइसराय कसे असावे, ह्याचें ते एक प्रत्यक्ष उदाहरण आहेत; असें त्यांशीं गांठ पडणाऱ्या प्रत्येक एतद्देशीय राजाला वाटत असे. त्या सर्वांना स्वभावतःच वाटे कीं, लॉर्ड मेयो हे आपणांस सांगतील त्या प्रत्येक गोष्टीवर पूर्णपणें भरंवसा ठेवण्यास हरकत नाहीं. तसेंच यांच्या संबंधानें ह्या राजे लोकांच्या मनांत अशी संमानबुद्धि होती असें म्हणणें विशेष वाजवी होईल. तसेंच ही पूज्यबुद्धि विशेष दृढतर असे; कारण ते आपणांवर प्रमुख आहेत असें त्या राजांना वाटे खरें; परंतु त्यांना असेंही वाटे कीं ते आपले स्नेहीही आहेत."

एतद्देशीय संस्थानें कायम राखण्याच्या पद्धतीपासून नफेतोटे कोणकोणते आहेत, तें लॉर्ड मेयो यांच्या लक्षांत येऊन चुकलें होतें. ह्या संस्थानांतून अव्यवस्थित राज्यकारभार चाललेला पाहून त्यांच्या मनाला वारंवार फार वाईट वाटे. तथापि त्यांच्या राज्यकारभारांत हात घालावयाचा नाहीं, असें तत्त्व इंग्रज सरकारनें ठरविलें असल्यामुळें ह्या बाबतींत सुधारणा करण्यास ते असमर्थ होते. त्यांना आढळून आलें कीं, तेव्हांच्या पद्धतीप्रमाणें संस्थानिकांच्या कारभारांत क्षुल्लक बाबतींत हात घालितां येत होता; परंतु जिच्या योगानें संस्थानचें खरें हित होईल अशा प्रकारची ढवळाढवळ करण्यास तिच्या योगानें वारंवार प्रत्यवाय येत असे. सारांश, खिळ्याएवढ्या चुकीसाठीं त्यांच्या कारभारांत हात घालितां येई; परंतु हत्तीएवढ्या चुकीकडे मुकाट्यानें कानाडोळा करावा लागे. यास्तव जिच्या योगानें हिंदुस्तानांतील संस्थानि-

कांचें सांप्रतचें स्वातंत्र्य तर कायम राहील; परंतु त्यांना त्या स्वातंत्र्याचा दुरुपयोग मात्र करितां येणार नाहीं, इतका दाब सार्वभौम सरकारला ठेवितां येईल; अशा प्रकारची कांहीं योजना ठरवितां येण्यासारखी आहे किंवा नाहीं, इकडे त्यांचें मन वेघलें.

संस्थानिकांशीं खाजगी व सामाजिक संबंध ते अशा प्रकारें ठेवीत कीं, व्हाइसराय यांचा स्नेह संपादण्याचा मार्ग एकच आहे, अशी त्यांची खात्री व्हावी. तो मार्ग एवढाच कीं, ज्यांनीं त्यांनीं आपापल्या मुलखांचा राज्यकारभार चांगल्या रीतीनें चालविणें. गव्हर्नर जनरल यांनीं प्रत्येक संस्थानिकाचा मानमरातब सरकारदरबारीं कसकसा ठेवावा, हें ठरविण्याचें काम हिंदुस्तान सरकारच्या परदेशसंबंधी खात्याकडे असतें; आणि ह्या खात्यानें ठरविलेले नियम लॉर्ड मेयो हे अक्षरशः पाळीत. तथापि अशा प्रकारच्या सरकारी मानमरातबाशिवाय गव्हर्नर जनरल यांशीं दळणवळण ठेवण्याचा व त्यांच्या मनांत आपल्याविषयीं प्रेमभाव उत्पन्न करण्याचा एक अंतस्थ मार्ग आहे; आणि कोणत्याही लायक संस्थानिकाला मात्र हा मार्ग खुला आहे, इतरांस नाहीं; असा सर्व संस्थानिकांचा समज त्यांनीं करून दिला. संस्थानांचा विस्तार म्हणा, त्यांना राजकीयदृष्ट्या असलेलें कमजास्त स्वातंत्र्य म्हणा, अथवा इंग्रज सरकारच्या किल्ल्यांवरून त्यांच्या सन्मानार्थ झडणाऱ्या ज्या तोफांसंबंधानें ते इतके डोळ्यांत तेल घालून असतात त्या तोफांच्या संख्या म्हणा; ह्यांच्या अनुरोधानें आपला खाजगी स्नेहसंबंध कदापि जडत नाहीं, असें त्यांनीं

संस्थानिकांच्या ध्यानीं आणून दिलें. सरकारी समारंभांतून ह्या गोष्टींच्या अनुरोधानें त्यांचें वर्तन असे; परंतु यांचा खाजगी स्नेहसंबंध जडणें तो संस्थानिकाचा स्वतःचा स्वभाव व त्याचें खाजगी वर्तन, हीं योग्य असतील तरच जडावयाचा.

आपल्या आचारविचारांवरून त्यांनीं हरएक संस्थानिकाच्या निदर्शनास पुढील गोष्ट आणून दिली:—"माझ्या दरबारीं प्रतिष्ठा मिळावी अशी तुमची इच्छा असल्यास आपल्या संस्थानचा राज्यकारभार उत्तम प्रकारें चालवा. आपल्या ताब्यांतील प्रजेला न्यायानें व सदय अंतःकरणानें वागवा. आमच्या भेटीस याल तेव्हां भाराभर नजराणा आणिला आहे किंवा नाहीं, असा प्रश्न आम्ही करणार नाहीं; तर तुमच्या कारभारांत कांहीं अनागोंदीचा प्रकार नाहींना असा प्रश्न करूं. तुम्हीं कितीही नजराणा आणिला तरी तेणेंकरून ब्रिटिश सरकारची मर्जी प्रसन्न व्हावयाची नाहीं; तुम्ही जो थाटमाट दाखवाल त्यावरून तुमचें वैभव आमच्या दृष्टीनें वाढणार नाहीं; कितीही थुंकी झेलिल्यानें किंवा हाजी हाजी केल्यानें माझा स्नेह संपादन व्हावयाचा नाहीं. तुम्ही आह्मांला नजराणा द्याल त्याच्या भपक्यावरून किंवा तुमच्या बरोबरच्या लवाजम्यावरून तुमची योग्यता आम्ही ठरवीत नाहीं; तर आपापल्या संस्थानांत असतां आपल्या प्रजेशीं तुम्ही कोणत्या प्रकारें वागतां त्यावरून ठरवितों. आम्हा स्वतःला तुमच्यापाशीं कांहीं एक मागावयाचें नाहीं. परंतु तुमच्याच प्रजेसाठीं चांगल्या प्रका-

रचा राज्यकारभार तुम्हीं चालवावा, असें आमचें आग्रह-पूर्वक मागणें आहे; आणि तुमची योग्यता ठरविण्याच्या कामीं केवळ तुमच्या राज्यकारभाराचीच कसोटी आम्ही लावणार. तसेंच एकादा अति मोठा राजा आपल्या प्रजेवर अन्यायानें राज्य चालवीत असून एकादा अति लहान संस्थानिक आपल्या संस्थानाचा कारभार न्यायानें चालवीत असला तर, खाजगी रीतीनें स्नेहसंबंध ठेवून खाजगी आदरातिथ्य ठेवण्याच्या बाबतींत त्या राजापेक्षां त्या संस्थानिकालाच आम्ही पसंत ठरवूं. ”

ज्या ठरावीक तत्त्वांना अनुसरून त्यांचा एतद्देशीय संस्थानिकांशीं खाजगी संबंध असे, तीं तत्त्वें संस्थानिकांच्या लवकरच लक्षांत आलीं. तसेंच त्यांच्या मृत्यूनंतर ह्या संस्थानिकांमध्यें दुःखाचा विलक्षण कहर उसळला; त्यावरून लॉर्ड मेयो यांच्या अशा प्रकारच्या वर्तनाची किंमत जाणण्याचें सामर्थ्य एतद्देशीय संस्थानिकांच्या आंगीं आहे किंवा नाहीं, हेंही सिद्ध झालें. संस्थानिकांशीं त्यांचा सरकारी संबंध कोणत्या प्रकारचा असे, त्याविषयीं चार तत्त्वें त्यांच्या हातच्या अनेक पत्रांतून व सरकारी महत्त्वाच्या लेखांतून विशेष रीतीनें व्यक्त होतात. तथापि तीं एकाद्या पत्रांत सरकारी रीतीनें त्यांनीं कधीं एका ठिकाणीं दाखल करून ठेविलेलीं नाहींत. तीं तत्त्वें अशीं:—

१ लें.——राज्यें खालसा न करणें व एकाद्या संस्थानिकानें राज्यकारभार कितीही अव्यवस्थित रीतीनें

चालविला तरी तें निमित्त साधून आपल्या सत्तेचा विस्तार न करण्याविषयीं दृढनिश्चय ठेवणें.

२ रें—तथापि एतद्देशीय संस्थानांतून विलक्षण अंदाधुंदी सुरू झाल्यास, आपण सार्वभौम असल्यामुळें आपणावर जबाबदारी आहे, असा विचार ब्रिटिश सरकारानें सर्वकाळ बाळगणें; आणि अव्यवस्थित राज्यकारभार बंद होण्यास हात घालणें जरूर पडेल तेव्हां हात घालण्याविषयीं पक्का निश्चय करणें. असा हात घालणें म्हणजे तें संस्थान खालसा करणें नव्हे; तर त्या संस्थानिकाला गादीवरून काढणें व इंग्रज कामगारांमार्फत किंवा एतद्देशीय कामगारमंडळामार्फत कायदेशीर वारसदारांच्या कल्याणार्थ संस्थानचा कारभार चालविणें.

३ रें.—जे संस्थानिक चांगल्या प्रकारें राज्यकारभार चालवितील त्यांच्या कारभारांत ढवळाढवळ न करणें, व त्यांजवर अगदींच कमी दाब राहील, अशी पद्धति स्वीकारणें. ब्रिटिश सरकाराकडून आपणांस प्रत्यक्ष किती स्वातंत्र्य असावें ह्याचें प्रमाण आपणा स्वतःवरच अवलंबून आहे; आणि आपण आपल्या प्रजेवर राज्यकारभार जितक्या उत्कृष्ट प्रमाणानें चालवूं त्याच्या अनुरोधानेंच हें स्वातंत्र्य आपणांस जास्त मिळावयाचें आहे; अशी हिंदुस्तानांतील मांडलिक राजांची समजूत पाडण्याविषयीं प्रयत्न करणें.

४ थें.—सर्वांत विशेष महत्त्वाची गोष्ट ही कीं, अल्प-

वर्गी संस्थानिकांना, आपली प्रजा व आपलें सार्वभौम सरकार या उभयतांच्या संबंधानेंही आपणांवर कसकशी जबाबदारी आहे, ह्याचें उदात्त शिक्षण ब्रिटिश कामगारांच्या देखरेखी-खालीं देणें. वास्तविक पाहिलें असतां त्यांच्या एकंदर राजधोरणाचा हा एक अवश्य भागच होता.

हीं तत्त्वें लॉर्ड मेयो यांनीं कशा रीतीनें अमलांत आ-णिलीं तें अति संक्षिप्त रीतीनें पुढें दर्शविण्याचा प्रयत्न केला आहे.

प्रथमतः असें एक संस्थान घेऊं कीं, जेथील राज्य-कारभारांत सुधारणा होणें लॉर्ड मेयो यांस अवश्य दि-सलें, तथापि ज्यांत प्रत्यक्ष हात घालण्याचें त्यांनीं टाळिलें. काठेवाड म्हणून मोठा प्रांत असून त्यांत बारीकसारीक १८७ संस्थानें आहेत. ह्या प्रांतांतील अव्यवस्थित राज्य-कारभारांत लॉर्ड मेयो यांना सुधारणा कर्तव्य असून ही अव्यवस्था गेल्या पांच शतकांपूर्वींपासून चालत आलेली होती. त्या प्रांतांत जमिनीच्या मालकीसंबंधानें लोक अनेक प्रकारचे एकमेकांविरुद्ध हक्क सांगत असून अनेक प्राचीन जमाती तेथें आहेत; व प्रत्येक जमातीला लुटालूट चालविण्याचा हक्क प्राप्त झालेला आहे; असें त्यांना आढळून आलें. "माजी राजघराण्यांतील मंडळी" म्हणजे ज्यांची राजसत्ता बलात्कारानें नष्ट झालेली आहे अशा प्राचीन घराण्यांचे पुढारी, अथवा ज्यांना आपल्या वांट्यास आलेल्या इस्टेटीच्या लहानशा भागावर निर्वाह चाल-

वितां येणें अशक्य, असे संस्थानिकांच्या धाकट्या भावांचे वंशज; " लुटारू जाती " व " भयंकर मंडळ्या " ज्यांचा उदरनिर्वाहाचा वंशपरंपरागत मार्ग ह्मटला ह्मणजे लुटालुटीचा; " मूळच्या जाती " ज्या एकामागून एक उसळलेल्या स्वाऱ्यांच्या लाटांमुळें डोंगरांतून दडपल्या गेल्या आहेत; अशा ह्या झोटिंग बादशाहीच्या सर्व बीजांमुळें काठेवाडांतील लोकांमध्यें अद्यापि बंडाळ्या उत्पन्न होत होत्या. पुरातन काळापासून पूज्य मानिलेल्या कित्येक चालीरीतीही अद्यापि प्रचलित होत्या. " बाहिरवाटीया " ह्मणून जो एक प्रकारचा हक्क फिर्यादींना असे, तो त्यांनीं अद्यापि कायम राखिला होता. ह्याचा शब्दशः अर्थ आपल्या शेजाऱ्यांविरुद्ध "बाहेर जाणें" असा आहे. आपल्या स्थावर मिळकतीसाठीं केलेल्या फिर्यादींचा अशा पद्धतीनें निकाल लावून घ्यावयाचा; ह्मणजे, शेतकऱ्यांना आपापल्या खेड्यांपाड्यांतून निघून जाण्यास लावावयाचें; आणि फिर्यादीनें आपल्या भाऊबंदांसह एकाद्या सुरक्षित ठिकाणीं जाऊन तेथून आपल्या लुटालुटीचें काम खुशाल निर्धास्त चालवावयाचें.

कोणकोणत्या अनिष्ट गोष्टींमुळें काठेवाड प्रांताची खराबी होत आहे, हें लॉर्ड मेयो यांच्या सूक्ष्म रीतीनें ध्यानांत आलें. परंतु ह्या प्रांतांतील ह्या तुटक तुटक १८७ लहानसान संस्थानांतून एका सद्व्यासरशीं सुधारणा करण्याचा प्रयत्न करणें व्यर्थ, असेंही त्यांच्या स्पष्टपणें लक्ष्यांत आलें. म्हणून एकंदर काठेवाडासाठीं सुधारणेचा उपाय त्यांनीं मोठ्या धिमेपणानें सुरू

केला. मात्र त्यांतील एका मुख्य संस्थानामध्यें त्यांनीं विशेष हात घातला; अशासाठीं कीं, त्या संस्थानाचें उदाहरण इतरांना डोळ्यापुढें ठेवितां यावें. काठेवाडांतील पहिल्या प्रतीच्या संस्थानांतील अति संपत्तिमान् व महत्त्वाच्या संस्थानांपैकीं एका संस्थानच्या गादीवर एका अल्पवयी मुलाची स्थापना झाली. तेव्हां त्या संस्थानचा राज्यकारभार एकाद्या ब्रिटिश कामगाराकडे न सोंपवितां, एक अनुभविक एतद्देशीय गृहस्थ व मुंबई इलाख्यांतील सनदी कामगारांपैकीं एक निवडक कामगार, ह्या उभयतांच्या अनुमतानें तो राज्यकारभार चालावा, असें त्यांनीं ठरविलें. ह्या कामीं त्यांना फार चांगलें यश आलें. एकाद्या एकट्या इंग्रज कामगारानें ज्या सुधारणा सुरू केल्या असतां त्याला लोकांकडून हरकत आल्याशिवाय राहिली नसती, व एतद्देशीय राजांकडून ज्या कधींही सुरूच झाल्या नसत्या, अशा सुधारणा ह्या वरील योजनेमुळें सुरळीत रीतीनें व एक दिलानें अमलांत आल्या. सारांश, संस्थानाची भरभराट कशी करावी व तेथील राज्यकारभार बाण्यानें कसा चालवावा, ह्याचा तें संस्थान एक नमुनाच बनलें; व ह्या कामीं सार्वभौम सरकारला अगदीं अवश्य तेवढाच हात घालावा लागला.

तथापि लॉर्ड मेयो यांच्या व्हाइसरायच्या कारकीर्दींत कित्येक संस्थानांतून अव्यवस्थित राज्यकारभार चालल्याचीं उदाहरणें घडून आलीं. हा अव्यवस्थितपणा उघड उघड, स्पष्टपणें ध्यानांत येणारा व नाहींसा करण्यास कठीण असा होता. वस्तुतः अशीं उदाहरणें हर-

एक गव्हर्नर जनरलच्या कारकीर्दींत घडतातच. अशा प्रसंगीं संस्थानांच्या राज्यकारभारांत हात घालण्यास ते मागें पुढें पहात नसत; व अशा रीतीनें हात घालीत कीं, सार्वभौम सरकारचें अशा प्रसंगीं त्यांच्या मतें कर्तव्य काय, ह्या संबंधानें कांहीं एक शंका राहात नसे. संस्थानांवर इंग्रज सरकारची देखरेख ठेवावयाची ती उत्कृष्ट रीतीनें राहील, ह्यासंबंधीं हरएक प्रकारची शक्य तेवढी तजवीज होईपर्यंत संस्थानिकांसंबंधानें तक्रार करण्यास आपणास जागा नाहीं, असें त्यांचें मत होतें. कैक दिवस चालत आलेला अंदाधुंदीचा कारभार संस्थानिक एकदम सोडून न देतां हळू हळू सोडणार, व तें साहजिक आहे; असें त्यांच्या ध्यानीं आलें. संस्थानें खालसा करण्याचा यत्किंचित् दोषही त्यांनीं आपल्या माथीं घेतला नाहीं. तथापि हरएक संस्थानिकाचा त्यांनीं पक्का ग्रह करून दिला कीं, आपण दुराग्रहानें आपल्या प्रजेवर अव्यवस्थितपणानें राज्यकारभार चालवूं, तर आपल्या हातून राजसत्ता गेल्याशिवाय राहणार नाहीं.

अलवार संस्थान हें वर दर्शविल्याप्रकारचें उदाहरण होय. हें संस्थान एका दैवशाळी रजपूत योद्धयानें अठराव्या शतकाच्या उत्तरार्धांत स्थापिलें. ह्याचें क्षेत्रफळ ३००० चौरस मैल असून लोकसंख्या ७॥ लक्ष होती; व संस्थानचें सैन्य सुमारें ७००० होतें. एथील तरुण राजा १८६३ त कायद्यानें सज्ञान झाला. तेव्हां अज्ञानावस्थेंत संस्थानचा राज्यकारभार पाहण्यासाठीं नेमिलेल्या मंत्रिमंडळाच्या अध्यक्षाचा सूड उगविण्याचें कृत्य

प्रथमतः त्यानें हातीं घेतलें. महाराज अज्ञानावस्थेंत असतां १७२, २८७ पौंड रोख शिलक पडली होती; शिवाय दरसाल २००,००० पौंड संस्थानचा वसूल येत असे; परंतु हा सर्व पैसा त्यानें सात वर्षांत उधळून टाकिला. इतकेंच नाहीं, तर संस्थानावर १६०,००० पौंडांचा कर्जाचा बोजा त्यानें लादिला. वर्षांत जी वसूलबाकी व्हावयाची तिची हे महाराज आधींच अशी कांहीं विल्हेवाट लावून टाकीत कीं, तेणेंकरून फक्त दोन महिन्यांचाच खर्च भागे; कारण वसुलासंबंधानें नवीनच मजेदार शक्कल त्यांनीं लढविली; ती कोणती म्हणाल तर शेतांत उभ्या असलेल्या पिकावरच हुकूम सोडून आपल्या बगलबच्च्यांची भर करावयाची.

महाराजांच्या खर्चाच्या कांहीं बाबी सांगितल्या असतां वावगें होणार नाहीं. ह्यांना केवळ सलाम करण्यासाठीं कित्येक माणसें असून त्यांजकडे दरसाल ६० हजार रुपयांवर नेमणूक असे; गवई व कलावंतिणी ह्यांजकडे ७५ हजारांवर व पहिल्वानांना २७॥ हजारांची नेमणूक असे. “ शिष्टाचारांसंबंधानें तर महाराज विलक्षण तिटकारा दाखवितात. हलकट मुसलमानांबरोबर प्रसिद्धपणें मद्यपान करितात, व बहुधा दररोज धुंद होऊन पडतात. ” “ न्याय खात्याकडे व पोलिसखात्याकडे पूर्वीं जो वसुलाचा भाग खर्च होत असे, तो हल्लीं महाराजांच्या खाजगत चैनबाजीकडे खर्च होत आहे. फार काय, दरोडखोरांच्या टोळ्यांच्या दोन पुढाऱ्यांबरोबर खुद्द महाराजांचा फार सलोखा आहे. ” संस्थानच्या

फौजेच्या खर्चाकरितां व धर्मसंबंधीं कृत्यें चालू राहण्याकरितां अथवा अनाथ लोकांच्या मदतीकरितां सरकारी जमिनी तोडून दिलेल्या होत्या, त्या ह्यांनीं जप्त केल्या; अनाथ लोकांच्या मदतीसाठीं अशा प्रकारची एक नेमणूक तर आज *२७० वर्षें सुरू होती.

ह्याचा परिणाम असा झाला कीं, अलवारचे हे महाराज त्यांच्या रजपूत सरदारांच्या व प्रजेच्या मनांतून अजीं उतरले. हे सरदार म्हणजे हिंदु लोकांतील ठाकूर अथवा बडे लोक असून मोठे प्रबळ होते. आपल्या बेबंद वर्तनाला थोडाबहुत तरी आळा घालण्याविषयीं ह्या सरदारांनीं महाराजांना विलक्षण विनवणी केली; परंतु तें व्यर्थ झालें. उलट ह्या विनवणीचा प्रत्यक्ष परिणाम असा झाला कीं, सुमारें ६०।६० घोडेस्वारांची एक, अशा रजपूत स्वारांच्या १८ पैकीं १५ टोळ्यांना महाराजांनीं फाटा दिला; व त्यांच्या ऐवजीं द्रव्यलोभी मुसलमानांची त्यांनीं भरती केली. वस्तुतः ह्या कमी केलेल्या रजपुतांच्या वाडवडिलांनींच महाराजांच्या पूर्वजांसाठीं हें संस्थान जिंकिलेलें होतें. अखेरीस १८७० च्या मार्च महिन्यांत हिंदुस्तान सरकारला खबर लागली कीं, अलवार संस्थानांतील लोकांनीं बंड केलें असून ह्या महाराजांविरुद्ध २००० माणसें लढाईस तयार झालीं आहेत.

---

* अलवार संस्थान आठराव्या शतकाच्या उत्तरार्धांत स्थापन झाल्याचा उल्लेख वर आला आहे. त्याप्रमाणें पाहतां ही नेमणूक त्या संस्थानाकडून २७० वर्षें सुरू असणें अशक्यच आहे. ह्यावरून असें अनुमान होतें कीं, हें संस्थान स्थापन होण्यापूर्वींपासूनच ही नेमणूक चालत आलेली असावी.

हे अप्रयोजक महाराज व त्यांजवर उठलेली त्यांची प्रजा, ह्या उभयतांत मध्यस्थीनें करितां येण्यासारखें असेल तेवढें करून पाहण्याचा प्रथम लॉर्ड मेयो यांनीं प्रयत्न केला. तथापि महाराजांना प्रत्यक्ष गादीवरून काढून टाकिल्याखेरीज त्यांच्या सरदारांची समजूत पडण्याजोगी नव्हती. परंतु हा निदानींचा उपाय टाळण्यासाठीं लॉर्ड मेयो यांनीं ह्या प्रकरणांत हात घातला. संस्थानचा कारभार पाहण्यासाठीं संस्थानच्या प्रजेस पसंत पडेल अशी एक व्यवस्थापक मंडळी नेमण्याविषयीं त्यांनीं महाराजांना सुचविलें; व अशा रीतीनें त्यांना एक शेवटची संधि देऊन पाहिली. परंतु महाराजांनीं ह्याप्रमाणें करण्याची हयगय केल्यामुळें लॉर्ड मेयो यांनीं हुकूम फर्मावून अलवार संस्थानासाठीं नेटिव्ह लोकांची एक मंत्रिसभा बनविली. ह्या मंत्रिसभेंत संस्थानांतील प्रमुख सरदारांचा समावेश केला होता; व ब्रिटिश सरकारच्या पोलिटिकल एजंटांस ह्या सभेचे अध्यक्ष नेमून त्यांच्या खालच्या दर्ज्यावर महाराजांची योजना केली.

ह्या मंत्रिसभेच्या उत्कृष्ट कारभारामुळें अलवार संस्थानची विपत्ति लवकरच संपली. महाराजांना खाजगी खर्चासाठीं दरसाल २७०००० रुपयांची नेमणूक झाली; मात्र संस्थानचे हे नामधारी राजे असल्यामुळें त्यासंबंधीं वैभव राहण्यासाठीं ज्या कित्येक कायमच्या नेमणुका होत्या, त्यांचा खर्च निराळा. ह्याप्रमाणें महाराजांच्या तैनातीस फेरफटका करण्यासाठीं १०० घोडे, गाड्यांसाठीं २६ घोडे व ४० उंट असून इतर कित्येक नेमणुकाही

होत्या. बाकीच्या वसुलाचा विनियोग संस्थानचें कर्ज फेडण्याकडे व संस्थानच्या राज्यकारभाराचा पाया पुनः सुधारण्याकडे होऊं लागला. सारांश, संस्थानांत शांतता पूर्णपणें स्थापण्यांत आली; न्यायाचीं कोर्टें पुनः सुरू झालीं; शाळा स्थापन झाल्या; व पोलिस खात्यांत सुधारणा होऊन तेणेंकरून गुन्ह्यांचा पूर्णपणें प्रतिकार होऊं लागला.

इतकें झालें तरी महाराजांनीं आपल्या मर्जींतील अति हलकट लोकांशीं निकट संबंध ठेविलाच होता. तसेंच त्यांच्यामागें अनेक दुर्व्यसनें असल्यामुळें त्यांना राज्यकारभारांत फारशी ढवळाढवळ करण्यास फुरसत नसे; तथापि थोडी बहुत केल्यास ती नुकसानकारकच असे. राणी सरकारच्या वाढदिवशीं सरकारी दरबार भरला असतां त्यांनीं सरदार मंडळीचा उघड रीतीनें अपमान केला. एथपर्यंत मजल पोहोंचली तरी अलवार संस्थानचा राज्यकारभार तेथीलच नेटिव्ह मंत्रिमंडळामार्फत चालविण्याची, व ज्या उपायाच्या योगानें संस्थान खालसा करण्याचा थोडा बहुत तरी रंग दिसून येईल असा उपाय कांहीं झालें तरी योजावयाचा नाहीं; हा आपला निर्धार लॉर्ड मेयो यांनीं कायम ठेविला. १८७१ सालाच्या आरंभीं ते ह्या संबंधानें लिहितातः—" मला वाटतें कीं, ह्या तरुण महाराजांना ताळ्यावर आणणें दुरापास्त आहे. तथापि आपण ज्या पद्धतीनें वहिवाट ठेवण्याचें ठरविलें आहे, ती पद्धति आपणांस नेटानें व शिस्तवार सुरू ठेविली पाहिजे. एकाद्या उपद्व्यापी व कपटी माणसाला कोणी

सवा शेर भेटून त्यानें त्याला पक्कें जखडून टाकावें, व त्याला उपद्रव करण्याची शक्ति इतःपर राहूं नये; अशा स्थितींत त्या कपटी माणसाचें वर्तन जशा प्रकारचें असतें, तसेंच ह्या महाराजांचें एकंदर वर्तन आहे." लॉर्ड मेयो यांनीं त्यांना स्पष्टपणें कळविलें कीं, ह्या मंत्रिसभेपासून तुम्हांला कधीं काळीं स्वतंत्र होणें असेल तर एकच उपाय आहे. तो कोणता म्हणाल, तर तुमच्या वर्तनावरून तुम्हांस पश्चात्ताप झाल्याचें चिन्ह दिसून आपल्या प्रजेशीं सलोख्यानें वागण्याचा तुमचा निश्चय व्यक्त झाला पाहिजे.

परंतु अशा प्रकारची सुधारणा महाराजांमध्यें होण्याचा संभव नव्हता. म्हणून जुन्या कारभारांत सुधारणा करण्याचें व नवीन कित्येक सुधारणा करण्याचें काम राज्यव्यवस्थेसाठीं नेमिलेल्या मंत्रिसभेकडून सुरूच राहिलें. महाराज खिन्न होऊन तुटक तुटक वागूं लागले; दुष्ट प्रकारच्या चालीरितींत दिवसेंदिवस अधिकाधिक गुरफटत चालले; आणि अखेरीस १८७४ त आपल्या २९ व्या वर्षींच त्यांची एकाद्या थकलेल्या वृद्ध माणसाप्रमाणें स्थिति होऊन ते मृत्यु पावले.

लॉर्ड मेयो यांच्या व्हाइसरायच्या कारकीर्दींत अत्यंत अव्यवस्थित रीतीनें राज्यकारभार चालल्याचें अलवार हें उदाहरण होय; तसेंच वंशपरंपरागत राजपुरुषाला एकीकडे ठेवण्यापर्यंत हात घालण्याचा प्रसंग आल्याचेंही हें एकच उदाहरण होय. दुसऱ्या एका संस्थानांत अव्यवस्थित राज्यकारभार सुरू होता; म्हणून तेथील सं-

स्थानिकाला ह्यांनीं कडक ताकीद दिली. परंतु त्या महाराजांना त्याजबद्दल संताप आला; व व्हाइसराय यांच्या दरबारीं ह्यांच्या दर्ज्याला अनुसरून उदेपूर येथील पुरातन राजघराण्यांतील महाराजांच्या खालीं ह्यांना ठेविलेल्या खुर्चीवर ह्यांनीं बसण्याचें नाकारिलें. तेव्हां ह्या अपराधाबद्दल महाराजांचा अपमान होऊन ब्रिटिश सरकारच्या हद्दींतून चालते होण्याविषयीं त्यांना हुकूम झाला; तसेंच त्यांना दुसरी शिक्षा अशी झाली कीं, त्यांच्या सन्मानार्थ १७ तोफांची सरबत्ती होत असे ती पुढें १५ तोफांचीच होऊं लागली.

अव्यवस्थित राज्यकारभाराचीं हीं कित्येक उदाहरणें झालीं. तथापि ह्याच्या उलट ज्या संस्थानांचा राज्यकारभार शहाणपणानें चालला आहे, व जेथील संस्थानिकांच्या अंतःकरणांत कर्तव्यदक्षतेचा उदात्त विचार जागृत आहे, अशीं संस्थानेंही अनेक दाखवितां येण्यासारखीं आहेत; हें एथें नमूद केलेंच पाहिजे. न केल्यास संस्थानिकांसंबंधानें अन्याय केल्याप्रमाणें होईल. लॉर्ड मेयो यांच्यापाशीं तर संस्थानिकांचा एक मेळाच जमला. ह्या संस्थानिकांच्या वर्तनाची ते स्वतः फार चहा करीत. तसेंच त्यांच्या राज्यकारभारासंबंधानें ह्यांना मोठा अभिमान वाटे; व तो यथार्थ वाटे. अशा संस्थानांपैकीं भोपाळ हें उदाहरणार्थ घेण्यास हरकत नाहीं. भोपाळ हें मध्यहिंदुस्तानांतील संस्थानांपैकीं एक असून आपल्या प्रजेवर तेथील संस्थानिक राजसत्ता चालवितात. ह्याचें क्षेत्रफळ ६७६४ चौरस मैल असून लोकसंख्या ६६३६५६ आहे;

व संस्थानचें वार्षिक उत्पन्न सुमारें ३६००००० रुपये आहे. संस्थानची फौज ४००० असून १८१८ तील तहाअन्वयें ब्रिटिश सरकारनें संस्थानच्या संरक्षणार्थ ठेविलेल्या फौजेचाही खर्च संस्थानिकाला चालवावा लागतो.

भोपाळ संस्थानची स्थापना १७२३ त एका धाडशी अफगाणानें केली. त्यानें तेथील हिंदु राजाला हाकून देऊन तेथें एक किल्ला बांधिला, व स्वतः नबाब हा किताब धारण केला. १७७८ त जनरल गॉडर्ड यांच्या हाताखालचें ब्रिटिश सैन्य मध्यहिंदुस्तानांतून कूच करून जात असतां भोपाळ हें एकच संस्थान ब्रिटिश सरकारशीं स्नेहभाव ठेवण्यास सिद्ध झालें. १९ व्या शतकाच्या प्रारंभीं प्रारंभीं मराठ्यांनीं धुमाकूळ उडविला असतां अनेक एतद्देशीय संस्थानिकांना इंग्रज सरकारची मदत मिळवावी लागली; त्यांपैकींच भोपाळही एक होय. १८१९ त भोपाळ संस्थानानें इंग्रज सरकारचें सार्वभौमत्व कबूल केलें, व तेव्हांपासून तें ब्रिटिश सरकारच्या आश्रयाखालीं आलें; आणि ब्रिटिश सरकारनें मराठ्यांपासून जिंकिलेल्या महत्त्वाच्या महालांपैकीं कित्येक महाल येथील संस्थानिकाला बक्षीस दिले. १८५७ सालच्या बंडाच्या वेळीं भोपाळच्या गादीवर एक स्त्री होती; तीच प्रख्यात शिकंदर बेगम होय. तिनें शहाणपणानें राज्यकारभार चालविल्यामुळें ह्या संस्थानचा नंबर एकंदर संस्थानांत बराच वर चढला. बंडाच्या आणीबाणीच्या प्रसंगीं तिनें ब्रिटिश सरकारास राजनिष्ठपणानें मदत केली; म्हणून

तिला जी.* सी. एस्. आय्. हा किताब मिळाला. ती १८६८ त मृत्यु पावली, व तिचें राज्य तिच्या मुलीला मिळालें. ही मुलगीही आपल्या आईला शोभणारीच होती.

ही राजकन्या १८६८ त गादीवर बसली. त्या वेळीं तिचें वय ३१ वर्षांचें असून ती विधवा होती. आपल्या मातुश्रींच्या आंगचा दृढनिश्चय आणि सदसद्विचार हे गुण ह्या बेगम साहेबांच्या स्वभावांत उतरलेले होते; आणि राज्यकारभारासंबंधीं आपलें कर्तव्य बजावण्याविषयीं विलक्षण तरतरी यांच्या आंगीं होती. लॉर्ड मेयो यांच्या कारकीर्दींत ज्या ज्या संस्थानिकांवर यांची छाप बसली, त्याला त्याला कांहीं विवक्षित प्रकारच्या सुधारणा करण्यासाठीं उपाय योजण्याचा त्यांनीं आग्रह केला; व हे उपाय योजण्याकडे बेगम साहेबांनीं त्या काळीं आपलें लक्ष पुरविलें. त्यांनीं नव्या सडका सुरू केल्या; सार्वजनिक शिक्षणाची पद्धति ठरविली; आपल्या संस्थानची पाहणी केली; पोलिस खात्याची सुधारणा केली; दुष्कर्मासाठीं अज्ञान मुलींना चोरून नेण्याची लोकांच्या पक्की आंगीं खिळलेली अति निंद्य चाल बंद केली; व तुरुंगांची सुधारणा केली. लॉर्ड मेयो यांनी आपल्या राजधानीच्या शहरीं ह्या बेगम साहेबांचें आदरानें आगतस्वागत केलें; व राज्ञीपुत्र डयूक ऑफ् एडिंबर्ग यांच्या आगमनाच्या प्रसंगीं मोठ्या सन्मानपूर्वक बेगम साहेबांची व त्यांची भेट करून दिली. बेगम साहेबांचा त्यांजकडून जो पाहुणचार झाला व त्यांनीं जें प्रेम दाखविलें, त्याचें पक्कें स्मरण त्या आप-

* Grand Commander of the Star of India.

त्या संस्थानास परत गेल्या तरी त्यांना राहिलें; व पुढील कित्येक वर्षें त्यांनीं उत्कृष्ट राज्यकारभार चालवून राज्यकारभारांत मोठ्या दक्षतेनें सुधारणा सुरू केल्यामुळें ह्यांची कारकीर्द फार प्रसिद्धीस आली.

भोपाळ संस्थानचा राज्यकारभार ह्याप्रमाणें इतर संस्थानिकांना नमुन्यादाखल झाल्यामुळें ह्या बेगम साहेबांना जी. सी. एस्. आय्. हा किताब देण्यांत आला.

सरहद्दीवरील विशेष रानटी जातींच्या लोकांसंबंधानें हिंदुस्तान सरकारचें कर्तव्य कोणतें, ह्या संबंधाचे लॉर्ड मेयो यांचे विचार फार कडक होते. त्यांचें मत असें होतें कीं, सरहद्दीवर शांतता राखण्याची जबाबदारी हिंदुस्तान सरकारवर आहे खरी. तथापि त्या लोकांनीं ब्रिटिश प्रदेशावर केलेल्या स्वाऱ्यांबद्दल त्यांची खोड मोडण्याचा उद्देश मनांत बाळगून ही शांतता ठेवावयाची नाहीं. तर अशा प्रकारच्या स्वाऱ्या त्या लोकांस करितांच येऊं नयेत, म्हणून उत्कृष्ट प्रकारची तजवीज योजून तेणेंकरून ही शांतता राखावयाची.

हिंदुस्तानच्या वायव्य सरहद्दीवर एका ठिकाणीं डोंगरी लोकांनीं वरचेवर कुरापती काढिल्या. तेव्हां त्या लोकांच्या बंदोबस्ताची तजवीज तेथल्या तेथें लावण्याविषयीं त्यांनीं सूचना केली. ही तजवीज अशी कीं, इतःपर त्या लोकांनीं स्वाऱ्या केल्याचें कळल्याबरोबर त्यांचा तावडतोब सूड उगविण्यासाठीं कांहीं फौज सज्ज ठेवावयाची. सरहद्दीसंबंधीं अलीकडे घडलेल्या गोष्टींची चौकशी करून ह्या बाबतींत आपलें धोरण लॉर्ड मेयो यांनीं पुढें दर्शवि-

त्याप्रमाणें स्पष्टपणें लिहिलें आहेः—" सांप्रत ह्या प्रकरणीं एकंदरीनें पुढीलप्रमाणें व्यवस्था व्हावी अशी शिफारस आहेः--फेब्रुआरी-मार्चच्या सुमारास डोंगरांतून भिन्न भिन्न ठिकाणीं पुष्कळ सैन्य जमा करावें. तसेंच ब्रिटिश सैन्याकडून शत्रूंचीं पिकें जाळून टाकवून त्यांच्या खेड्यापाड्यांची धूळधाण उडविल्याशिवाय सरहद्दीवर शांतता राहणार नाहीं, अशी ज्या कामगारांची समजूत असेल, त्यांच्याच हवालीं हें सैन्य पूर्णपणें करावें; आणि लुटालूट किंवा स्वारी होण्याचा थोडाबहुत रंग दिसल्याबरोबर ह्या सैन्यानें डोंगरांतून चाल करून जुन्या पद्धतीप्रमाणें नासधूस उडविण्यास प्रारंभ करावा. " तथापि लॉर्ड मेयो यांनीं पुढें दाखवून दिलें आहे कीं, अशा प्रकारचें सैन्य अगदीं वेळीं पाठविल्यास हिंदुस्तान सरकारच्या अभिप्रायाप्रमाणें वागण्यास त्याला सवड राहावयाची नाहीं; व ह्यामुळें हिंदुस्तान सरकारला भयंकर प्रकारच्या लष्करी उलाढालींत पडावें लागण्याचा संभव आहे; आणि ह्या उलाढालींच्या स्वरूपासंबंधानें, तसेंच त्या उलाढाली न्यायाच्या अथवा आवश्यकतेच्या आहेत किंवा नाहींत, ह्यासंबंधानें अभिप्राय प्रदर्शित करण्यास हिंदुस्तान सरकारच्या मंत्रिमंडळाला संधीही मिळावयाची नाहीं. म्हणून अखेरीस ते लिहितातः—" असे भयंकर परिणाम ज्या कृत्यापासून घडण्याचा संभव आहे, असें कृत्य करण्यास परवानगी देण्यास माझी हरकत आहे. "

त्यांनीं आणखी असेंही लिहिलें आहेः—" डोंगरी लोकांचा सूड उगविण्याविषयींची पद्धति टाळण्याविषयीं

हिंदुस्तान सरकार इतकें आतुर आहे खरें. तथापि सरहद्दीवरील स्थानिक अधिकाऱ्यांच्या मनांत तशा पद्धतीनें चालण्याविषयीं अद्यापि उत्सुकता आहे; मात्र ते ती पूर्णपणें प्रकट करीत नाहींत इतकेंच. तसेंच मि०—यांचें पत्र जो कोणी वाचील त्याच्या निदर्शनास ही गोष्ट आल्याशिवाय राहणार नाहीं." त्यांनीं ह्या बाबतींत अशी सूचना केली आहे:—"परकीय लोकांकडून सरहद्दीवरील ज्या ठिकाणांवर हल्ला होण्याचा संभव आहे अशा ठिकाणांचें नेहमीं एकसारखें मोठ्या दक्षतेनें संरक्षण करावयाचें. असें राजधोरण होतां होई तों सुरू करून त्या लोकांवर छापे घालणें, आपण होऊन त्यांची कुरापत काढणें व त्यांचा सूड उगविणें; असें हें पूर्वीचें राजधोरण रद्द करावयाचें."

सरहद्दीच्या संरक्षणार्थ अशा रीतीनें नेहमीं सावध असल्यानें त्या डोंगरी लोकांना नेहमींचीच दहशत राहणार, असा एक आक्षेप ह्या पद्धतीला कोणी आणितात. ह्यावर लॉर्ड मेयो यांचें असें म्हणणें आहे:—"ह्या आक्षेपांत कांहीं जीव आहेसें मला दिसत नाहीं. पोलिसचा शिपाई हजर राहिल्यानें चोराला खरोखर सर्वकाळ दहशत बसणार आहे; तसेंच फांशीचा खांब नजरेसमोर असल्यानें खुनी माणसासही एक उत्तम प्रकारचें स्मरण राहणार आहे. ह्या सरहद्दीवरील दंग्याधोप्यासंबंधानें खुद्द त्या डोंगरी लोकांचे जसे विचार असतात, तशाच प्रकारचे विचार ग्राह्य करण्याची इंग्रज कामगारांची बरीच वहिवाट निःसंशय आहेसें मला वाटतें. सरहद्दीवरील दंग्या-

धोप्यांना ते डोंगरी लोक युद्धच मानितात, व अशा प्रकारें कुरापती काढण्यांत कांहीं अन्याय नाहीं, असें ते समजतात. लोकांना ठार मारणें, व ज्या खेड्यापाड्यांना स्वसंरक्षणाची सोय नाहीं त्यांजवर रात्रीच्या प्रहरीं हल्ले करून अंथरुणांतल्या अंथरुणांत लोकांस कापून काढणें; ह्या कृत्यांचा कांहीं युद्धांत समावेश होत नाहीं; तर सुधारलेल्या राष्ट्रांच्या दृष्टीनें हे खून होत; असें शिक्षण त्या डोंगरी लोकांना आपण दिलें पाहिजे. हें शिक्षण जितकें लवकर देऊं तितकें चांगलेंच. हजारों सरहद्दीवरील पठाणांपेक्षां कमी समजुतीच्याही लाखों लोकांना आपण असें शिक्षण कधींच दिलें आहे. ”

तेव्हां अशा प्रकारच्या दंग्याधोप्यांचा समावेश धर्म-युद्धांत न करितां सशस्त्र अशा बलाढ्य पोलिस सैन्या-कडून त्यांचा प्रतिकार करावयाचा; असें लॉर्ड मेयो यांचें राजधोरण होतें. सरहद्दीवर डोंगरी लोकांकडून हो-णाऱ्या स्वारीचा सूड लष्करी उपायांनीं उगविला नाहीं तर सरहद्दीवरील आपलें वजन कमी होईल; असा कित्येकांचा आक्षेप आहे. ह्या संबंधानें ते म्हणतातः “ आपलें वजन कायम राखण्यासाठीं लढाया करणें मला मान्य नाहीं. तसेंच आपली छाप कायम राखण्यासाठीं लोकांना ठार करण्यांत नीतिदृष्टचा कांहीं वावगें नाहीं, अशी अद्यापि कोणाची समजूत असली तरी सरहद्दीवरील रानटी जातींशीं घडलेल्या बारीकसारीक चकमकींच्यायोगानें हिंदुस्तानांतील ब्रिटिश सैन्याच्या पराक्रमाचें स्वरूप व त्या पराक्रमाची सत्ता ह्यांत कोणत्याही प्रकारें फरक पडेल,

असें त्यांना खात्रीपूर्वक फारसें म्हणतां येणार नाहीं. तथापि थोड्याशा अशिक्षित रानटी लोकांना शासन करून सरहद्दीवरील एकाद्या ठिकाणच्या कामगारासंबंधानें त्यांचा सूड उगवावयाचा, एवढाच कांहीं अभिप्राय नाहीं. खरा अभिप्राय याहून विशेष महत्त्वाचा आहे. आपण रागाच्या आवेशांत हिंदुस्तानच्या सीमेंत कोठेंही तोफेची सरबत्ती केल्यास तिचा प्रतिध्वनि हिंदुस्तानांतच होऊन राहत नाहीं, तर सर्व एशियाखंडभर होतो; ख्रिश्चन किंवा युरोपियन राजसत्तेसंबंधानें ज्यांच्या मनांत कोणत्याही प्रकारचें प्रेम नाहीं, त्यांचा तेणेंकरून असा समज होतो कीं, खुद्द आपल्या प्रजेमध्यें अद्यापिही कित्येक लोक आपल्या विरुद्ध आहेत; आणि सरहद्दीच्या आंतील भागचे लोक अजून पूर्णपणें आपल्या अमलाखालीं आले नसून, ब्रिटिश राजसत्तेला हिंदुस्तानांत अद्यापि अपवाद घेणारे लोक आहेत, असें जें कित्येकांचें मत आहे त्याला ह्या योगानें पुष्टीकरण मिळतें."

लॉर्ड मेयो यांच्या सरहद्दीसंबंधीं राजधोरणाचें आणखी एक उदाहरण येथें द्यावयाचें आहे. हिंदुस्तानच्या वरील सरहद्दीच्या उलट बाजूच्या सरहद्दीसंबंधीं हें आहे. ह्या उदाहरणावरून त्यांचे विचार प्रथमदर्शनीं वरच्या विचारांशीं विपरीत भासण्याचा संभव आहे. हिंदुस्तानच्या ईशान्य सरहद्दीवरील लुशाई जातीच्या लोकांवर स्वारी करण्यास लॉर्ड मेयो यांनीं १८७१ त मंजुरी दिली. काचारच्या दरीपासून तों बंगालच्या उपसागराच्या बाजूस असलेल्या चितगांव प्रांतापर्यंत, तसेंच पश्चि-

मेस टिपरा डोंगरापासून ब्रह्मदेशांतील पूर्वेकडील नद्यांना ज्या मोठ्या उच्च प्रदेशापासून पाण्याचा पुरवठा होतो तेथपर्यंतच्या प्रदेशापर्यंत, ह्या जातींची वस्ती असून, त्या काळीं ह्या प्रदेशाची फारशी माहिती नव्हती. ह्या स्वारीच्या परिणामासंबंधानें थोडक्यांत इतकें सांगितलें म्हणजे पुरे आहे कीं, हींत इंग्लिशांस पूर्णपणें यश आलें; आणि फार प्राचीन काळापासून ज्या प्रदेशांत एकसारखी लुटालूट चालत असून जातीजातींमध्यें युद्धें सुरू असत, अशा ह्या प्रदेशांत कांहीं काळ बंदोबस्त व शांतता राहिली. तसेंच हा सुपरिणाम घडवून आणण्यासाठीं त्या लोकांना फार थोडा त्रास कांहीं दिवस मात्र द्यावा लागला.

तथापि अशा प्रकारच्या स्वाऱ्यांतून यश आलें असतां त्याजबद्दल विशेष धन्यता लॉर्ड मेयो हे कधींच मानीत नसत. ते लिहितातः—" ह्या कामीं होतां होईतों आपण बडेजाव दाखवूं नये; गवगवा करूं नये व खटाटोप माजवूं नये. ही एकादी मोहीम आहे असें मानूं नये; कारण आपणांस विलक्षण अडथळा कोणाकडून होण्याचा संभव दिसत नाहीं. लुशाई प्रांताच्या करितां येईल तितक्या बहुतेक भागाची पाहणी करून त्यांत जितका लष्करी अंमल बसवितां येईल तितका बसविण्याचा उद्देश आहे, असें लक्षांत ठेविलें पाहिजे; व गुन्हेगारांचा पत्ता जेथें जेथें लावितां येईल तेथें तेथें लावून त्यांना शासन करण्यासाठीं हें कृत्य करावयाचें आहे. तथापि ह्यांत विशेषतः हेतु असा आहे कीं, आमच्या सशस्त्र फौजेला

तुमच्या डोंगरांत ज्या ठिकाणीं जाऊन आंतपर्यंत प्रवेश करितां येणार नाहीं असा भाग तुमच्या डोंगरांत क्वचितच असेल, असें त्या रानटी लोकांच्या निदर्शनास आणून द्यावयाचें."

हिंदुस्तानांतील मांडलिक राजे व सरहद्दीवरील रानटी जातींचे लोक ह्यांशीं लॉर्ड मेयो यांचें वर्तन ह्याप्रमाणें दृढनिश्चयाचें, परंतु मोठ्या विचाराचेंही असे. तथापि ब्रिटिश सरकारचा नेटिव्ह संस्थानांशीं जो एकंदर संबंध आहे त्यांत अतोनात फेरबदल झाला पाहिजे, हेंही त्यांच्या स्पष्टपणें ध्यानांत आलें. व्यापाराच्या उद्देशानें आलेल्या कंपनी सरकाराशीं हिंदुस्तानांतील संस्थानिक हे आजपर्यंत एकोप्यानें राहात होते, तथापि ते थोडे फार परकीय राजांप्रमाणें गणले जात. परंतु ती स्थिति आतां बदलली, असें मागें अनेक वेळां स्पष्टपणें नमूद केलेलें आहे. सारांश, राणी सरकारच्या ताब्यांतील हिंदुस्तानच्या साम्राज्यांतच इतःपर त्यांचा समावेश झाला. ह्या स्थित्यंतरामुळें राजे लोकांना कित्येक नवीं व विशेष महत्त्वाचीं कर्तव्यें बजावावीं लागणार. तीं त्यांना बजावितां यावीं, म्हणून नवीन पिढींतील राजकुमारांना शिक्षण देऊन तयार करावयाचें, अशी लॉर्ड मेयो यांना उत्कट इच्छा होती. त्यांची अशी समजूत होती कीं, हा उद्देश सिद्धीस जाण्यास एकच मार्ग आहे. तो कोणता म्हणाल तर भिन्न भिन्न दर्ज्यांच्या राजांना त्यांना योग्य अशा प्रकारचें शिक्षण देण्याची योजना मोठ्या विचारपूर्वक ठरविणें.

एकादें संस्थान अज्ञान मुलाच्या ताब्यांत जाईल, तेव्हां तेव्हां पुढील दोन गोष्टी करणें सार्वभौम सरकारचें कर्तव्य होय, असें त्यांचें मत असे. पहिली ही कीं, संस्थानचा राज्यकारभार चांगल्या प्रकारें चालावा; तसेंच आपल्या स्वातंत्र्यास मान देऊन तें स्वातंत्र्य सार्वभौम ब्रिटिश सरकार पूर्णपणें कायम राखील, अशी त्या संस्थानच्या प्रजेची व तेथील प्रधानमंडळाची खात्री व्हावी, म्हणून एकादें प्रतिनिधि-मंडळ नेमण्याची व्यवस्था करावयाची. ह्या मंडळांत केव्हां फक्त एतद्देशीय लोक असावे; केव्हां त्यांत कांहीं युरोपियनही असावे. दुसरी गोष्ट ही कीं, त्या अल्पवयी राजकुमारांच्या शिक्षणाची व्यवस्था लावावयाची. अशा रीतीनें कीं, राजकर्ते ह्या नात्यानें पुढें आपणांवर कोणकोणती जबाबदारी पडणार ह्याविषयीं त्यांचे विचार हिंदुस्तानांतील विचारांना फारसे अनुसरून नसून इंग्लंडांतील विचारांप्रमाणें असावे. अल्पवयी मांडलिक राजांच्या अंतःकरणांत त्यांच्या सार्वजनिक कर्तव्यासंबंधानें मोठे उदात्त विचार उत्पन्न होत जातील, अशा धोरणानें त्यांना शिक्षण देण्याचें महत्त्वाचें काम मोठ्या पदवीच्या बुद्धिमान् इंग्रज कामगारांना योग्य; अशी त्यांची समजूत होती. एतद्देशीय राजकुमारांवर इंग्रज कामगार देखरेख करण्यास अथवा त्यांस शिकविण्यास नेमून त्यांस शिक्षण देण्याच्या ह्या पद्धतीपासून सुपरिणाम घडून आले आहेत. संस्थानिकांच्या फौजा हिंदुस्तानच्या एकंदर अफाट सैन्यांत सामील करण्याची तजवीज पुढें

लवकरच सुरू झाली; व ह्या पद्धतीनें राजकुमारांस शिक्षण मिळत गेल्यामुळेंच ह्या तजविजीप्रमाणें व्यवस्था होणें शक्य झालें. १९ व्या शतकांतील शेवटच्या पांच-पंचवीस वर्षांत हिंदुस्तानांत अत्यन्त महत्त्वाची राजकीय सुधारणा म्हटली ह्मणजे, एतद्देशीय राजांच्या सैन्याचा ब्रिटिश सैन्यामध्यें झालेला समावेश, हीच प्राय: होय.

हिंदुस्तानांतील मोठमोठ्या संस्थानिकांच्या शिक्षणाची व्यवस्था लावूनच लॉर्ड मेयो स्वस्थ राहिले नाहींत. कमी दर्ज्याच्या संस्थानिकांसाठींही ह्यांच्या आश्रयाखालीं पाठशाळा स्थापन झाल्या. काठेवाडांतील संस्थानांची सुधारणा करण्यासाठीं ह्यांनीं जी योजना केली, तिमध्यें अशा प्रकारच्या पाठशाळेचा समावेश होताच. कारण बहुतेक संस्थानिकांना, ते बाल्यावस्थेंत असतां योग्य रीतीनें शिक्षण दिलें नाहीं तर, मोठेपणीं त्यांजकडून आपल्यावरील जबाबदारीला अनुसरून वर्तन होण्याची आशा बाळगणें व्यर्थ, असें त्यांचें मत होतें. ह्या कुमारांच्या उच्च पदवीमुळें त्यांना आजपर्यंत खाजगी रीतीनेंच शिक्षण मिळत असे, व तेंही जनानख्यांतील लाडलाडिवाळ चालून देतां येईल तितकेंच. ह्मणून इंग्लंडांत ईटन येथें जशी सार्वजनिक शिक्षणाची सोय आहे, त्या धर्तीवर त्यांच्यासाठीं इकडे कांहीं तजवीज करण्याचें त्यांनीं योजिलें. एकमेकांशीं मिसळतां येऊन पुढील आयुष्यक्रमांत आपल्या पदवीस योग्य असें कर्तव्य बजावण्याचें शिक्षण त्या राजकुमारांना ह्या पाठशाळेंत मिळावयाचें.

अशा पाठशाळेचें दुसरें उदाहरण अजमीर एथील मेयो कॉलेज होय. हें काठेवाडांतील राजकुमार कॉलेजापेक्षांही विशेष महत्त्वाचें आहे. ह्या अजमीर कॉलेजासाठीं सुमारें १०॥ लक्ष रुपये वर्गणी खुद्द संस्थानिकांनीं दिली. ह्या पाठशाळेचा उपयोग केवळ राजपुतान्यांतील बडे लोकांस व्हावा, असा लॉर्ड मेयो यांचा हेतु होता. ह्या ठिकाणीं रजपूत राजे व सरदार यांच्या कुमारांना युरोपियन प्रोफेसरांच्या प्रत्यक्ष सहवास घडून त्यांना पाश्चात्य विचारांचें वळण लागावयाचें. तसेंच उत्कृष्ट प्रकारचें शारीरिक आणि नीतिविषयक शिक्षणही त्यांना एथें मिळावयाचें. ह्या पाठशाळेच्या सल्लामसलतगारांत राजपुतान्यांतील सर्व प्रमुख संस्थानिक व त्यांच्या मदतीस नेमिलेले इंग्रज पोलिटिकल एजंट यांचा समावेश आहे; व ह्या मंडळीचे व्हाइसराय अध्यक्ष असून गव्हर्नर जनरल यांचे राजपुतान्यांतील एजंट उपाध्यक्ष आहेत.

लॉर्ड मेयो यांचें संस्थानिकांशीं प्रत्यक्ष जें वर्तन असे त्याचा कितीही सुपरिणाम झालेला असला तरी, नेटिव्ह संस्थानांसंबंधाच्या त्यांच्या राजधोरणाचें तें कांहीं अत्युत्तम स्मारक म्हणतां येणार नाहीं; तर हिंदुस्तानांतील राजांच्या शिक्षणासंबंधाचें त्यांचें राजधोरण हेंच तशा प्रकारचें स्मारक होय. खुद्द लॉर्ड मेयो आजमित्तीस विद्यमान् असते तर त्यांचेंही मत असेंच पडलें असतें.

# प्रकरण पाचवें.

## लॉर्ड मेयो यांचें परराष्ट्रसंबंधी धोरण.

[ त्यांच्या कारकीर्दीच्या आरंभीं परराष्ट्रसंबंधी स्थिति.--मध्य एशियासंबंधानें त्यांचें राजधोरण.---त्यांच्या पूर्वींची अफगाणिस्तानची स्थिति.-ब्रिटिश राजधोरणासंबंधाचे अफगाण लोकांचे उद्गार -शेरअल्ली यांचे इंग्रजांसंबंधीं उद्गार.--रशियाचा अफगाणिस्तानावर डोळा.---त्या देशासंबंधीं राजधोरणाचा लॉर्ड लॉरेन्स यांचा शेवटचा लेख.--अंबाला एथील दरबारीं शेरअल्ली यांची भेट.-हिंदुस्तानांत येण्यांत अमिरांचे पांच हेतु.-अंबाला दरबारचा परिणाम.-ह्या दरबारामुळें पाश्चात्य सुधारणांचा अमिरांवर घडलेला परिणाम.-सरहद्दीच्या सुरक्षिततेसंबंधानें मेयो यांचें मत -रशियन मुत्सद्यांचे विचार खाजगी नात्यानें जाणण्याची आवश्यकता.-आपले विचार रशियांतील प्रमुख अधिकाऱ्यांस कळविण्यासाठीं बंगाल्यांतील एक सनदी कामगाराची योजना.-अफगाणिस्तानासंबंधानें ठरलेली सरहद्द.-बलुचिस्तानची स्थिति.-तेथील अव्यवस्था मोडण्यासाठीं प्रयत्न.-त्यांनीं लाविलेल्या व्यवस्थेचा परिणाम.-पूर्व-तार्तरीची हकीकत.-मि. फार्सिथ यांची तिकडे रवानगी.-तेथील नव्या राजास मेयो यांनीं केलेल्या सूचना.-मि. फार्सिथ यांना तेथें आढळलेली स्थिति.-चांग चीनम दरींतून व्यापाराची सुरवात.-इतर सरहद्दीसंबंधीं संक्षिप्त उल्लेख. ]

लॉर्ड मेयो यांच्या कारकीर्दीस प्रारंभ झाला, तेव्हां हिंदुस्तानच्या वायव्य सरहद्दीपलीकडच्या एशिया खंडांतील तीन देशांत अव्यवस्था होती. तसेंच दोन बलाढ्य राष्ट्रांचा ह्या अव्यवस्थित देशांतून हिंदुस्तानच्या सरहद्दीकडे निकट येण्याचा प्रयत्न मुकाट्यानें, परंतु निश्चयानें सुरू होता. पंजाबच्या पश्चिम सरहद्दीवर अफगाणिस्तान

हा देश असून तेथें गेल्या सहा वर्षांत सुरू असलेली झोटिंग पादशाही नुकतीच संपली होती; व हिंदुस्तानला पोहोंचण्यास अफगाणिस्तान हा मार्ग असल्यामुळें त्या देशावर झडप घालण्यासाठीं रशिया टपून होता. सिंध प्रांताच्या सरहद्दीवर बलुचिस्तान हा देश असून, तेथील राजघराण्यांत व जातीजातींच्या पुढाऱ्यांत कैक दिवस तंटेबखेडे सुरू होते; व ह्या तंट्याबखेड्यांची संधी साधून बलुचिस्तानच्या पश्चिम आंगचा मुलूख इराणी-राष्ट्र लुबाडीत होतें. तसेंच काश्मीरच्या उत्तरेस बऱ्याच अंतरावर चीनच्या साम्राज्यांतून अलग झालेल्या एका प्रांतांत पूर्वेकडील तुर्कस्तान ह्या नांवाचें एक नवीनच मुसलमानी संस्थान अस्तित्वांत आलें होतें; आणि ह्या संस्थानच्या एका बाजूस रशियाचें राज्य व दुसऱ्या बाजूस हिंदुस्तानांतील ब्रिटिश सरकारचें राज्य असून ह्या दोन्ही राष्ट्रांकडून आपलें स्वामित्व कबूल करून घेण्याविषयीं हा संस्थानिक अति उत्सुकतेनें वाट पहात होता.

अशी स्थिति असल्यामुळें लॉर्ड मेयो यांचें परराष्ट्र-संबंधी राजधोरण म्हणजे वस्तुतः मध्य-एशियासंबंधीं राजधोरणच होय. ह्या राजधोरणाचा साक्षात् हेतु असा होता कीं, अफगाणिस्तान व बलुचिस्तान ह्या देशांतील अव्यवस्था मोडून त्या दोन देशांचे राजे ब्रिटिश सरकारशीं स्नेहभावानें वागतील, असें करावयाचें. तसेंच, ह्या दोन देशांतील राजांच्या अंतःकरणांत ब्रिटिश सरकारशीं स्नेहभावाची इच्छा केवळ उपस्थित करावयाची इतकेंच नाहीं; तर त्यांच्या स्नेहसंबंधापासून आपणांस कांहीं उपयोग

होईल असें सामर्थ्य त्यांच्या आंगीं आणावयाचें. ह्या धोरणाचा अंतस्थ हेतु असा होता कीं, हिंदुस्तानच्या वायव्य सरहद्दीवरील संस्थानें आपल्याशीं इमानानें वागतील असें करून, तेथें एक प्रकारचा बांध उभारावयाचा; आणि तेणेंकरून मध्य एशियांत अलीकडे अलीकडे रशियाचें जें भावी अनिष्टसूचक वर्चस्व माजलें होतें, त्याचा प्रतिकार करावयाचा. लॉर्ड डलहौसी यांनीं आपल्या कारकीर्दींत जे कांहीं फेरफार केले, त्यांची पूर्तता लॉर्ड मेयो यांच्या ह्या राजधोरणामुळें झाली. तसेंच ह्या राजधोरणामुळें पूर्वेकडील ह्या देशांतून रशिया व इंग्लंड ह्यांच्या परस्परसंबंधामुळें एशिया खंडांत उत्पन्न होणाऱ्या घोटाळ्यांचा विचार हिंदुस्तान सरकाराकडून न होतां, त्यांचा समावेश युरोपांतील राजकारणांत झाला; ह्या गोष्टीचा उल्लेख आरंभीं उपोद्घातांत आलाच आहे.

लॉर्ड मेयो येण्यापूर्वीं सात वर्षें अफगाणिस्तानासंबंधाच्या इंग्लिशांच्या राजधोरणाची बरीच ओढाताण चालली होती; आणि ते येण्यापूर्वीं कित्येक महिने तर तें धोरण उघडपणें निरुपयोगी ठरलें होतें. मि. लॉरेन्स ( यांनाच पुढें लॉर्ड किताब मिळाला ) व मेजर लम्सडेन यांनीं १८५८ त ठरविलेल्या आधारावर ब्रिटिश सरकारचें अफगाणिस्तानाशीं दळणवळण आजपर्यंत सुरू होतें. ह्या दळणवळणाचें मुख्य आधारभूत तत्त्व मेजर लम्सडेन यांनीं असें लिहिलें आहे:—" अफगाणिस्तानच्या गादीवर प्रत्यक्ष जो कोणी असेल त्याशीं स्नेहभावाचें व सलगीचें दळणवळण ठेवावयाचें; ह्यापलीकडे त्या देशाशीं

होतां होईतों जास्त संबंध ठेवावयाचा नाहीं. " परंतु १८६३ त अफगाणिस्तानचे बलाढ्य अमीर दोस्त महंमद हे मृत्यु पावले; व तेव्हांपासून अफगाणिस्तानच्या गादीचा प्रत्यक्ष मालक असा कोणी राहिलांच नाहीं. माजी अमिराचे मुलगे व पुतणे ह्यांजमध्यें गादीसंबंधानें युद्ध सुरू झालें. गादीचे खरे वारस शेरअल्ली हे असून त्यांना त्यांचे बंधु अफ्झलखान यांनीं १८६६ त कांहीं काळपर्यंत अजी हांकून लाविलें. म्हणून १८५८ त ज्याप्रमाणें तो देश एकाच राजाच्या ताब्यांत होता त्याप्रमाणें पुढें गादीचा एकच मालक न राहतां तेथें किमानपक्ष दोन राजे झाले; व ह्यांतील प्रत्येकजण आपणच गादीचे मालक असा हक्क सांगूं लागला.

१८५८ त ठरलेल्या तत्त्वाला अनुसरून त्या देशाशीं दळणवळण ठेवण्याचा प्रयत्न लॉर्ड लॉरेन्स यांनीं आपल्या कारकीर्दीतही सुरू ठेविला होता. गादीला वारसा सांगणाऱ्या ह्या दोघांपैकीं प्रत्येकानें, ब्रिटिश सरकारनें आपणास अमीर कबूल करावें, म्हणून विनंती केली. तेव्हां अफगाणिस्तानचा प्रत्यक्ष मालक दोघांपैकीं जो कोणी ठरेल, त्याला अमीर मानण्यास आपण तयार आहों, असें लॉर्ड लॉरेन्स यांनीं दर्शविलें. पुढें अफ्झलखान यांचा काबूलमध्यें थोडाफार पगडा बसला, तेव्हां त्यांना लॉर्ड लॉरेन्स ह्यांनीं मित्रत्वाच्या नात्यानें लिहिलें:—" हिंदुस्तान सरकारचें दळणवळण रहावयाचें तें अफगाणिस्तानचा प्रत्यक्ष जो कोणी राजा असेल त्याशीं राहात असतें. काबूलमध्यें आपणांस पूर्णपणें आपली सत्ता स्थापितां येईल, व

ब्रिटिश सरकारशीं स्नेहभावानें वागून त्याशीं एकोप्यानें राहण्याची आपली मनःपूर्वक इच्छा असेल, तर आपला अमीर ह्या नात्यानें आदर करण्यास मी तयार आहें."

ब्रिटिश सरकारच्या ह्या राजधोरणासंबंधानें अफगाण लोकांचें उलट असें म्हणणें होतें कीं, अशामुळें आमच्या देशांत लोकांस आपला जय होईल अशा प्रकारें बंडाळी उडविण्यास प्रत्यक्ष उत्तेजन मिळतें, व अफगाणिस्तानांत कोणाही माणसाची कायमची राजसत्ता स्थापन होणें बहुतेक अशक्य होतें. ते म्हणत कीं, अमिरांचें साहाय्य मिळविण्यास ब्रिटिश सरकार उत्सुक आहे खरें; तथापि अमिरांच्या विरुद्ध एकाद्या बंडखोर सरदाराची थोडीशी सरशी झाल्याबरोबर अमिरांच्या विरुद्ध होऊन त्या बंडखोर सरदाराशीं स्नेहभाव करण्यासही ब्रिटिश सरकारची तयारीच आहे; असा त्या सरकारचा हेतु ह्या राजधोरणावरून स्पष्टपणें प्रदर्शित केल्यासारखें होतें. ह्या राजधोरणामुळें ते लोक चवताळून जाऊन म्हणतातः—" कोणत्याही राष्ट्राला इंग्रज लोकांबरोबर सलोख्यानें वागणें अवघड आहे. ह्या वरील पत्राचा आशय इतकाच दिसतो कीं, अफगाण वंशांतील राजपुरुषांनीं एकमेकांचा नायनाट उडवावा, अशी इंग्रजांची मोठी इच्छा आहे..... त्यांनीं शेरअली यांनाही असेंच पत्र लिहिलें असेल ह्यांत शंका नाहीं."

अशा प्रकारचें राजधोरण इंग्रज सरकारचें आहे असें कबूल करण्यास लॉर्ड लॉरेन्स यांनीं मागेंपुढें पाहिलें नाहीं. अफगाणिस्तानच्या गादीसंबंधानें आपला हक्क

स्थापित करण्यांत ज्याला यश येईल त्याला अमीर मानण्यास ते कबूल होतेच; पण ह्या कामीं थोडेंबहुत यश एकाद्यास आल्यास, जितका देश तो आपल्या ताब्यांत आणूं शकेल तितक्या पुरता त्याला राजा मानण्यासही ते तयार होते. अफूझलखान यांस लॉर्ड लॉरेन्स यांनीं स्पष्टपणें कळविलें:—" अमीर शेरअल्ली यांच्या ताब्यांत हिरात असून ते ब्रिटिश सरकाराशीं स्नेहभावानें राहात आहेत तोंपर्यंत ते हिरातचे राजे, असें मी मानीन; व त्यांजबरोबर स्नेहभावानें वागेन. तथापि ह्याच तत्त्वावर आपणांसही काबूल व कंदाहार येथील अमीर मानण्यास मी तयार आहें; व तशा नात्यानें मी आपणांस कळवितों कीं, आपल्या अमलांत शांतता राहून आपलें बरें व्हावें, अशी ब्रिटिश सरकारची इच्छा आहे."

अशा राजधोरणामुळें गादीला वारसा सांगणारे हे दोन इसम इंग्रज सरकारचे स्नेहांकित होण्याचें बाजूस राहून त्या दोघांसही राग आला. लॉर्ड लॉरेन्स यांचा वरील अभिप्राय शेरअल्ली यांच्या कानीं गेला, तेव्हां त्यांनीं असे उद्गार काढिले:—" स्वार्थापलीकडे इंग्रजांना कांहींच दिसत नाहीं, व तशी संधी येण्याची ते वाट पाहात असतात. कोणत्याही प्रसंगीं ज्या कोणाची बाजू त्यांना अति प्रबळ दिसेल, त्याशीं स्नेह करण्यास ते वळतात. इंग्रज लोकांच्या संबंधानें खोटी आशा करीत बसून मी आपलें अमूल्य आयुष्य फुकट घालविणार नाहीं; तर इतर राष्ट्रांशीं स्नेहभाव करीन."

अशा रीतीनें स्नेहभाव करण्यास शेरअल्ली हे तयार

असल्यामुळें त्यांशीं स्नेह करण्यास दुसरें एक सरकार एका पायावर तयारच होतें. अफगाणिस्तानच्या अमिराचे साहाय्यकर्ते ह्या नात्यानें रशियन सरकारास ह्या कामीं हात घालितां येऊन त्या देशांत राजाची सत्ता पूर्णपणें स्थापितां येती, तर मध्य एशियांतील कारभारांत मध्यस्थपणाचा अधिकार त्यांना मिळून थेट हिंदुस्तानच्या सरहद्दीवर चांगलें वर्चस्व मिळाल्यासारखें झालें असतें. हिंदुस्तानाहून परत जाण्यापूर्वींच लॉर्ड लॉरेन्स यांच्या ध्यानांत ही गोष्ट येऊन चुकली. १८६८ च्या उन्हाळ्यांत शेरअल्ली यांनीं मोठ्या निकराचा प्रयत्न करून पुनः गादी मिळविली; व मोठ्या समारंभानें काबूल शहरांत प्रवेश केला. पुढें १८६८ च्या सप्टेंबर महिन्यांत गादीस हक्क सांगणाऱ्या आपल्या प्रतिस्पर्ध्यांस त्यांनीं अजी देशपार केलें. इकडे ह्या दरम्यानच्या मुदतींत इंग्लंडांत सर हेन्री रॉलिन्सन नांवाच्या मुत्सद्द्यांनीं ता. २० जुलई १८६८ रोजीं एक अभिप्राय लिहिला; तो फार प्रसिद्ध आहे. ते म्हणतातः—"शेरअल्ली यांचे ग्रह पुनः उच्चीचे आहेत. म्हणून विलंब न लावितां त्यांना आपल्या पक्षास मिळवून घेतलें पाहिजे. ते रशियाच्या तावडींत सांपडले नसल्यास त्यांच्या वडिलांस आपण जो नजराणा देत होतों तो चालू केल्यानें व हिंदुस्तान सरकारची प्रत्यक्ष मदत इतर कामांत दिल्यानें बहुधा यत्किंचित् विरुद्ध जाण्यासही त्यांना जागा राहणार नाहीं; व ते आपणांशीं इमानानें वागतील. शिवाय त्यांना हत्यारें व कामगार यांचा पुरवठा करण्या-

ची, किंवा त्यांच्या मदतीसाठीं कांहीं सैन्यच त्यांच्या हवालीं करण्याचीही खरोखर जरूर पडेल. ”

सर हेन्री रॉलिन्सन यांच्या ह्या मताचें लॉर्ड लॉरेन्स यांनीं आपल्या कारकीर्दीतील अखेरच्या चार महिन्यांत फार सूक्ष्म रीतीनें मनन केलें. नंतर ता. ४ ज्यानुआरी १८६९ रोजीं त्यांनीं स्टेट सेक्रेटरी यांस एक खलिता पाठविला; तोच या थकल्या भागलेल्या व्हाइसराय साहेबांचा शेवटचा राजकीय लेख मानणें योग्य होईल. ते ह्या खलित्यांत म्हणतात:—“ मध्य एशियासंबंधानें रशियन दरबारच्या काय खटपटी व मसलती आहेत, ह्यासंबंधानें त्यांची व आमची नीट समजूत पडली पाहिजे; तसेंच अफगाणिस्तानच्या अथवा आपल्या सरहद्दीच्या आसपासच्या इतर कोणत्याही संस्थानच्या कारभारांत हात घालण्यास तुम्हांस मोकळीक देतां येणार नाहीं, असें त्या दरबारास निश्चयपूर्वक, परंतु सौम्य शब्दांनीं कळविण्याचा आपण प्रयत्न केला पाहिजे; असें आम्हांस वाटतें. ” “ शिवाय आम्हांस असें वाटतें कीं, इराणच्या दरबाराशीं हिंदुस्तान सरकारचें जें दळणवळण चालावयाचें तें सर्व हिंदुस्तानच्या स्टेट सेक्रेटरींनीं चालवावें; व काबूलच्या गादीचा जो कोणी प्रत्यक्ष मालक असेल, त्याला हत्यारें, दारूगोळा व पैशाची बरीच मदत देण्याचा, तसेंच प्रसंगोपात आमच्या स्नेहाचें वजन त्याला उपयोगीं पडेल अशा रीतीनें वागण्याचा अधिकार असावा; परंतु त्याशीं कायदेशीर सख्य करण्याची अथवा परशत्रूपासून संरक्षणार्थ त्याला कायदेशीर रीतीनें जुटींत घेण्याची जरूर नाहीं. ”

ह्या वेळीं सर स्टॅफर्ड *नॉर्थकोट हे हिंदुस्तानचे स्टेट सेक्रेटरी होते. ते ह्या खलित्यावर लिहितात:—“ दैवयोगानें आज शेरअल्ली यांच्या हातीं राजसूत्रें असल्यास त्यांना नजराणा द्यावा, व उद्यां तीं अबदुल रहिमान यांच्या हातीं गेल्यास त्यांना तो द्यावा; ही सूचना मान्य करण्यास माझें मन घेत नाहीं. ”

लॉर्ड लॉरेन्स यांची त्यांच्या ह्या अखेरच्या राजकीय लेखावर सही झाल्यावर नऊ दिवसांनीं लॉर्ड मेयो कलकत्त्यास पोहोंचले. म्हणून यांच्या पूर्वीच्या व्हाइसरायांनीं अफगाणिस्तानच्या राजधोरणांत सुचविलेले फेरफार अमलांत आणण्याची महत्त्वाची जबाबदारी त्यांजवर पडली. हे फेरफार कोणत्या प्रकारचे, ह्याजबद्दलचें चांगलेंसें स्पष्टीकरण लॉर्ड लॉरेन्स यांनीं करून ठेविलें नव्हतें. शिवाय हे फेरफार अशा प्रकारें अमलांत आणावयाचे होते कीं, हिंदुस्तान सरकारच्या पूर्वीच्या व पुढील कृतींत विसंगति दिसूं नये. इकडे इतक्या अवकाशांत अमीर शेरअल्ली यांनीं अफगाणिस्तानांत आपली सत्ता पक्की स्थापिली. ते १८६९ च्या मार्च महिन्यांत थाटमाटानें हिंदुस्तानांत नवीन गव्हर्नर जनरल यांस भेटावयास आले. ही भेट अंबाला एथील दरबारांत झाली; तथापि त्या दरबारच्या भपक्याचें येथें वर्णन कर्तव्य नाहीं. व्यवस्थित रीतीनें भरविलेले सर्व दरबार भव्यच असतात;

* हल्लींच्या ( १८९३ ) मुंबई इलाख्यांतील गव्हर्नर साहेबांचे हे आजे होत. ( भा. क. )

व फ्रान्स देशांतील **सुवर्ण*** **वस्त्रांच्या भूमीची** ह्या पूर्वेकडील देशांतील ही प्रतिमाच होय. ह्या प्रसंगीं ब्रिटिश सैन्य, एतद्देशीय राजे व मोठमोठे इंग्रज कामगार ह्यांचा तळ अंबाला शहरच्या मैदानावर पडला होता; व ह्या इतिहासप्रसिद्ध दरबारास मूळ पुस्तकाचे कर्ते हंटरसाहेब हेही व्हाइसराय साहेबांचे पाहुणे या नात्यानें हजर होते. तथापि व्हाइसराय साहेबांच्या कारकीर्दींतील थाटमाटांचें वर्णन करावयाचें म्हणजे ह्या पुस्तकाचा वास्तविक जितका आकार रहावा अशी इच्छा आहे, त्याहून फारच वाढेल. त्या दरबारांत प्रत्यक्ष कायमची जी कामगिरी लॉर्ड मेयो यांनीं बजाविली, तिचा भपका वरून फारसा दिसणारा नव्हता; तथापि ती विशेष महत्त्वाची होती; व तिचेंच येथें दिग्दर्शन कर्तव्य आहे. अमीर हे ब्रिटिश सरहद्दीच्या अलीकडे आल्याबरोबर त्यांचा पाहुणचार मोठ्या बडेजावीनें सुरू झाला. तेणेंकरून त्यांच्या मनावर विलक्षण परिणाम झाला. तेव्हां लाहोर मुक्कामीं त्यांच्या मुखांतून पुढील उद्गार निघाले:—" मी राजा आहें असें मला हल्लीं वाटूं लागलें आहे. "

हिंदुस्तानांत येऊन शेरअल्ली यांना पांच निरनिराळे हेतु साधावयाचे होते. पहिला हेतु ब्रिटिश सरकारशीं

* इंग्लंडचे राजे आठवे हेन्री व फ्रान्सचे राजे पहिले फ्रान्सिस यांची भेट इ. स. १५२० मध्यें फ्रान्स देशाच्या उत्तर किनाऱ्यावरील कॅले बंदराजवळ झाली. ह्या प्रसंगीं हे राजे व त्यांचा लवाजमा, यांचा थाटमाट फार विलक्षण असल्यामुळें ह्या भेटीला **सुवर्ण वस्त्रांची भूमि** ( The Field of the Cloth of Gold ) असें इंग्लंडच्या इतिहासांत म्हटलें आहे. (भा. क.)

तह करावयाचा. दुसरा, प्रतिवर्षीं ह्या सरकाराकडून ठराविक रक्कम नजराणा म्हणून मिळवावयाची. तिसरा, हत्यारांची व सैन्याची मदत मिळवावयाची. ही मदत देणें ब्रिटिश सरकारला योग्य वाटेल तेव्हां त्यांनीं द्याव-याची नाहीं; तर अशा मदतीची शेरअल्ली यांस जरूर वाटून त्यांनीं विनंती केली कीं द्यावयाची. चौथा हेतु असा कीं, ब्रिटिश सरकारशीं एक स्पष्ट रीतीचा ठराव करावयाचा; व ह्या ठरावान्वयें कोणत्याही निकडीच्या प्रसंगीं अफगाण सरकारला मदत करणें ब्रिटिश सरकारला भाग पडावयाचें; "अशी मदत अफगाणिस्तानच्या गादीवर कोणीही असला तरी त्यास सामान्यत्वें कराव-याची असें नाहीं; तर आपण स्वतः किंवा आपले प्रत्यक्ष वंशज तेथें गादीवर असतील तरच त्यांना मदत करा-वयाची; इतरांस* करावयाची नाहीं." त्यांचा शेवटचा म्हणजे पांचवा हेतु असा होता कीं, आपला धाकटा मुलगा जो अबदुल्ला जान ह्याला आपल्यामागें गादीचा वारस ब्रिटिश सरकारनें कबूल करावें; मग अशी कबुली त्यांनीं प्रत्यक्ष दर्शविली नाहीं तरी चालेल; ती त्यांज-कडून ध्वनित मात्र व्हावी. ह्या मुलाला त्यांनीं हिंदुस्ता-नांत बरोबर आणिलें होतें; व आपला वडील मुलगा जो याकुबखान ह्याचा हक्क दूर करून ह्या धाकट्या मुलाला आपला वारसदार ठरविण्याची त्यांची इच्छा होती. त्या

---

१ सर जॉन स्ट्राची, जी. सी. एस्. आय्., हे कांहीं मुदत ऍ-क्टिंग ग. ज. असतां ता. ३० एप्रिल १८७२ त त्यांनीं कौन्सिल-चा अभिप्राय लिहून ठेविलेला आहे तो पहा.

वडील मुलानें त्यांना गादी मिळविण्याच्या कामीं मदतही दिली होती.

अमिरांच्या ह्या पांच हेतूंपैकीं एकही सफल झाला नाहीं. पहिल्या चार मागण्यांना साफ नकार मिळाला. पांचव्या मागणीचा तर ज्या विषयांची चर्चा व्हावयाची त्यांत समावेशही करण्याची परवानगी नव्हती; असा हंटर साहेबांचा समज आहे. दरबारची कार्यक्रम-पत्रिका लॉर्ड मेयो यांनीं कलकत्त्याहून निघण्यापूर्वींच मुद्दाम लेखी तयार करून आणिली होती; तिच्या बाहेर ते गेले नाहींत. तथापि त्यांनीं युक्तीनें आपला निश्चय ढळूं न देतां व अमिरांचें मन न दुखवितां त्यांना संतुष्ट करून स्वदेशीं परत लाविलें; व ब्रिटिश सरकारशीं स्नेह-भावानें वागण्यांत फायदा आहे असा त्यांच्या मनाचा पक्का ग्रह केला. ह्या संबंधानें ते लिहितातः—“ आम्हीं अमिरांना स्पष्टपणें कळविलें आहे कीं, तुमच्या बंडखोर प्रजेला सक्तीनें ताळ्यावर आणण्याच्या कामीं तुम्हांस मदत करण्यासाठीं एकही ब्रिटिश शिपाई कसाही प्रसंग आला तरी तुमची सरहद्द ओलांडून येणार नाहीं. तुह्मांस ठराविक नजराणा किंवा पैशाची मदत तुम्ही दर्शवाल तितकी मुदत मिळावयाची नाहीं. इतर प्रकारांनीं मदत करण्याविषयीं अभिवचन दिलें जाणार नाहीं. कशीही वस्तुस्थिति असली तरी तुम्हांला व तुमच्या वंशजांना अफगाणिस्तानचे राजे आम्हीं मानिलेंच पाहिजे; अशा प्रकारचा तह आम्ही करणार नाहीं. तथापि हल्लींच्या प्रसंगीं तुम्ही अमीर आहां, ही गोष्ट अगदीं उघडपणें व पूर्णपणें

कबूल करून, व तुम्हांशीं स्नेहभाव ठेवावयाचा आमचा इरादा असल्याबद्दल हरएक सार्वजनिक रीतीनें व्यक्त करून,— म्हणजे तुमच्या वर्तनाबद्दल आमची संमानबुद्धि दर्शवून व तुमची भरभराट होण्यांत आमचें हितच आहे असें दर्शवून—आम्हीं त्यांना कळविलें आहे कीं, जेव्हां जेव्हां आम्हांस योग्य वाटेल, तेव्हां तेव्हां द्रव्यद्वारें मदत देण्यास व हत्यारें, दारूगोळा, एतद्देशीय कारागीर मंडळी यांचा पुरवठा करून अन्य रीतीनेंही मदत देण्यास आम्ही तयार आहों. ”

अमिरांच्या मूळच्या मागण्या फार होत्या; त्यांशीं ताडून पाहिलें असतां त्यांना प्रत्यक्ष फलप्राप्ति फारच थोडी झाली. तथापि ह्याहून जास्त मागण्या कबूल करणें लॉर्ड मेयो यांस उपयुक्त दिसलें नाहीं; व ह्या मागण्याही त्यांनीं अशा रीतीनें मान्य केल्या कीं, तेणेंकरून अमीर हे त्यांच्या एकंदर कारकीर्दींत ब्रिटिश सरकारचे पक्के दोस्त बनून ह्या सरकारासंबंधानें त्यांच्या मनांत कृतज्ञताबुद्धि उत्पन्न झाली.

काबुलास परत गेल्यावर अमिरांनीं इंग्रज सरकारच्या धर्तीवर सुधारणा इतक्या त्वरित सुरू केल्या कीं त्याची मौज वाटते. रात्रींच्या १० पासून पहांटेस ४ पर्यंत आपल्या सैन्याला व प्रजेला हत्यारें वापरण्याची त्यांनीं मनाई केली. रात्रीं गस्त घालण्यास पहारेकरी नेमिले, व शहरच्या लोकांच्या अर्जांचा विचार करण्यासाठीं एक न्यायाधीश नेमिला. त्यांनीं पोष्ट ऑफिसें स्थापिलीं. सरकारी कामगारांना जमिनी किंवा वसुलाचे भाग देण्या-

ची जुनी पद्धति होती, तिच्याऐवजीं रोख पगार देण्याची पद्धति सुरू केली. काबूल एथील चांभारांना आपला सर्व जुना माल विकून टाकून इंग्रजी नमुन्याचे बूट बनविण्याची त्यांनीं आज्ञा केली! इंग्रजी तऱ्हेचे कोट पाटलोण ते स्वतः घालूं लागले, व आपल्या कामगारांनाही तसें करण्याविषयीं त्यांनीं फर्माविलें! राज्यकारभारासाठीं त्यांनीं तेरा सभासदांचें एक मंत्रिमंडळ बनविलें. राज्यकारभाराच्या सर्व खात्यांतील कामकाजासंबंधानें अमिरांना सल्लामसलत देणारी ही कायदेशीर मंडळी होय. विशेष भयंकर प्रकारच्या शिक्षा त्यांनीं बंद केल्या; व फार दिवसांच्या अनेक शत्रूंना माफी दिली. सारांश, चांगली राज्यव्यवस्था स्थापून आपल्या प्रजेचा विश्वास संपादण्यासाठीं त्यांना स्वतः करितां येण्यासारखें होतें तितकें सर्व त्यांनीं केलें. तथापि एकदम सुरू केलेल्या सुधारणा प्रायः अल्पकाळ टिकणाऱ्याच असतात. ह्या सर्व सुधारणांत अत्यंत फायदेशीर ह्मटली ह्मणजे सरकारी कामगारांना वसुलाचे भाग तोडून न देतां त्याऐवजीं रोख पगार देणें, ही होय. तथापि अफगाणिस्तानांतील मोठमोठ्या सरदारांपासून खालपर्यंत सर्व मंडळी ह्या सुधारणेच्या इतकी कांहीं विरुद्ध होती कीं, ही सुधारणा प्रत्यक्ष कधींच सुरू झाल्याचें ऐकिवांत नाहीं.

अंबाला येथील दरबारानंतर लवकरच लॉर्ड मेयो यांनीं असें लिहिलें आहेः—"इतर कोणत्याही राष्ट्राशीं सख्य ठेवण्यापेक्षां आपल्याशीं सख्य ठेवण्यापासून ज्या संस्थानिकांना विशेष फायदा वाटेल, अशा प्रकारचीं

बलाढ्य, आपल्याशीं स्नेहभावानें वागणारीं व स्वतंत्र अशीं संस्थानें हिंदुस्तानच्या सर्व सरहद्दीभोंवतीं राहूं द्या; ह्मणजे आपणांस काडीमात्र भय नाहीं. " दुसऱ्या एका पत्रांत त्यांनीं असें लिहिलें आहे:—" अंबाला येथील दरबारामुळें आपल्या स्वतःच्या मुलखांत व मध्य एशियांतील इतर देशांतही आपली छाप विशेष बसली आहे. तसेंच, दुसऱ्याच्या कारभारांत हात न घालतां शांतता राखण्याकडे वस्तुतः आमचें राजधोरण आहे, व एशिया खंडांत इतरांची कुरापत न काढणारें सांप्रत इंग्लंड हें एकच राष्ट्र आहे; अशी आपणांस लोकांची समजूत घालितां येईल, तर आपली सत्ता इतकी शिखरास पोहोंचेल कीं, तशी आजपर्यंत कधींही पोहोंचली नसेल. "

ह्याप्रमाणें ब्रिटिश सरकारच्या राजधोरणांत अलीकडे झालेल्या फेरफारांचें खरें स्वरूप इमानेंइतबारें रशियन सरकारास कळवून त्यांजबरोबर सलोख्याचें दळणवळण सुरू करावयाचें; असा लॉर्ड मेयो यांचा पुढील हेतु होता. मध्य एशियांत रशियाची विलक्षण चळवळ आहे खरी, असें त्यांनीं कबूल केलें. परंतु ह्याबद्दल आपणांस भिण्याचें किंवा त्या सरकारास दूषण देण्याचें कारण नाहीं, असें ते समजत. तसेंच ह्या चळवळीवर मोठ्या सावधगिरीनें व निश्चयानें नजर ठेविल्यास हिजपासून आपणांस उपद्रव पोहोंचणार नाहींसें करितां येईल; असें ते समजत. इंग्लिश दरबारचें सरकारी रीतीनें रशियन दरबाराशीं दळणवळण चालावयाचें तें इंग्लंडांत परराष्ट्रसंबंधीं जें खातें आहे त्यामार्फत चालतें, हें ठीकच आहे. परंतु

रशियांतील सरकारी कामकाजांत कित्येक विशेष व्यक्तींचें प्रावल्य किती असतें, ह्याचें चांगलें ज्ञान लॉर्ड मेयो यांना झालेलें होतें. कारण त्यांनीं रशियांत प्रवास केला होता. तसेंच त्या प्रवासामुळें अनेक रशियन प्रधानांशीं त्यांचा अति स्नेह शेवटपर्यंत जडला होता. म्हणून त्यांना असें वाटलें कीं, एशिया खंडांतील राज्यकारभारांत प्रत्यक्ष पड-लेल्या मोठमोठ्या अधिकाऱ्यांनीं परस्परांचे विचार खाजगी नात्यानें परस्परांस कळविल्यास फायदा होईल; मात्र एणेंकरून ह्या दोन्ही दरबारांतील नेहमींच्या दळणवळणास व्यत्यय न आला म्हणजे झालें.

ह्यास्तव आपलें राजधोरण शांतता राखण्याकडे आहे अशाविषयीं रशियांतील प्रमुख सरकारी कामगारांना आश्वासन देऊन मध्य एशियासंबंधीं प्रकरणांचा त्यांजपाशीं मोकळ्या मनानें व मित्रत्वाच्या नात्यानें खुलासा करण्याचा अधिकार एकाद्या कामगारास देण्याचा विचार लॉर्ड मेयो यांनीं मनांत आणिला; मात्र ह्या विचारास राणीसरकारच्या प्रधान मंडळा-ची संमति मिळाल्यास तो अमलांत आणावयाचा. पुढें ह्याच संधीस बंगाल इलाख्यांतील मुलकी कामगारांपैकीं एक प्रसिद्ध कामगार इंग्लंडास रजेवर जात होते. ती संधि त्यांनीं साधिली; व त्यांनाच ह्या कामीं अधिकार दिला. ह्या कामगाराचें नांव मि. डग्लस फॉर्सिथ असून ह्यांना पुढें नाइटचा किताब मिळाला. हे १८६९ च्या ऑक्टोबर महिन्यांत सेंटपीटर्सबर्ग येथें पोहोंचले. नंतर ह्यांनीं व तेथील रशियन कामगारांनीं परस्परांचे विचार

परस्परांस खाजगी रीतीनें कळविलें. तेव्हां हिंदुस्तान-च्या सरहद्दीवरील मोठमोठ्या संस्थानांना आपलें स्वातंत्र्य उत्तम प्रकारें ठेवितां येईल, अशा स्थितींत तीं कायम राखणें; हाच उपाय मध्य एशियांत शांतता राखण्यास बे-मालूम आहे, असें जें लॉर्ड मेयो यांचें मत तें अखेरीस सर्वांस ग्राह्य झालें. तसेंच रशियाचे सरहद्दीसंबंधीं काम-गार आपल्या सरकारची परवानगी नसतां मध्येंच कुरा-पती काढीत; तेणेंकरून मध्य एशियांत सदा सर्वकाळ बखेडे सुरू असत. तेव्हां असा गोंधळ इतःपर उत्पन्न होऊं नये, अशाविषयींही मि. फॉर्सिथ यांनीं खटपट केली. येथें थोडक्यांत इतकें सांगितलें म्हणजे पुरें आहे कीं, लॉर्ड मेयो यांच्या व्हाइसरायच्या कारकीर्दींत ह्या खट-पटीचा चांगलाच उपयोग झाला.

रशियांतील युद्धसंबंधीं खात्याचे प्रधान व एशिया-संबंधीं खात्याचे प्रधान यांजबरोबर सर डग्लस फॉर्सिथ यांची मुलाखत झाली. तेव्हां असें ठरलें कीं, शेर-अल्ली यांच्या ताब्यांत त्या वेळीं जे एकंदर प्रांत होते, तेवढें अफगाणिस्तान आहे असें रशियन सरकारनें कबूल करून त्यांच्या राज्याची उत्तरमर्यादा ऑक्सस नदी मानावी; आणि आपल्या ताब्यांतील एशिया खंडांतील संस्थानांनीं परपस्परांच्या कुरापती काढूं नयेत, अशाविषयीं इंग्लंड व रशिया ह्या उभयतांनीं आपणां-कडून होईल तितकी खटपट करावी. मध्य एशियांतील शेरअल्ली यांच्या आसपासच्या राजांकडून घोटाळा उ-त्पन्न होऊं नये, म्हणून ह्या ठरलेल्या सरहद्दीबद्दल हमी

मिळविण्यास लॉर्ड मेयो यांनीं अगदीं विलंब लाविला नाहीं. तथापि बदकशान प्रांत अफगाणिस्तानांत सामील करण्यास १८७१ त रशियन सरकारनें विलक्षण हरकती आणिल्या. परंतु १८७२ त स्नेहभावानें बोलणें चालणें होऊन ह्या प्रश्नांचा निकाल लागला. १८७३ तील जान्युआरी महिन्यांत कौंट स्काव्हालॉफ हे रशियन मुत्सद्दी लंडन शहरीं आले. त्यांच्या येण्याचा हेतु असा कीं, हा तंट्याचा मुलूख अफगाणिस्तानचाच आहे, अशाविषयीं रशियाच्या बादशाहांची संमति समक्ष कळवावयाची. अफगाणिस्तानच्या मर्यादा पुढें लवकरच स्पष्ट रीतीनें ठरविण्यांत आल्यामुळें त्या देशाची सरहद्द ठाम झाली. परंतु साधारणपणें असें म्हणतां येईल कीं, लॉर्ड मेयो यांनीं १८६९ त अफगाणिस्तानांत जितका प्रदेश येतो असें ठरविलें, तितकाच मुलूख पुढें वीस वर्षेंपर्यंत वस्तुतः त्या देशांत मोडत होता.

ह्याप्रमाणें अफगाणिस्तानासंबंधीं प्रकरणांचा समाधानकारक रितीनें निकाल लाविल्यानंतर लॉर्ड मेयो यांनीं ह्या देशाच्या दक्षिणेकडील देशाकडे लक्ष दिलें. हा देश म्हणजे सिंधप्रांताच्या सरहद्दीपलीकडून इराण देशापर्यंत होय. ह्या प्रदेशाला बलुचिस्तान किंवा खिलात असें नांव देत; परंतु तें फारसें विचाराचें नव्हतें. त्यांना असें आढळून आलें कीं, बलुचिस्तान व ब्रिटिश सरकार यांच्या दरम्यान घोटाळे उत्पन्न झाले असून हे त्या देशांतील दोन प्रकारच्या अव्यवस्थेमुळें झाले आहेत; एक परदेशसंबंधीं व दुसरी देशांतील अव्यवस्था. पर-

देशसंबंधीं अव्यवस्था म्हणजे बलुचिस्तान व इराण ह्यां-मधील सरहद्दीसंबंधाची होय. ही सरहद्द नक्की कधींच ठरलेली नव्हती; व ह्या सरहद्दीच्या पायीं ह्या दोन्ही देशांमध्यें कैक वर्षें कुरापती सुरू असून त्यांच्या एक-मेकांवर स्वाऱ्या होऊन रक्तपात होत असत. देशांतील अव्यवस्था उत्पन्न होण्याचें कारण बलुचिस्तानचे खान अथवा राजे यांचा त्यांच्या सरदार मंडळीशीं संबंध कोणत्या प्रकारचा असावयाचा तें चांगलेंसें ठरलेलें नव्हतें; हें होय. खिलात एथील एका पक्षाच्या मतें, खान हे देशाचे सार्वभौम राजे होते; परंतु दुसऱ्या पक्षां-तील लोक म्हणत कीं, ते सरदारमंडळाचे फक्त प्रमुख होत. ह्या दोन्ही गोष्टींचा प्रत्यक्ष परिणाम असा झाला कीं, इराणच्या सरहद्दीवर निकराचीं युद्धें सुरू असत; व देशांतल्या देशांत वरील दोन पक्षांत—म्हणजे राज-पक्षांत व बडे लोकांच्या पक्षांत—तंटेबखेडे सुरू असत. ह्यामुळें बलुचिस्तानांत शांतता कशी ती नव्ह-तीच; व हिंदुस्तान शेजारींच असल्यामुळें ह्या देशाला केव्हां उपद्रव पोहोंचेल ह्याचा नियम नव्हता. देशांतील बंडें व देशाच्या सरहद्दीसंबंधीं भांडणें, ह्यामुळें देशावर प्रत्यक्ष सत्ता कोणाची, तसेंच ती सत्ता किती प्रदेशावर चालते, हें कळण्याची मारामार पडे. ह्यामुळेंच तेथील नामधारी राजाची सत्ता चांगल्या रीतीनें स्थापित करण्या-साठीं ब्रिटिश सरकारास उपाय योजण्यास जड गेलें.

बलुचिस्तानच्या ह्या आंतील व बाहेरील दोन्ही घो-टाळ्यांचा उलगडा लावण्याकडे लॉर्ड मेयो यांनीं मोठ्या

नेटानें लक्ष दिलें. यांच्या योजनेमुळें बलुचिस्तान व इराण ह्या दोन्ही राज्यांमधील सरहद्द कायम ठरली; ह्यामुळें इराणच्या बाजूनें त्या देशावर स्वाऱ्या वगैरे होण्याचें वस्तुतः अजी बंद झालें. तसेंच त्या देशांतील अनेक सरदार परस्परांशीं झगडत असत; ती स्थिति सुधारून देशांत कोणा एकाची मुख्य सत्ता पक्की व कायमची स्थापण्यांतही त्यांनीं तशीच तरतरी दाखविली. हें काम त्यांना अति जड गेलें. बलुचिस्तानांत मुख्य दोन पक्ष असून प्रत्येक पक्षांतील लोक जे हक्क सांगत असत, ते खरोखर साधार होते. तेथील सरदारमंडळी असें दाखवीत कीं, आपण खानांवर अनेक वेळां सत्ता चालविली आहे; व सार्वभौम राजाप्रमाणें त्यांना वर्तूं न देतां आमच्यांतील ते प्रमुख अशा रीतीनें त्यांस वागावयास लाविलें आहे. उलट पक्षीं, खानांनाही असें सिद्ध करितां येई कीं, आपल्या बंडखोर सरदारांपुढें जरी आपणांस वेळोवेळीं मान वांकवावी लागली आहे, तरी आपण आपली पराकाष्ठा केल्यावरच तसें केलें आहे; व नंतर जेव्हां जेव्हां आपल्या आंगीं अवश्य तेवढें सामर्थ्य आलें, तेव्हां तेव्हां आपण आपली सार्वभौम सत्ता चालविली आहे.

*प्लॅन्टॅजनेट घराण्यांतील राजे इंग्लंडच्या गादीवर असतां तेथील राज्यपद्धति केवळ राजसत्ताक होती, किंवा

---

* प्लॅन्टॅजनेट घराण्यांतील राजांनीं ११५४ पासून १३९९ अखेर इंग्लंडांत राज्य केलें. ह्या घराण्यांतील राजांकडे वस्तुतः पूर्ण राजसत्ता होती; परंतु त्यांचे सरदार प्रबळ असल्यामुळें त्या राजांवर त्यांचा मोठा दाब असे. ( भा. क. )

तींत सरदारमंडळाकडेही कांहीं सत्ता होती; ह्या संबंधानें इंग्लंडच्या इतिहासांत विलक्षण चर्चा झालेली आहे. त्या स्थितीशीं बलुचिस्तानच्या ह्या स्थितीचें सादृश्य आहे. शिवाय तेथील दोन्ही पक्षांतील लोकांकडून अलीकडे अलीकडे फार अनन्वित कृत्यें घडल्यामुळें तेथील राज्यपद्धतींत विशेषच घोटाळे उपस्थित झाले होते; व लॉर्ड मेयो मृत्यु पावले तेव्हां तेथील राज्यपद्धति उत्कृष्ट प्रकारच्या स्थितीस पोहोंचली नसून, तें कृत्य पुढेंच व्हावयाचें होतें. तथापि आपल्या खटपटीमुळें तेथील दुर्दैवी प्रजेला आजपर्यंत कधीं न अनुभविलेला असा शांततेचा काळ प्राप्त झाला; त्या देशासंबंधीं एकंदर प्रश्नांचा कायमचा उलगडा लागेल, असा चांगला सुमार दिसूं लागला; व इतका प्रकार त्यांच्या हयातींत घडून आला. तसेंच यांच्या आकस्मिक मृत्यूपूर्वींच तेथील खान व भिन्न भिन्न जातींचे सरदार ह्यांत मध्यस्थी करण्यासाठीं एका मोठ्या ब्रिटिश कामगाराची नेमणूकही त्यांनीं केली असल्यामुळें त्यांना तेवढें समाधान होतें.

हिंदुस्तानच्या थेट उत्तरेस काश्मीर व हिमालय पर्वत यांच्या पलीकडच्या आणखी एका संस्थानाकडे लॉर्ड मेयो यांना लक्ष देणें भागच पडलें. हें संस्थान म्हणजे पूर्व तार्तरी, चीनच्या साम्राज्यांतील होय. ह्या सुमारास कांहीं अंशीं धर्मसंबंधामुळें व कांहीं अंशीं राजकीय संबंधामुळें पुनः पुनः बावटळी उपस्थित होत असत. ह्यामुळें त्या साम्राज्याचे तुकडे तुकडे होण्याची भीति दिसत होती. अशा प्रकारच्या एका बावटळीमुळेंच ह्या संस्थानची

मूळ स्थापना झाली. अशा प्रकारची चळवळ करून पठाण लोकांनीं चीनच्या नैर्ऋत्य दिशेस एका स्वतंत्र मुसलमानी राज्याची स्थापना करून अशा चळवळीं-पासून फायदा होतो, हें निदर्शनास आणून दिलें. म्हणून चीनच्या साम्राज्याच्या थेट वायव्य सरहद्दीवरील गोबीच्या मैदानांतील चीनच्या अमलांतील मुसलमानांनीं त्या पठा-णांचें अनुकरण केलें; व अखेरीस आपल्या चळवळीला जें बंडाचें स्वरूप होतें तें बदलून तिला धर्मयुद्धाचें वैभव आणिलें. त्यांनीं त्या प्रदेशांतील चीनच्या अधिकाऱ्यांना हांकून लावून त्यांच्या पक्षाच्या सर्व लोकांची कत्तल उडविली. अखेरीस १८६४ त पूर्व तार्तरी हा प्रदेश ह्या नवीन मुसलमानी सत्तेखालीं आला. ह्या मुसलमानी सत्ता-धिकाऱ्यांतही अनेक पंथांचें मिश्रण होतें. ह्यामुळें ह्या विजयी मुसलमानी अधिकाऱ्यांतही पुढें झोंबाझोंबी होऊन अखेरीस १८६९ त याकूब कुशबेग ह्या नांवाचा एक दैवशाली शूर योद्धा ह्या अफाट प्रदेशाचा राजा झाला. हा प्रदेश पामिरस्टेपपासून पूर्वेकडील चीन देशाच्या सरहद्दीपर्यंत, व दक्षिणेस ब्रिटिश सरकारच्या छत्राखालीं असलेल्या काश्मिर संस्थानापासून शान व मूझार्ट ओळीं-तील रशियन सरकारच्या बाह्य ठाण्यांपर्यंत पसर-लेला होता.

पूर्व तार्तरीच्या ह्या नवीन राजाकडून १८७० च्या जान्युआरी महिन्यांत हिंदुस्तानांत एक वकील आला; व आपल्या यजमानांच्या भेटीस स्नेहभावानें कोणा ब्रिटिश कामगारास आपल्याबरोबर पाठविण्याविषयीं त्यानें हिंदु-

स्तान सरकारास विनंती केली. लॉर्ड मेयो यांनीं मि. डग्लस फॉर्सिथ यांस पाठविण्याचें कबूल केलें. मात्र त्यांनीं एक अट निक्षून ठरविली. ती ही कीं, मि. फॉर्सिथ हे वकील ह्या नात्यानें मुळींच यावयाचे नाहींत; किंवा त्यांच्या भेटींत राजकीय हेतु असावयाचा नाहीं.

तेथील कोणत्याही प्रकारच्या राजकीय विषयांत किंवा देशांतील तट्याबखेड्यांत मि. फॉर्सिथ यांना हात घालण्याची परवानगी नव्हती. तथापि लॉर्ड मेयो यांनीं याकूब यांच्या वकिलास साधारण उपदेशाच्या गोष्टी आधीं सांगितल्याच होत्या. त्या पुनः सांगण्याची मात्र त्यांना परवानगी होती. लॉर्ड मेयो यांनीं केलेला उपदेश असा:—आपल्या संस्थानचें हित करण्याचा याकूब यांना उत्तम उपाय म्हटला म्हणजे त्यांनीं राज्यकारभार दक्षतेनें, न्यायानें व नेटानें चालवावा; आपल्या सरहद्दीच्या संरक्षणार्थ विशेष उपाय योजावे; व मुख्यत्वेंकरून इतर देशांतील राजकीय प्रकरणांत, अथवा ज्या सरदारांच्या किंवा जातीजातींच्या भांडणांचा आपल्या स्वतःच्या हिताहिताशीं साक्षात् संबंध नाहीं, त्यांत ढवळाढवळ करूं नये. मि. फॉर्सिथ यांना त्या देशांत नियमित मुदतच रहावयाची परवानगी होती. कारण जास्त मुदत राहिल्यास हिमालयांतील खिंडींतून हिवाळ्यांत बर्फ पडण्याची भीति होती, व तसें झाल्यास त्यांना यार्कंद येथें पुढील वर्षापर्यंत रहावें लागलें असतें. त्यांना पुढील गोष्टींसंबंधानें पुरी व खात्रीलायक माहिती मिळवावयाची होती:—पूर्व तार्तरी व त्याच्या आसपासचे देश ह्यांची स्वाभाविक

रचना व त्यांची सांपत्तिक स्थिति; त्यांचा अलीकडील इतिहास; त्यांची सांप्रतची राजकीय स्थिति; व्यापारवृद्धीसंबधानें त्यांची योग्यता; हिंदुस्तानांतील व्यापाराच्या कोणत्या जिनसांचा तेथें विशेष खप आहे त्याची माहिती; त्या जिनसांची यार्कंद येथील बाजारांत येणारी किंमत; आणि ह्या जिनसांच्या मोबदला हिंदुस्तानांत यार्कंदहून कोणते जिन्नस आणण्यांत विशेष फायदा होऊं शकेल ते जिन्नस.

मि. फॉर्सिथ हे यार्कंद प्रांतांत आले; तेव्हां त्यांना आढळून आलें कीं, याकूब बेग यांना आपली सत्ता आपल्या राज्यांत अद्यापि पूर्णपणें स्थापितां आलेली नाहीं. कोणत्याही राजकीय विषयाच्या चर्चेंत न पडण्याविषयीं त्यांनीं फार सावधगिरी ठेविली; व पूर्व तार्तरीच्या दक्षिण भागाची राजधानी जें यार्कंद तेथें थोडे दिवस मुक्काम करून ते हिंदुस्तानास परत आले. ह्या मुदतींत त्यांना आपल्या बरोबरच्या लष्करासाठीं सामुग्रीचा व ओझीं वाहणाऱ्या जनावरांचा पुनः पुरवठा करून घ्यावयाचा होता. हिमालय पर्वतांतून जाण्यायेण्याचे अति सुलभ मार्ग; त्या देशाची औद्योगिक व सांपत्तिक स्थिति; त्याचा अलीकडील इतिहास व तेथील राजाची खरी योग्यता; ह्यासंबधानें ते पुरी माहिती करून घेऊन आले. त्या देशांत पाऊल ठेविल्यापासून तेथून परत येईपर्यंत त्यांनीं तेथील राजाच्या स्पष्टपणें ध्यानांत आणून दिलें कीं, आपल्या परिवारासह त्या देशीं येण्याचा आपला हेतु निखालस इकडील अनुभव घेऊन व्यापारासंबंधीं माहिती मिळविण्यापुरताच होता.

लॉर्ड मेयो यांनीं काश्मीर संस्थानाशीं तह करून चांगचीन दरींतून व्यापाराचा एक स्वतंत्र मार्ग सुरू केला; व अशा रीतीनें हिमालय पर्वतापलीकडचा हिंदुस्तानचा व्यापार विशेष बिनधास्त चालेसें केलें. वस्तुतः पूर्व तार्तरी संबंधाच्या त्यांच्या राजधोरणाचाच हा एक भाग होता. मध्य एशियांतील उंचवट्याच्या बर्फमय प्रदेशांतून माल नेण्याआणण्याचा खर्च ज्या व्यापारी जिनसांवर भागतो, त्यांचे आंकडे देऊन त्यांची तुलना समुद्रावरून चालणाऱ्या हिंदुस्तानच्या अफाट आयात व निर्गत व्यापाराच्या आंकड्यांशीं केली असतां हा व्यापार कधींच मोठासा वाटणार नाहीं. तथापि समुद्रकिनाऱ्यापासून बऱ्याच अंतरावर असणाऱ्या पंजाब प्रांतांतील कित्येक वर्गांतील लोकांस ह्यापासून अति किफायत होत आहे. ह्या पंजाब प्रांतांतील लोक मोठे लढवय्ये आहेत; व त्यांच्या सांपत्तिक आणि व्यापारसंबंधीं स्थितींत सुधारणा करण्याचे हरएक उपाय योजून शांततेनें आपापला उद्योगधंदा करण्याची त्यांस सवय व्हावी; ह्मणून ब्रिटिश सरकारचा प्रयत्न सुरू होता.

अरबी समुद्राला लागून असलेल्या बलुचिस्तानापासून अफगाणिस्तानाला वळसा घालून पूर्व तार्तरीपर्यंतच्या आपल्या पश्चिम व उत्तर सरहद्दीवर आपल्याशीं स्नेहभावानें वागणाऱ्या व जेथील राज्यकारभार उत्तम प्रकारें चालत आहे अशा संस्थानांची एक रांग लावून देण्याचा लॉर्ड मेयो यांचा कृतसंकल्प होता. तो तडीस नेण्यासाठीं त्यांनीं योजिलेल्या उपायांचें वर्णन येथवर

झालें. ब्रिटिश साम्राज्याच्या ईशान्य व आग्नेय सरहद्दी-वरील संस्थानिकांशीं ह्यांचें वर्तन वरच्या धोरणाचेंच होतें. नेपाळच्या राजाशीं त्यांचें वर्तन निश्चयाचें, स्नेह-भावाचें व प्रौढपणाचें असे. त्या संस्थानाशीं ब्रिटिश सर-कारचें दळणवळण उत्तम प्रकारें चालत असल्याचें त्यांस आढळून आलें; व तें ह्यांनीं विशेष दृढ केलें. लुशाय प्रांतावर स्वारी करून बंगालच्या ईशान्येस तर ह्यांनींच प्रथमतः सरहद्द ठरविली, असें ह्मणण्यास हरकत नाहीं. तसेंच ह्या स्वारीमुळें त्या प्रदेशांतील फार दिवसांची बंडाळी मोडून तेथें स्वस्थता व शांतता सुरू झाली. ह्याच्याही खालीं दक्षिणेकडे ब्रह्मदेशांतही यांचा उद्योग कांहीं कमी सुरू नव्हता. तेथील राजाचा कल इंग्रज सर-कारशीं कुरापत काढण्याकडे असल्यामुळें त्याला तसें न करूं देण्याविषयीं ह्यांचे प्रयत्न सुरू होते; त्या देशाशीं व्यापारसंबंधीं दळणवळण वाढवीत होते; व ब्रिटिश सर-कारच्या सत्तेला मान मिळावा ह्मणून त्यांचा प्रयत्न सुरू होता. तथापि परराष्ट्रसंबंधी राजधोरणासंबंधानें ह्यांना विलक्षण त्रास पडला तो पश्चिम व वायव्य सरहद्दींसंबं-धानें होय; व त्या संबंधाचें विवेचन इतकें विस्तृत झालें आहे कीं, ह्या विषयासंबंधीं किरकोळ गोष्टींकडे न वळतां हें प्रकरण येथें संपविलें पाहिजे.

# प्रकरण सहावें.

## लॉर्ड मेयो यांच्या जमाबंदीसंबंधीं सुधारणा.

[ जमाबंदीच्या पद्धतीसंबंधीं हकीगतीचीं दोन अंगें.--ह्यांच्या कारकीर्दीच्या आरंभींची स्थिति.-त्यांच्या पूर्वींच्या पांचपन्नास वर्षांतील जमाखर्चाची स्थिति.-जमाखर्चांतील तुटीशिवाय असमाधान उत्पन्न करणारें दुसरें कारण.-ह्यासंबंधानें त्यांजवर पडलेलीं तीन कामें.-त्यांच्या जमाखर्चासंबंधीं कारभाराचें कोष्टक.--शिलक पडलेलीं वर्षें.-१८६८-६९ सालच्या बजेटाचा प्रत्यक्ष अनुभव.--१८६९-७० च्या अंदाजपत्रकांची प्रत्यक्ष स्थिति.--जमाखर्चाचा नक्की अंदाज करितां येण्यास अडचणी.--जमाखर्चांत येणारी तूट भरून काढण्याविषयीं त्यांचे विचार.--ही स्थिति सुधारण्यासाठीं त्यांचे दोन उपाय.--तूट भरून काढण्यासाठीं त्यांनीं केलेली काटकसर.-वर्ष खलास होण्यापूर्वींच नवीन कर बसविण्याचा विचार.--त्यांच्या उपायांमुळें वाढलेलें उत्पन्न.--आपल्या विचारासंबंधानें त्यांचें स्टेट सेक्रेटरींस पत्र.--त्यांच्या उपायांवर कित्येक आक्षेप.--त्यांच्या सुधारणांचीं तीन अंगें.--पहिलें अंगः-वरिष्ठसरकारच्या जमाखर्चासंबंधीं खात्यांतील व्यंगें.--जमाखर्चाच्या आंकड्यांचें वरिष्ठ सरकारांकडून योग्य परिशीलन होण्याची आवश्यकता.--महिन्यामहिन्याच्या जमाखर्चाच्या स्थितीची माहिती मिळविण्यासंबंधानें मि. चापमन् यांचें मत.--दुसरें अंगः-स्थानिक सरकारांच्या कारभारांत काटकसर.--जुन्या पद्धतींतील दोष.--स्थानिक सरकारांवर जमाखर्चासंबंधीं त्यांनीं टाकिलेली जबाबदारी.-त्यांना तोडून दिलेलीं कामें.--जुन्या पद्धतीसंबंधानें सर जॉन स्ट्राचे यांचा अभिप्राय.-तिजवर जनरल स्ट्राचे यांचे आक्षेप.--तिसरें अंगः-जमेंत व खर्चांत कायमचा मेळ.--त्यांच्या खटपटीचा परिणाम.--त्यांच्या मुदतींतील जमाखर्चाचें कोष्टक.--त्यांच्या तजविजींसंबंधानें जमाखर्च खात्याच्या सेक्रेटरींचा अभिप्राय. ]

लॉर्ड मेयो हे व्हाइसराय असतां त्यांच्या कारकीर्दींतील जमाखर्चाच्या इतिहासाचे दोन भाग पडतात. जमाखर्चांत पडलेली तूट भरून काढण्यासाठीं आपल्या कारकीर्दीच्या आरंभींच त्यांना मोठ्या निग्रहानें वागावें लागलें; त्याची हकीगत पहिल्या भागांत येते. ह्या आरंभींच्या आणीबाणीच्या प्रसंगाचें निवारण केल्यानंतर जमाखर्चाच्या पद्धतींतील कित्येक मोठमोठे दोष काढून टाकण्यासाठीं व हिंदुस्तानच्या जमेची व खर्चाची नेहमीं तोंडमिळवणी होईल अशी व्यवस्था करण्यासाठीं त्यांनीं जे उपाय योजिले, त्यांची हकीगत दुसऱ्या भागांत येते.

लॉर्ड मेयो यांनीं हिंदुस्तानचा राज्यकारभार हातीं घेतला, त्या वेळची जमाखर्चाची स्थिति अशी होती. एक शतकपर्यंत अनेक युद्धांतून जय मिळवून व एकामागून एक प्रांत खालसा करून ह्या हिंदुस्तानांतील ब्रिटिश राज्याची स्थापना झाली होती. युरोप खंडांतून रशियाचें राज्य गाळिलें असतां बाकीच्या युरोप खंडाइतका बहुतेक ह्याचा विस्तार होता. तसेंच खुद्द ब्रिटिश अमलांतील मुलखाची लोकसंख्या जवळ जवळ २० कोटि असून मांडलिक राजांच्या ताब्यांतील मुलखाची ५ कोटि होती. हें एवढें साम्राज्य स्थापित करण्याकडे १८६९—७० सालपर्यंत सुमारें १० कोटि २० लक्ष राष्ट्रीय कर्ज झालें होतें; शिवाय सरकारनें हमी घेतलेल्या रेलवे व इतर सार्वजनिक द्रव्योत्पादक कामें, ह्यांजबद्दल सुमारें १३६॥ कोटि रुपये कर्ज झालें होतें तें निराळें. हिंदुस्तानांत

ब्रिटिश सत्ता स्थापन करण्याकडे सुमारें ७८ कोटि रुपये व १८५७ सालच्या बंडानंतर मुलूख पुनः जिंकून ह्या साम्राज्याची पुनः जुळवाजुळव करण्याकडे सुमारें ७५ कोटि रुपये मिळून एकंदर राष्ट्रीय कर्ज सुमारें १५३ कोटि रुपये होय. तथापि केवळ युद्धें करून प्रांत काबीज करण्याकडेच कांहीं इतका खर्च झालेला नाहीं. कारण सुधारलेल्या राज्यपद्धतीची एकंदर उभारणी इंग्लिशांना ह्या देशांत करावयाची होती. अशा पद्धतीचें मुख्य अंग म्हटलें म्हणजे, त्यांत सडका, सरकारी कचेऱ्या, बराकी, न्यायाच्या कचेऱ्या, तुरुंग, शाळा, दवाखाने, ह्यांचा समावेश होतो; व जमाखर्चांत वरचेवर तूट पडत गेल्याचा उल्लेख पुढें लवकरच येणार आहे, त्याच्या कारणाचा थोडा फार उलगडा वरील कृत्यांकडे झालेल्या अतोनात खर्चामुळें होणारा आहे. इतर सुमारें १३६॥ कोटि रुपये कर्ज राहिलें; तें त्या वेळापर्यंत सुरू झालेल्या ४२६५ मैल रेलवेमुळें व मोठमोठ्या प्रदेशांतून पडणाऱ्या दुष्काळांचें निवारण होण्यास्तव बांधिलेल्या *पाटबंधाऱ्यांमुळें झालें होतें. हीं दोन्ही कर्जें

* १८८९ सालच्या पार्लमेंटसंबंधी २३ नंबरच्या उताऱ्यांतील पृष्ठ ३०० मधून हे आंकडे घेतले आहेत; अशासाठीं कीं, वाचकांना हे चटकन पाहतां यावे. परंतु ह्यापुढील तपशील विशेष तपशिलवार असून त्यांतील रकमांचा अंदाज अगदीं जवळ जवळ यावा म्हणून त्या वेळीं रुपयाची असलेली किंमत १ शिलिंग १० पेन्स ही हिशेबांत धरून आंकडे दिले आहेत. मात्र सरकारी कागदपत्रांतून घेतलेल्या प्रत्यक्ष उताऱ्यांत असा फेरफार केलेला नाहीं. पार्ले-

मिळून १९ कोटि ३० लक्ष पौंड होतात. लॉर्ड मेयो यांच्या कारकीर्दीचें पहिलें वर्ष १८६९–७० साल होय; व ह्या सालापर्यंत ब्रिटिश हिंदुस्तानांत असलेला मुलूख जिंकून तेथें राज्याची स्थापना करण्याकडे व तेथील राज्यव्यवस्था जुळविण्याकडे हें १९ कोटि ३० लक्ष पौंड कर्ज होय. राष्ट्राचा वसूल ५० कोटि ९० लक्ष रुपये असून त्या वेळीं त्यांची पौंडांत किंमत ४ कोटि ६० लक्ष होती. ह्यांतील ३ कोटि ३५ लक्ष पौंड लोकांकडून कराच्या रूपानें उत्पन्न होत, म्हणजे दर माणशीं सुमारें ३ शिलिंग ४ पेन्स पडे; व १ कोटि २५ लक्ष पौंड अफू, सार्वजनिक कामें वगैरेपासून उत्पन्न होत; व त्यांचा समावेश हिंदुस्तानच्या प्रत्यक्ष करामध्यें होण्याजोगा नसे.*

ब्रिटिश हिंदुस्तानला असलेलें राष्ट्रीय कर्ज व एथील लोकांवर पडणारा कराचा बोजा, ह्या दोन्ही आंकड्यांचा विचार केला असतां पृथ्वीच्या पाठीवरील प्रायः कोणत्याही देशाशीं तुलना केली असतां ह्या देशाच्या जमाखर्चाची स्थिति समाधानकारक दिसणार आहे. परंतु

---

मेंटासंबंधीं कित्येक सरकारी पुस्तकांतील आंकड्यांशीं ह्या पुस्तकांतील आंकड्यांचा मेळ कोठें कोठें दिसणार नाहीं. त्याचें साधारणतः कारण एवढेंच कीं, सरकारी पुस्तकांतून रुपयाची नांवाची किंमत जी दोन शिलिंग ती धरलेली असते.

* ह्यासंबंधीं विशेष खुलासेवार हकीगत हंटर साहेबांनींच लॉर्ड मेयो यांचें मोठें चरित्र लिहिलें आहे त्यांत सांपडेल. ( १८७६ तील दुसरी आवृत्ति, पुस्तक दुसरें, पृष्ठ ६९ पहा. )

ह्याचें विशेष सूक्ष्म रीतीनें मनन केलें असतां निराळेंच स्वरूप व्यक्त होतें. हिंदुस्तानांतील रहिवाश्यांवर कराचा बोजा फार हलका दिसत होता खरा; परंतु राज्यकारभार उत्कृष्ट प्रकारचा ठेवितां येण्यास जितका जास्त वसूल अवश्य होता, तितका उत्पन्न होण्यापुरता कराचा बोजा वाढविणें अशक्य झालें होतें. हिंदुस्तानसंबंधी मोठमोठ्या अनेक इंग्रज अधिकाऱ्यांच्या मतें कराचा बोजा वाढविणें धोक्याचें होतें. लॉर्ड मेयो हे येण्यापूर्वींच्या पन्नास वर्षांत हिंदुस्तानच्या जमाखर्चांत वरचेवर तूट पडत होती. १८१४-१५ पासून १८६८-६९अखेर ५५ वर्षें भरतात. ह्या मुदतींत १६ वर्षें शिलक पडलीं असून ३९ वर्षें तूट पडली आहे. शिलकेची एकंदर बेरीज सुमारें १ कोटि २५ लक्ष पौंड असून तुटींची बेरीज ७ कोटि ५५ लक्ष पौंडांहून अधिक आहे. लॉर्ड मेयो हे आले त्याच्या पूर्वींच्याच कित्येक वर्षांचा विचार केला असतां तर मन विशेषच खचून जातें. १८६६पासून १८६९ पर्यंतच्या ह्यांच्या पूर्वींच्या तीन वर्षांत ५७½ लक्ष पौंड एकंदर तूट पडली होती. राज्यकारभाराच्या केवळ **साधारण** खर्चामुळें पडलेली ही तूट होय. ज्यांपासून पुढें द्रव्योत्पादन व्हावयाचें, अशा रेलवे, कालवे वगैरे कामांकडे केलेला खर्च **असाधारण** होय. तो वरील तुटींत मिळविला असतां लॉर्ड मेयो यांच्या कारकीर्दींतील पहिल्या बजेटापूर्वींच्या

तीन वर्षांत हिंदुस्तानच्या एकंदर जमेपेक्षां खर्चाची रक्कम १ कोटि १० लक्ष पौंडांनीं अधिक होती. ह्याप्रमाणें कैक वर्षं वसुलामध्यें खर्च भागत नसे. ह्याशिवायही मनाला उद्विग्नता उत्पन्न करणारें आणखी एक कारण होतें, त्या वेळच्या पद्धतीला अनुसरून जितकी काळजी घेतां येईल तितकी घेऊन तेव्हांचीं जमाखर्चाचीं अंदाजपत्रकें तयार करण्यांत येत. तथापि अखेरीस त्यांत नेहमीं तफावत पडे. १८६७–६९ पर्यंतच्या दोन वर्षांत जमाखर्चाच्या अंदजपत्रकांत एकंदर ३५ लक्ष पौंडांची शिलक दाखविली होती; परंतु प्रत्यक्ष परिणाम असा झाला कीं, दोन वर्षें मिळून जवळ जवळ ३५ लक्षांची तूट आली. ह्यास्तव कैक वर्षं पडत चाललेल्या तुटीचाच विचार लॉर्ड मेयो यांस करावयाचा नव्हता; तर आपल्या कारकीर्दीच्या पूर्वींच्या दोन वर्षांत ३५ लक्ष पौंड शिलक पडावयाची ती न पडतां उलट ३५ लक्षांची तूट पडली; ह्मणजे एकंदरीनें ७० लक्षांची चूक अंदाजपत्रकांत पडली. तेव्हां एवढी चूक ज्या जमाखर्चाच्या पद्धतीमुळें पडली, तिचाही विचार त्यांना कर्तव्य होता.

ह्यास्तव जमाखर्चासंबंधीं तीन कामें आपल्या शिरावर पडलीं आहेत, असें लॉर्ड मेयो यांना आढळून आलें. पहिलें हें कीं, अगदीं अलीकडची तूट भरून काढणें:— ह्मणजे ह्यांच्या कारकीर्दीच्या मागल्याच वर्षीं पडलेली

२५ लक्षांची तूट भरून काढणें. दुसरें काम ह्मणजे, ज्या जमाखर्चाच्या पद्धतीच्या योगानें प्रतिवर्षीं तयार केलेलीं अंदाजपत्रकें अखेरीस खोटीं ठरतात, त्या एकंदर पद्धतींत सुधारणा करणें. तिसरें काम ह्मणजे, राज्यकारभारांत अवश्य तितकी काटकसर करण्यासाठीं उपाय योजून ते अमलांत आणावयाचे; अशासाठीं कीं इतःपर देशाच्या जमाखर्चाची पद्धति निर्दोष पायावर उभारतां यावी. हें काम सिद्धीस नेण्यांत त्यांनीं मनाचा केवढा निग्रह दाखविला, हें पुढील वर्णनावरून समजून येईल. ह्या कामीं त्यांना पडलेल्या अतोनात श्रमाचें कधीं विस्मरण व्हावयाचें नाहीं. परंतु ही हकीगत सांगण्यापूर्वीं त्यांच्या खटपटीमुळें अखेरीस परिणाम घडून आले ते थोडक्यांत सांगण्यास हरकत नाहीं. हे परिणाम हिंदुस्तानला किती महत्त्वाचे होते, तें पुढील कोष्टकावरून जितकें स्पष्ट रीतीनें ध्यानांत येईल, तितकें शब्दांनीं कधीं व्यक्त व्हावयाचें नाहीं. लॉर्ड मेयो यांच्या पूर्वींच्या तीन वर्षांत फक्त साधारण खर्चामुळेंच ५७½ लक्ष पौंडांची तूट आलेली होती. परंतु आपल्या कारकीर्दीच्या पहिल्या वर्षीं त्यांनीं जमेच्या व खर्चाच्या सदरांत मेळ पाडून थोडीशी शिलकही पाडिली. जमाखर्चाच्या पद्धतींत ह्यांनीं सुधारणा केल्यानंतर पहिल्या तीन वर्षांत एकंदरीनें ५७½ लक्ष पौंड शिलक राहिली; व ह्यांच्या मृत्यूनंतर दोन वर्षांनीं बहार प्रांतांत दुष्काळ पडल्यामुळें मात्र शिलक पडण्यास मध्यंतरीं खळ पडला.

## लॉर्ड मेयो यांच्या जमाखर्चासंबंधीं कारभाराचा थोडक्यांत खुलासाः—

| तुटीचीं वर्षें. ( लॉर्ड मेयो हे येण्यापूर्वींचीं ) | जमा व खर्च बरोबर असल्याचें वर्ष. ( त्यांचें पहिलें वर्ष. ) | शिलकेचीं वर्षें. ( त्यांच्या सुधारणांनंतरचीं ) |
|---|---|---|
| १८६६–७. २३०७७०० पौंड | १८६९–७०. १०८७७९ पौंड | १८७०–१. १३५९४१० पौंड |
| १८६७–८. ९२३७२० ,, | ( ही पौंडांत शिलक ) | १८७१–२. २८६१८३६ ,, |
| १८६८–९. २५४२८६१ ,, | | १८७२–३. १६१६८८८ ,, |
| पौंड ५७७४२८१ ही तीन वर्षांच्या तुटींची बेरीज. | | पौंड ५८४०१३४ ही तीन वर्षांच्या शिलकांची बेरीज. |

लॉर्ड मेयो यांनीं योजिलेल्या उपायांमुळें ह्याप्रमाणें ओळीनें चार वर्षें शिलक पडत गेली; व १८४२ पासून अलीकडच्या काळांतील जमाखर्चाचे आंकडे पार्लमेंटासंबंधीं उताऱ्यांतून दिलेले असून ह्या काळांत असा प्रकार एकदांच घडल्याचा दाखला आहे. हें एकच उदाहरण १८४९—१८५३ पर्यंत हिंदुस्तानचे प्रसिद्ध गव्हर्नर जनरल लॉर्ड डलहौसी यांच्या कारकीर्दींत घडलेलें आहे. तसेंच लॉर्ड मेयो यांच्या कारकीर्दीपासून थेट आजपर्यंत [ १८९१ ] सतत चार वर्षें शिलक पडल्याचें पुढेंही उदाहरण नाहीं.

ह्या वेळीं हिंदुस्तान सरकारचे जमाखर्चासंबंधीं खात्याचे प्रधान [ फडणीस ] सर रिचर्ड *टेंपल हे असून लॉर्ड मेयो यांजप्रमाणें त्यांचेंही ह्या कामासंबंधानें पहिलेंच वर्ष होतें. आपल्या पूर्वींच्या प्रधानांचीं अंदाजपत्रकें नेहमीं खोटीं ठरून त्यांचीं मनें खट्टू होत. सबब तें ध्यानांत ठेवून सर रिचर्ड टेंपल यांनीं १८६९–७० सालचीं अंदाजपत्रकें फार सावधगिरीनें तयार केलीं; व थोडीच म्हणजे ४८२६३ पौंड शिलक राहील असा अंदाज काढिला. तथापि लवकरच असें दिसून आलें कीं, हीं अंदाजपत्रकें तयार करण्याची त्या वेळची पद्धति कायम आहे तोंपर्यंत कोणीं कितीही सावधागिरी घेतली, तरी तीं खोटीं ठरल्याशिवाय राहणार नाहींत. सरकारी खजिन्यांतून नक्त शिलक मागील अधिकाऱ्यांनीं जितकी दाख-

---

* हे १८७८ नंतर मुंबई इलाख्याचे गव्हर्नर असून नुकतेच ( १९०२ सालीं ) मृत्यु पावले. ( भा. क. )

विली होती, तीपेक्षां कमी असल्याचें लॉर्ड मेयो यांना आढळल्यामुळें त्यांना प्रथमतः भीति उपस्थित झाली. तसेंच यांच्या कारकीर्दीच्या पूर्वीच्या, म्हणजे १८६८–६९ सालच्या, जमाखर्चाची प्रत्यक्ष स्थिति अखेरीस निदर्शनास आली; तेव्हां तर त्यांची भीति विशेष वाढली. प्रत्येक बाबींत जितकी तूट पडण्याचा संभव दिसत होता, त्याहून अधिकच पडत गेली. अखेरीस १८६९ च्या मार्चमध्यें ८८९५२८ पौंड तूट पडेल असा अजमास होता. परंतु पुढें कित्येक महिन्यांनीं वर्षाचा जमाखर्च पुरा झाला; तेव्हां कळून आलें कीं, ही तूट कांहीं विलक्षण, म्हणजे २५४२८६१ पौंडांची पडली आहे.

शिवाय १८६८–६९ सालच्या जमाखर्चाच्या प्रत्यक्ष आंकड्यांत मात्र असा भयंकर फरक पडला, असें नाहीं. पुढें कित्येक गोष्टी घडून आल्या; त्यांवरून त्यांच्या मनांत संशय उत्पन्न झाला कीं, चालू सालच्या म्हणजे १८६९–७०च्या जमाखर्चाचीहि तीच दशा होणार. त्यांनीं ह्या कामीं तपासणी केली; तेव्हां आढळून आलेल्या स्थितीमुळें एकंदर अंदाजपत्रकें पुनः तपासून पाहाण्याविषयीं त्यांनीं हुकूम दिला. १८६८–६९ सालच्या जमाखर्चाचा प्रत्यक्ष आलेला अनुभव विचारांत घेतला असतां, चालू सालीं म्हणजे १८६९–७० सालीं, मार्च महिन्यांत ४८२६३ पौंड शिलक राहील, असा जो अजमास अंदाजपत्रकांत प्रसिद्ध करण्यांत आला होता, त्याप्रमाणें ती न राहतां उलट १६५०००० पौंड तूट पडल्याशिवाय राहणार नाहीं; असें व्यक्त झालें. शिवाय

१८६९-७० सालचीं अंदाजपत्रकें योग्य रीतीनें प्रसिद्ध केल्यानंतर सर रिचर्ड टेंपल यांना सहा महिन्यांच्या रजेवर इंग्लंडास जाणें भाग पडलें; ह्यामुळें तर लॉर्ड मेयो यांचा विशेषच गोंधळ उडाला. कारण आपल्या कारकीर्दीच्या आरंभींच्याच कित्येक महिन्यांत एकाएकीं ही नवीन तूट पडूं लागल्याचें त्यांना आढळून आलें; व अशा ऐन प्रसंगीं सर रिचर्ड टेंपल यांच्या अनुभवाचा व माहितीचा उपयोग करून घेण्यास सवड नव्हती. तथापि सुदैवेंकरून त्यांना मि. स्ट्राची [ यांनाच पुढें सर असा किताब मिळाला ] यांची मदत मिळाली. स्ट्राची साहेब हे त्या वेळीं टेंपल साहेबांच्या रजेच्या मुदतींत फडणिशीचें काम पाहात होते.

ह्याप्रमाणें अंदाजपत्रकांसंबंधानें वरील कलमांत स्पष्ट रीतीनें उघड केलेल्या गोष्टी १८६९ सालांत एकदम अनुभवास न येतां क्रमाक्रमानेंच आल्या. तसेंच ह्या बाबतींत सरकारास सल्लामसलत देण्याची ज्यांवर जबाबदारी होती, अशा कामगारांमध्यें ह्या गोष्टीसंबंधानें अति मतवैचित्र्य होतें. ह्या परस्परविरुद्ध मतांचें परिशीलन करून त्यांतील खरें तत्त्व शोधून काढून ह्या एकंदर स्थितीचें सर्व खरें स्वरूप ध्यानांत येण्यास ह्या नव्या व्हाइसराय साहेबांना स्वतःच्या आंगचें विलक्षण मानसिक धैर्य दाखविणें अवश्य होतें. १८६९ च्या मे महिन्यांतच ते आपल्या एका मित्रास लिहितातः—“आपल्या जमाखर्चाची स्थिति जितकी समाधानकारक असणें अवश्य आहे तितकी ती नाहीं, असें माझ्या नजरेस येऊं लागलें आहे.

सरकारी खजिन्यांची संख्या फार असून ते लांब लांब अंतरांवर आहेत; व प्रत्येकापाशीं असलेल्या जमाखर्चाच्या संबंधांत घोटाळे आहेत. ह्यामुळें एकंदर देशाचीं अंदाज पत्रकें बिनचूक तयार करणें व कोणतीही माहिती थोड्या वेळांत गोळा करणें प्रायः अति अवघड पडतें. सरकारी पैशाचा निष्कारण खर्च फार होत आहे; ह्यामुळें कडक उपाय योजणें भाग पडून ह्या बाबतींत मला कांहीं अति कडक उद्गार काढावे लागले आहेत."*

व्हाइसराय यांचें मन दर आठवड्यास हिशेबांत अधिकाधिक गढत चाललें, व त्यांचा चेहरा विशेष उद्विग्न दिसूं लागला. जमाखर्चांतील व्यंगांचा जेव्हां त्यांनीं मुळापर्यंत छडा लाविला तेव्हां तपासाअंतीं सर्व अंदाजपत्रकें एकामागून एक खोटीं ठरूं लागलीं. त्या वर्षाच्या जमाखर्चांत हळू हळू तूट कशी पडत चालली ह्याची क्रमशः हकीगत त्या उन्हाळयांत त्यांनीं लिहिलेल्या खाजगी व सरकारी पत्रांतून आढळते; व ह्यासंबंधीं स्वतः वर असलेल्या जबाबदारीमुळें त्यांचें मन विलक्षण उद्विग्न असल्याचें यांवरून दिसतें. तथापि हिंदुस्तानच्या जमेचीं व खर्चाची तोंडमिळवणी केल्याशिवाय आपण राहणार नाहीं, मग ह्या कामीं आपणांस कितीही त्रास पडो अथवा आपण कितीही अप्रिय होवो, असा त्यांच्या मनाचा पक्का निर्धार सदहू पत्रांतील प्रत्येक ओळीवरून ध्वनित होतो. वर ज्या पत्रांतील उतारा घेत-

---

* अर्ल ऑफ मेयो यांचें ता. १६ मे १८६९ चें सर स्टाफर्ड नॉर्थकोट यांस पत्र.

लेला आहे, त्यानंतर तीन महिन्यांनीं ते सर हेन्री ड्यूरँड यांना लिहितात:—" नुकत्याच मिळालेल्या माहितीवरून माझा असा ग्रह होत आहे कीं, वसुलाच्या दोन बाबी मिळूनच १८६९–७० सालच्या पहिल्या तिमाहींत पांच लाखांची तूट पडेल. तेव्हां ही तूट भरून काढण्यास आपणांकडून होईल तितकें करणें आपलें कर्तव्य होय. **पुनः तूट येऊं द्यावयाची नाहीं असा माझा संकल्प आहे**–मग ह्या कामीं सैन्य कमी करावें लागो, मुलकी कामगार कमी करावे लागोत, व सार्वजनिक उपयोगाचीं इतर कामें बंद ठेवावीं लागोत. ह्या विषयाचा अधिकाधिक विचार करावा, तों तों माझी विशेष खात्री होत जाते कीं, जमाखर्चाच्या दृष्टीनें आपली स्थिति फार कमजोराची आहे; व आपल्या राष्ट्राच्या संरक्षणार्थ ह्या बाबतींत ताबडतोब उपाय योजणें अत्यंत आवश्यक असून तेही फारसें स्तोम न माजवितां थोडक्यांत अमलांत आणिले पाहिजेत." ते ड्यूक ऑफ् आर्गाइल यांस लिहितात:—" जमाखर्चांत पडणारी तूट नाहींशी करण्याचें बिकट काम करण्याचें आतां आपल्या नशिबीं आल्याबद्दल मला किती खेद वाटत आहे, तें लिहिण्यास वाईट वाटतें. परंतु आपणांस एकादा युद्धप्रसंग न आल्यास–ईश्वर करो व तो न येवो–आपण हें काम तडीस नेऊं."

ही स्थिति सुधारण्यासाठीं लॉर्ड मेयो यांनीं दोन भिन्न भिन्न योजना मनांत आणिल्या:–पहिली अशी कीं, वस्तुस्थिति फार बिकट असल्यामुळें चालू जमाखर्ची साल

संपण्याची वाट न पाहतां, पुढें लवकरच पडणारी तूट भरून काढण्यासाठीं तजविजी योजणें. दुसरी योजना अशी कीं, अशी तूट ज्या कारणांनीं पडते, तीं नेहमींचीं कारणेंच नाहींतशीं करण्याचा, व जमाखर्चाच्या बाबतींत पद्धतवार जुळवाजुळव करून देऊन अशी तूट पुनः पुनः न पडूं देण्याचा निश्चय करणें.

लॉर्ड मेयो व सर जॉन स्ट्राचे या उभयतांनीं पहिला आरंभ असा केला कीं, पब्लिक वर्क्स खात्याकडे विलक्षण फुगलेल्या रकमेपैकीं ८००००० पौंड कापले. ही तोड पब्लिक वर्क्स खात्याचे सेक्रेटरी कर्नल रिचर्ड स्ट्राचे यांनींच सुचविलेली असून त्यांनीं ती अति कडक रीतीनें व इमानानें अमलांतही आणिली. हेच पुढें लेफ्टेनंट जनरलच्या हुद्द्यास चढले. हिंदुस्तान सरकारचीं इतर खातींही ह्या खात्याप्रमाणेंच महत्त्वाचीं असून आपापल्या नेमणुका वाढवून घेण्यासाठीं त्यांची नेहमीं ओरडाओरड असे. ह्यामुळें त्या खात्यांचे खर्चही मोठ्या झपाट्यानें फुगले होते. तात्पर्य, कंपनी सरकारकडून हिंदुस्तानचें राज्य प्रत्य[illegible] राणी सरकारच्या ताब्यांत जाऊन दहा वर्षें झालीं अ[illegible] ह्या मुदतींत राज्यकारभारांत अनेक दिशांनीं वि[illegible] सुधारणा झाल्याचें दृष्टोत्पत्तीस येत होतें; परंतु ह्या सुधारणा कितीही उत्कृष्ट असल्या तरी त्या अमलांत आणण्यास एकंदरीनें इतका कांहीं खर्च होऊं लागला कीं, देशाच्या उत्पन्नांतून तो भागेनासा झाला. ह्यास्तव पब्लिक वर्क्स खात्याकडील नेमणुकींतून ८००००० पौंड कापून शिवाय ह्या इतर खर्चाच्या खात्यांच्या नेमणुकींपैकीं

३५०००० पौंड तूर्त कापणें त्यांना भाग पडलें. हिंदुस्तानचें राज्य खुद्द राणी सरकारच्या ताब्यांत गेल्यापासून आजपर्यंतच्या १० वर्षांत ह्या खात्यांचा खर्च विलक्षण झपाट्यानें वाढत आला होता. ह्याप्रमाणें चालू म्हणजे १८६९–७० सालांत केलेली एकंदर काटकसर ११५०००० पौंडांची झाली.

तथापि जमेचीं व खर्चाचीं सदरें सारखीं होण्यास केवळ काटकसर पुरी पडणार नाहीं, असें स्पष्ट दिसून आलें. त्या वेळच्या जमाखर्चाच्या अंदाजपत्रकांप्रमाणें व्यवस्था कायम ठेविल्यानें तूट पडणारच होती. तेव्हां जाणून बुजून तीच व्यवस्था कायम ठेवावयाची; अथवा अर्धें साल राहिलें असतांच नवीन कर बसवावयाचा; ह्याचा निर्णय त्यांना ठरवावयाचा होता. हा दुसरा प्रकार अगदीं अपरिचित असून हिंदुस्तानांत असें घडल्याचें उदाहरण प्रायः नव्हतेंच. ह्या कामीं काळजीपूर्वक तपास केल्यावर त्यांनीं ठरविलें कीं, प्रस्तुत वस्तुस्थितीमुळें हा दुसरा उपाय योजणेंच इष्ट आहे. चालू सालीं येणाऱ्या ह्या तुटीच्या पूर्वींचीं वर्षें भरभराटीचीं असून तेव्हांचे जमाखर्च बिनचूक असते, तर इतका कडक उपाय योजण्याची आवश्यकता त्यांना वाटली नसती. परंतु ह्यामागील सतत तीन वर्षांत सरकारी खर्च उत्पन्नाच्या बाहेर फार गेला होता, म्हणून लॉर्ड मेयो यांना आढळून आलें कीं, हा कर्जबाजारीपणा नाहींसा होण्यास दोनच मार्ग आहेतः—पहिला मार्ग म्हणजे, चालू सालीं काटकसरी-

साठीं तावडतोब अति कडक उपाय योजणें; व दुसरा मार्ग म्हणजे देशाच्या जमाखर्चांत कायमची सुधारणा करून दरसाल ३० लक्ष पौंडांपर्यंत खर्च कमी लागेलसें करणें. खर्चांतील काटकसर व करांतील वाढवा ह्या दोन्ही उपायांमिळून ही एकंदर ३० लक्षांची रक्कम उभारावयाची, असा हेतु होता हें उघड आहे.

ह्या व इतर सबळ कारणांमुळें जमाखर्चाची रचना निर्दोष पायावर उभारण्याचा हिंदुस्तान सरकारचा निर्धार ठरला आहे, असें ह्या कामीं बिनतोड उपाय योजून सर्वांच्या स्पष्ट रीतीनें ध्यानांत आणून देण्याचा लॉर्ड मेयो यांनीं निश्चय केला. राहिलेल्या अर्ध्या सालांत त्यांनीं प्राप्तीवरील कर [ इन्कम टॅक्स ] शेंकडा १ टक्क्याऐवजीं २½ टक्के केला; आणि मद्रास व मुंबई इलाख्यांत मिठावरील जकात वाढविली. पहिल्या उपायामुळें ३२०००० पौंडांची व दुसऱ्यामुळें १८०००० पौंडांची मिळून ५०००० पौंडांची भर त्या सालच्या उत्पन्नांत पडेल, असा अजमास होता.

ह्याप्रमाणें करामध्यें ५ लक्ष पौंड वाढविल्यानें व खर्चांत ११५०००० पौंड काटकसर केल्यानें चालू सालीं जी १६५०००० पौंडांची तूट येण्याचा अजमास होता, ती भरून निघेल अशी त्यांना उमेद होती. त्यांनीं आपल्या विचारांसंबंधानें स्टेट सेक्रेटरी यांस पुढें लिहिल्याप्रमाणें खुलासा केला आहे:—

१८६८–६९ अखेरच्या तीन सालांतील एकंदर तूट ५७½ लक्ष पौंडांची आहे; व १८६५–६६ सालाच्या

अखेरीस हिंदुस्तानांतील आपल्या तिजोऱ्यांतून १३७७०००० पौंडांची असलेली रोख शिलक १८६८-६९ सालच्या अखेरीस १०३६०००० पौंडांपर्यंत उतरली आहे; आणि आपण अगदीं अलीकडे २४००००० पौंड कर्ज काढिलें आहे. तरी देखील आजामित्तीस रोख शिलक इतकी कमी आहे कीं, सालाच्या ह्या सुमारास इतकी कमी शिलक गेल्या पुष्कळ वर्षांत नव्हती. ह्याच मुदतींत आपलें कर्ज ६५ लक्ष पौंड वाढलें असून ह्यापैकीं ३० लक्षांहून जास्त पैसा उत्पादक ( रेलवे, कालवे वगैरेसंबंधीं )* कामांवर खर्च झालेला नाहीं. दरसाल सुमारें ५ पासून १० लक्ष पौंडांपर्यंत शिलक पडेल अशा बेतानें आपली अदांजपत्रकें तयार करण्याविषयीं हिंदुस्तानच्या स्टेट सेक्रेटरींच्या जागीं वेळोवेळीं आलेल्या मुत्सद्द्यांकडून आम्हांस हुकूम सुटलेले असून ह्याची आठवण आपणही दिली आहे. हें धोरण अति उत्कृष्ट प्रकारचें आहे, असें आपलें मत आह्मांस पूर्णपणें मान्य आहे. तसेंच आह्मांस निःसंशय वाटतें कीं, शांततेच्या काळांत आपल्या खर्चाची व्यवस्था आपल्या उत्पन्नाशीं अशी जुळवून दिली पाहिजे कीं, दरसाल १० लक्षांपेक्षां कमी शिलक राहूं नये; मात्र ( रेलवे, कालवे वगैरे ) असाधारण कामांचा समावेश ह्या राज्यकारभारांत नसून तो खर्च भागण्यासाठीं त्या कामीं कर्ज काढिलेलें असतेंच.

* ता. २० सेप्टेंबर १८६९ च्या नंबर २४० च्या स्टेट सेक्रेटरी यांना पाठविलेल्या खलित्यांतील ७१ वा पारिग्राफ पहा.

ह्यास्तव आह्मांस निर्णय ठरवावा लागतो तो असाः—आपलें वार्षिक उत्पन्न व आपला वार्षिक खर्च ह्यांत ताळमेळ राहून निदान ३० लक्ष पौंड शिलक राहतील, अशा बेताची कायमची सुधारणा केल्याशिवाय इतर कोणत्याही उपायानें आपल्या जमाखर्चाची स्थिति खरोखर समाधानकारक होणार नाहीं. तेव्हां आपला खर्च कमी करून व आपलें उत्पन्न वाढवून हा परिणाम आपणांस उत्तम रीतीनें कसा घडवून आणितां येईल, एवढें कोडें आतां आपणांस सोडवावयाचें आहे.

" आमची खात्री झाली आहे कीं, ह्या बाबतींत आपणांस योग्य प्रकारचा असा एकच मार्ग खुला आहे. दरसाल एकसारखी पडणारी तूट भरून काढण्यासाठीं आपण राष्ट्रीय कर्ज वाढवितों. परंतु इतःपर आपणांस तसें करून उपयोग नाहीं. शिवाय आपण निश्चय केला पाहिजे कीं, शांततेच्या काळांत आपलें उत्पन्न सदोदीत आपल्या साधारण खर्चापेक्षां अधिक असलें पाहिजे; व ह्या बाबतींत इतःपर शंका घेण्यास काडीमात्र जागा राहूं नये; मग हें काम कितीही जड जावो. "

पुढें पडणारी तूट भरून काढण्यासाठीं लॉर्ड मेयो यांनीं कोणकोणते उपाय तत्काळ योजिले, तें वर सांगितलें. तथापि अशा उपायांनीं एकंदर रेलवे, कालवे वगैरे सार्वजनिक उपयुक्ततेचीं कामें एकदम बंद पाडिल्यानें सामानसुमानाचा व्यर्थ खराबा झाला; व चालू सालांत मध्येंच कर वाढविल्यानें आपल्या पद्धतींतील दोष मोठ्या अनिष्ट रीतीनें व्यक्त झाले, व ह्यामुळें हिंदुस्तानच्या

प्रजेंत असंतोष उत्पन्न होऊन तेणेंकरून धोका पोहों-चण्याचा संभव आहे; असें त्यांच्या अनुभवास आलें. ते सहज बोलतां बोलतां एकदां म्हणाले:—“ आपलें होतें नव्हतें तें सर्व संपलें; व वेळीं उपयोग करितां येईल अशी शिलक आपणांपाशीं मुळींच नाहीं. तेव्हां असा प्रसंग इतःपर प्राप्त होऊं नये म्हणून उपाय योजण्याचें मात्र आपल्या हातीं उरलें आहे.” तेव्हां मागील काळांत ज्या कारणांनीं जमाखर्चांत तूट पडत असे तीं कारणेंच दूर करून ही स्थिति सुधारण्यास कायमचा उपाय शोधून काढण्याचा त्यांनीं निश्चय केला.

त्यांच्या सुधारणांचीं तीन अंगें होतीं. वरिष्ठ सरकार-च्या जमाखर्चासंबंधीं खात्याच्या रचनेंतच सुधारणा करणें, हें पहिलें. खुद्द वरिष्ठ सरकारच्या कारभारांतील गोंधळ किंवा त्यांची अदूरदृष्टि स्थानिक सरकारांना दाख-विण्यास जागा आहे, तोंपर्यंत त्यांना आपापले जमाखर्च चोख ठेवण्यास सांगणें व्यर्थ; असें लॉर्ड मेयो यांना वाटलें. त्यांच्या सुधारणांचें दुसरें अंग म्हटलें म्हणजे, आपापलीं अंदाजपत्रकें तयार करितांना अधिक काटकसर करण्यास स्थानिक सरकारांस भाग पाडून त्यांना टाप-टिपीनें राहण्यास लावून त्या अंदाजाबाहेर जाऊं न देणें. ह्याप्रमाणें सरकारी पैशांसंबंधीं स्थानिक सरकारांवरील जबाबदारी त्यांनीं वाढविली खरी; परंतु त्यांना त्यांच्या जमेसंबंधींही जास्त अधिकार दिले. तिसरें अंग म्हणजे, देशाच्या एकंदर उत्पन्नांत व खर्चांत पद्धतशीर कायमची तोंडमिळवणी करणें, हें होय.

वरिष्ठ सरकारच्या जमाखर्चासंबंधीं खात्यांतील दोष काढून टाकणें, ह्या पहिल्या अंगाचा आतां विचार करूं. स्थानिक सरकारें व निरनिराळीं खातीं यांजकडून दरसालचीं अंदाजपत्रकें वरिष्ठ सरकाराकडे वेळच्या वेळीं येत नसत. ह्यामुळें एकंदर देशाच्या जमाखर्चाचा खर्डा तयार करून तो कौन्सिलापुढें मांडण्याचा जो ठराविक वेळ असतो, त्यापूर्वीं त्यांचे जमाखर्च तपासून व पडताळून पाहण्यास पुरेसा वेळ मिळत नसे. हिंदुस्तानच्या जमाखर्चांत ओळीनें भयंकर तूट पडत जाण्याचें कांहीं अंशीं हें कारण होय, असें त्यांस वाटलें. शिवाय त्यांना असेंही आढळून आलें कीं, वर्षांतील जमाखर्चाची स्थिति वेळोवेळीं कसकशी आहे, ह्यावर मोठ्या दक्षतेनें नजर ठेवण्यांत खुद्द आपल्या जमाखर्चासंबंधीं खात्याकडून विलक्षण कसूर होते. ह्यास्तव हिंदुस्तानांतील एकंदर स्थानिक सरकारें ओरड करीत कीं, वरिष्ठ सरकार आपणांकडून किती तरी आंकड्यांचीं पत्रकें मागवितें, व तीं ही फार घोटाळ्याचीं असतात. तथापि वरिष्ठ सरकारच्या जमाखर्चाच्या खात्यांतील कामगारांनीं अखेरीस तीं पत्रकें काळजीपूर्वक पडताळून पाहिलीं, तरच ह्या एकंदर खटाटोपाचें खरें चीज व्हावयाचें. परंतु हें काम त्या खात्याकडून योग्य प्रकारें होत नव्हतें.

अशा रीतीनें शेवटीं पडताळा पाहिला नाहीं तर ही आंकड्यांची जमवाजमव करण्यापासून हिंदुस्तानसरकारला कोणी शाबासकी देणार नव्हतें. आंकड्यांचे भारेच्या भारे दररोज हिंदुस्तान सरकारपुढें येऊन पडत. परंतु

त्यांचा विचारपूर्वक उपयोग करून घेण्याजोगी व्यवस्था लॉर्ड मेयो यांच्या कारकीर्दीपूर्वी झालेली नव्हती. हिंदुस्तान सरकारच्या मंत्रिमंडळांपैकीं ज्याला ह्या विषयावर उत्तम प्रकारें अभिप्राय देतां येण्याजोगा आहे, अशा मंत्र्याचेंच हें मत येथें दिलें आहे. हीं पत्रकें तयार करण्याच्या कामीं देशांत लांबवर पसरलेल्या अनेक खात्यांतील कामगारांनीं परिश्रम केलेले असतात. तथापि ज्या वरिष्ठ सरकारसाठीं हीं पत्रकें तयार केलेलीं असतात, त्यांच्या कचेरींत ह्यांचें विचारपूर्वक मनन झालें नाहीं तर त्या परिश्रमाचें कांहींच चीज होणार नाहीं. परंतु ही गोष्ट वरिष्ठ सरकारच्या जमाखर्चासंबंधीं खात्यांतील कामगारांच्या लक्षांत आली होतीसें दिसत नाहीं. लॉर्ड मेयो यांच्या कारकीर्दीपूर्वी हिंदुस्तानच्या स्थितीसंबंधाचे आंकडे गोळा होत. परंतु त्यावरून त्या काळच्या स्थानिक सरकारच्या कामगारांनीं ते आंकडे इमानानें गोळा करण्यांत घेतलेले परिश्रम मात्र दिसून येतात. ही मोठ्या दिलगिरीची गोष्ट आहे. कारण वरिष्ठ सरकारचे कामगार ह्या बाबतींत उदासीन असून इकडे कानाडोळा करीत; ह्यामुळें त्या आंकड्यांचा उपयोग होत नसे.

ह्याप्रमाणें १८६९ सालीं जमाखर्चाची उडालेली पक्की दुर्दशा ही कांहीं नवीन नसून आजपर्यंत असे दुष्परिणाम ओळीनें कित्येत वर्षें घडत आले होते. परंतु ह्यामुळें जमाखर्च अधिक चांगल्या प्रकारें ठेवण्याविषयीं हुरूप मात्र प्रथमतः लॉर्ड मेयो यांनाच उत्पन्न झाला. आंकड्यांच्या कोष्टकांचें वर्गीकरण करून तीं पद्धतवार तयार करण्याचें

व ह्या आंकड्यांसंबंधानें पूर्वीपेक्षां जास्त खुलासा देण्याचें काम हिंदुस्तान सरकारनें हातीं घेतलें. ह्याप्रमाणें लॉर्ड मेयो यांनीं प्रथमतः वरिष्ठ सरकारच्या कचेरींतील कामाची सुरळीत व्यवस्था लावून दिली; नंतर स्थानिक सरकारांनीं व हिंदुस्तान सरकारच्या निरनिराळ्या खात्यांनीं आपापलीं अंदाज पत्रकें वेळच्या वेळीं पाठविलींच पाहिजेत; अशाविषयीं उपाय त्यांनीं योजिले. जमाखर्चाची प्रत्येक महिन्याची स्थिति कसकशी आहे, हें समजण्यासाठीं हल्लीं वरिष्ठ सरकारकडे दरमहा माहिती येते ती व्यवस्था ह्यांनींच लाविली; किंवा ह्या संबंधाच्या पूर्वीच्या पद्धतीची सुधारणा ह्यांनीं केली असें म्हटलें असतां विशेष शोभेल. हिंदुस्तान सरकारच्या जमाखर्चासंबंधीं खात्याचे सेक्रेटरी मि. चापमन हे असून ह्या विषयासंबंधानें मत देण्याचा त्यांना सर्वांत विशेष अधिकार पोहोंचत होता. ते ह्या पद्धतीच्या परिणामासंबंधानें ह्मणतातः—"जमाखर्चांत ज्या गोष्टीमुळें फेरफार होईल अशी कोणतीही महत्त्वाची गोष्ट सरकारच्या कैक दिवस नजरेस न येणें आतां अशक्य झालें आहे; असें ह्मटल्यास त्यांत कांहीं अतिशयोक्ति नाहीं. आपली आशा कदाचित् निष्फळ होईल; अरिष्टें येतील किंवा आपल्याकडून चुका कदाचित् घडतील. तथापि निदान ह्या गोष्टींची माहिती सरकारला ताबडतोब होईल; व ह्या कामीं वेळेचें महत्त्व फारच विलक्षण आहे."

स्थानिक सरकारांनीं आपल्या राज्यकारभारांत विशेष कडक रीतीनें काटकसर केली पाहिजे, अशी तजवीज

लॉर्ड मेयो यांनीं केली; हें त्यांच्या जमाखर्चासंबंधीं सुधारणांचें दुसरें महत्त्वाचें अंग होय. हिंदुस्तानच्या एकंदर ब्रिटिश राज्यकारभाराचे कित्येक विभाग करून तें काम निरनिराळ्या स्थानिक सरकारांकडे सोंपविलेलें आहे; व ह्यांवर गव्हर्नर जनरल इन्-कौन्सिल यांचा ताबा असतो खरा, परंतु हीं वरिष्ठ सरकारापासून अगदीं विलग विलग असतात; व ह्या जमाखर्चाच्या अडचणी वारंवार उत्पन्न होण्याचें हेंच मुख्य कारण होय. लॉर्ड मेयो यांच्या कारकीर्दीपूर्वीं अशी वहिवाट होती कीं, एकंदर राज्याच्या उत्पन्नांतील भाग ह्या निरनिराळ्या स्थानिक सरकारांना नेमून द्यावयाचे; व त्या नेमणुकांतून आपापल्या प्रांतांचा मुलकी कारभार चालवून त्यांची सुधारणा करण्याची जबाबदारी स्थानिक सरकारांवर होती. तेव्हां अशा दृष्टीनें तीं सरकारें स्वतंत्र होतीं खरीं; तथापि आपापल्या प्रांतांतील उत्पन्नाची व्यवस्था स्वतंत्र रीतीनें लावण्याचा त्यांना अगदीं अधिकार नव्हता. पुढील बारा महिन्यांत आपणांस लागणाऱ्या खर्चाचीं अंदाजपत्रकें साल संपण्याच्या सुमारास प्रत्येक स्थानिक सरकाराकडून वरिष्ठ सरकाराकडे जात असत. खर्चाच्या ह्या एकंदर अंदाजपत्रकांचें एकीकरण वरिष्ठ सरकाराकडून होऊन सर्व हिंदुस्तान देशाच्या त्या सालच्या वसुलाच्या अंदाजाशीं ह्या खर्चाची तुलना होत असे; व नंतर प्रत्येक स्थानिक सरकाराला त्याच्या प्रांताच्या खर्चासाठीं देतां येईल तितकी रक्कम मंजूर होत असे.

राज्यकारभारांत काटकसर होण्यास ही पद्धति अत्यंत निरुपयोगी होती. कांहीं नियमित उत्पन्नाच्या

प्रमाणांत आपापले खर्च भागविण्याची सक्ती स्थानिक सरकारांवर ह्या पद्धतीमुळें अगदीं नव्हती; आणि पुष्कळ स्थानिक सरकारांना अशी सवय जडली कीं, वास्तविक आपल्या प्रांतांच्या खर्चाला अत्यन्त जरूर जितकी रक्कम पाहिजे, तितकीच न मागतां आपल्या मर्जीस जितका खर्च करावयाचा असेल तितक्या रकमांची मागणी वरिष्ठ सरकाराकडे करावयाची. ह्या जुन्या पद्धतीप्रमाणें कामकाज पाहणारे अधिकारी म्हणतातः—"प्रत्यक्ष परिणाम असा घडे कीं, स्थानिक सरकारें अधिकाधिक मागत तों तों त्यांना अधिकाधिक मिळे; व निरनिराळ्या स्थानिक सरकारांना किती किती रकमांची आवश्यकता आहे, हें त्यांच्या त्यांच्या मागण्यांवरून ठरविण्यांत येई. ह्याप्रमाणें तीं सरकारें मनांत किंतू न आणितां सालोसाल अधिकाधिक मागण्या करीत. शिवाय आपल्याला मिळालेल्या रकमेंतून वर्षाच्या अखेरीस कांहीं पैसा शिलक राहिल्यास त्याचा उपयोग आपल्या प्रांताच्या राज्यकारभाराकडे करून घेतां याव-याचा नाहीं, हें प्रत्येक सरकारला माहीत असल्यामुळें शिलक पाडण्याची आस्था कोणासही नसे." हा उतारा येथें देण्यांत स्थानिक सरकारांना दोष देण्याचाच केवळ हेतु नाहीं; तथापि ह्यावरून तेव्हांची वस्तुस्थिति व्यक्त होते. देशाच्या उत्पन्नापैकीं राज्यकारभाराच्या कोणत्याही खात्याकडे जितकी रक्कम देतां येण्याजोगी असेल तीहून जास्त खर्च केल्यास फायदाच होईल; अशी हिंदुस्तानांतील बहुतेक खात्यांची स्थिति आहे.

लॉर्ड मेयो यांच्या स्पष्टपणें ध्यानांत आलें कीं, जमाखर्चासंबंधानें सुधारणेच्या कामीं स्थानिक सरकारांची मदत मिळविणें असल्यास वसुलासंबंधीं कांहीं जबाबदारीही आपण त्यांजवर टाकिली पाहिजे. त्यांनीं प्रत्येक स्थानिक सरकाराबरोबर ह्या बाबतींत प्रथमतः इतका पत्रव्यवहार केला कीं, ह्या संबंधानें जास्त ऊहापोह होणें राहिला नाहीं. नंतर ता. १४ डिसेंबर १८७० रोजीं त्यांनीं एक सरकारी ठराव प्रसिद्ध केला. हा ठराव म्हणजे स्थानिक सरकारांची ही एक सनदच म्हणण्यास हरकत नाहीं. पुढें योग्य वेळीं स्टेट सेक्रेटरी यांची संमति ह्या सनदेला मिळाली. ह्या सनदेअन्वयें दरसाल नक्की ठरविलेली रक्कम प्रत्येक स्थानिक सरकारला मिळावयाची; व ह्यांतून त्या सरकारनें आपल्या बहुतेक मुख्य खात्यांचा खर्च भागवावयाचा. लष्करी खात्याच्या खर्चाचा समावेश यांत नाहीं; परंतु पब्लिक वर्क्स खात्याचा खर्च यांतूनच व्हावयाचा. ह्याप्रमाणें नेमून दिलेल्या रकमांत फेरफार व्हावयाचा नाहीं; व ह्या नेमणुका प्रायः पांच पांच वर्षें चालावयाच्या असून वरिष्ठ सरकारला पैशाची अगदींच विलक्षण टंचाई पडल्यास मात्र ह्यांजमध्यें काटाकाट व्हावयाची. सारांश, ह्या नेमणुकांवर सर्वस्वीं त्या त्या स्थानिक सरकारांची पूर्ण मालकी असावयाची. कोणत्याही स्थानिक सरकारनें आपल्या नेमणुकींतून कांहीं शिल्लक पाडिल्यास ती वरिष्ठ सरकारच्या खजिन्यांत परत पाठविण्याचें प्रयोजन नाहीं. आपापल्या शिलकांची वांटणी निरनिराळ्या खात्यांना आपल्या मर्जीप्रमाणें करून देण्याची

स्थानिक सरकारांना मोकळीक असे; त्यांत गव्हर्नर जनरल इन्-कौन्सिल हे हात घालीत नसत.

ह्याप्रमाणें स्थानिक सरकारांच्या ताब्यांत दिलेल्या सरकारी कामांत पुढील गोष्टींचा समावेश होता:-रयतेंच्या जीविताचें व मालमत्तेचें संरक्षण; शिक्षण; स्थावर मिळकतींतील फेरफार अथवा त्यांच्या स्वामित्वांतील बदल, ह्यांसंबंधीं दफ्तर; आरोग्यरक्षण; आपल्या प्रांतांतील सडका, पूल, कालवे वगैरे सार्वजनिक कामें; व राज्यकारभारासंबंधीं इतर कित्येक किरकोळ कामें. सरकारी कामकाजाच्या सोईस्तव ह्या कामांचे समुदाय पुढें दर्शविल्याप्रमाणें केले आहेत: तुरुंग; रेजिस्ट्रेशन ( दस्तैवज वगैरें नोंदणें ); पोलीस; सार्वजनिक शिक्षण; दवाखाने ( मात्र ह्यांत दवाखान्यासंबंधीं कामगारमंडळी यावयाची नाहीं; ) छापणावळ ( हिंदुस्तानांत ही मोठीच बाब होय ); सडका; मुल्की कामकाजाच्या कचेऱ्या; व अनेक प्रकारच्या सार्वजनिक उपयुक्ततेचीं कामें, किरकोळ सार्वजनिक कामांतील सुधारणा; व इतर कित्येक किरकोळ कामें.

स्थानिक सरकारें व वरिष्ठ सरकार ह्यांजमध्यें जमाखर्चासंबंधानें उत्कृष्ट जम ह्या पद्धतीमुळें बसला; व आजमितीसही ह्याच पायावर हिंदुस्तानच्या जमाखर्चाची इमारत आहे. लॉर्ड मेयो यांच्या कारकीर्दीनंतर वेळोवेळीं ह्या पद्धतींत सुधारणा झाल्या आहेत; परंतु ह्या पद्धतींच्या मूळच्या तत्त्वांत फेरबदल झालेला नाहीं. ही सुधारलेली पद्धति अमलांत येण्यापूर्वींच्या स्थितीचें सर जॉन स्ट्राचे यांनीं थोडक्यांत असें वर्णन केलें आहे:—

" लॉर्ड मेयो हे व्हाइसराय होण्यापूर्वीं पुष्कळ वर्षें हिंदुस्तानच्या जमखर्चाची साधारण स्थिति म्हटली म्हणजे सालोसाल तूट पडावयाची. अशी स्थिति उत्पन्न होण्याचें एक कारण असें कीं, आपापल्या राज्यकारभारांत अनेक प्रकारें सुधारणा करण्यासाठीं स्थानिक सरकारें दरसाल अधिकाधिक मागण्या करीत; व त्यांचा प्रतिकार करणें वरिष्ठ सरकारास अशक्य असे. त्यांच्या मागण्यांना वस्तुतः मर्यादाच नसे; कारण त्यांना वाजवी रीतीनें ज्या गोष्टींची आवश्यकता नसे, अशा गोष्टीही अनेक असत. वरिष्ठ सरकाराकडे दरसालच्या आपल्या मागण्या आपण कोणत्या बेतानें केल्या पाहिजेत, तें जाणण्याचें साधन स्थानिक सरकारांना नव्हतें. ज्या हिंदुस्तान सरकारच्या खजिन्यावर मागण्या करावयाच्या तो अमर्याद आहे असें त्यांना वाटे; कारण तो कुबेराचाच खजिना आहे अशी त्यांची कल्पना असे. त्यांना आपापल्या प्रांतांत हरएक खात्यांत सुधारणा करण्याची आवश्यकता दिसे; आणि आपापल्या प्रांतासाठीं व प्रजेसाठीं राष्ट्राच्या एकंदर उत्पन्नाचा जितका मोठा हिस्सा मिळण्याविषयीं हिंदुस्तान सरकारचें मन वळवितां येईल, तितका मिळविण्याची त्यांची नेहमीं मोठी इच्छा असे; व ती कांहीं वावगी नव्हती. अनुभवांतीं त्यांना कळून आलें कीं, आपण काटकसर जों जों कमी करूं व आपल्या मागण्यांत लोचटपणा अधिकाधिक करूं, तों तों आपल्या गरजा विशेष नडीच्या आहेत, अशाविषयीं हिंदुस्तान सरकारचें मन आपणांस विशेष वळवितां येण्याचा संभव आहे. ह्या गरजा हिंदुस्तान सर-

कारच्या नजरेस आणण्यांत आपण योग्य तेंच करीत आहों असें त्यांस वाटे; व अशा रीतीनें अवश्य तो पैसा नामंजूर करण्याची जबाबदारी ते हिंदुस्तान सरकारावर टाकीत; व त्या सरकारनेंही ती पतकरिली होती.

"ह्याप्रमाणें वाढत चाललेल्या खर्चासाठीं स्थानिक सरकारांकडून ज्या सतत मागण्या येत, त्यांचा प्रतिकार हिंदुस्तान सरकारला कांहींमात्र करितां येईनासा झाला. ह्या बाबतींत उपाय एकच होता. तो हा कीं, त्या सरकारना मागण्याच करूं द्यावयाच्या नाहींत; व आपापल्या प्रांतांच्या जमेंत व खर्चांत मेळ घालण्याविषयीं त्या सरकारांवर इष्ट हेतु सिद्धीस जाईल अशा प्रकारें वास्तविक जबाबदारी घातल्याशिवाय ह्या मागण्या बंद झाल्या नसत्या. आपणांस अमुक गोष्टींची जरूर दिसत आहे, असें स्थानिक सरकारांस आढळल्यावर त्यांनीं आपल्यापाशीं त्या कामासाठीं पैसा किती आहे तें पाहून त्या धोरणानेंच चालण्याविषयीं निर्धार केल्याखेरीज काटकसरीचें नांवही घ्यावयास नको. प्रांताच्या उत्पन्नापैकीं किती भाग त्या प्रांताचा खर्च भागण्यास अवश्य आहे, हें योग्य रीतीनें वरिष्ठ सरकारास किंवा स्थानिक सरकारांसही ठरवितां येण्याजोगें नव्हतें. एकंदर देशाचें उत्पन्न सर्व देशासाठीं एकत्र गोळा होत असे, व ह्या उत्पन्नापैकीं प्रत्येक प्रांताला किती किती भाग देणें वाजवी आहे, हें ठरविणें अशक्य असे."

मेजर जनरल स्ट्राचे हे जुन्या पद्धतीसंबंधानें लिहितातः—" देशाच्या सरकारी उत्पन्नाची वांटणी म्हणजे स्थानिक सरकारांमध्यें थोडीफार झटापटच सुरू होते; व

अखेरीस बळी तो कानपिळी असा प्रकार घडतो. एकाद्या स्थानिक सरकारनें काटकसर केल्यास त्याचा फायदा त्या प्रांताला मिळत नाहीं; ह्यामुळें निष्कारण खर्च टाळण्यास फारच कमी उत्तेजन मिळतें. म्हणून एकाद्या प्रांताच्या उत्पन्नांत वाढवा आला असतांही त्या प्रांताची विशेष सुधारणा करण्याचें साधन राहात नसे. ह्यामुळें स्थानिक सरकारांना एकंदर देशाचें उत्पन्न वाढविण्याची आस्थाही अगदींच कमी असे." ही अनिष्ट स्थिति नाहींशी करण्यासाठीं लॉर्ड मेयो यांनीं ज्या सुधारणा योजिल्या, त्यांच्या सुरवातीचें श्रेय बहुतांशीं जनरल रिचर्ड स्ट्राचे यांना असून त्यांचे बंधु सर जॉन स्ट्राचे यांचा हुद्दयाच्या नात्यानें त्यांना दुजोरा मिळाला, व त्यांच्या अनुभवाचाही फायदा मिळाला; हें एथें नमूद करणें वाजवी आहे. तथापि ह्या देशांत येण्यापूर्वी स्टेट सेक्रेटरी यांच्या कचेरींत इकडील स्थितीविषयीं पूसतपास करीत असतां, प्रांतिक सरकारच्या जमाखर्चाचा हा प्रश्न प्रथमतः लॉर्ड मेयो यांच्याच ध्यानीं आला; व कलकत्त्यास जातांना वाटेंत मद्रास एथें त्यांनीं ह्या प्रश्नाचा ऊहापोह केला.

देशाच्या उत्पन्नांत देशाच्या खर्चाची कायमची तोंडमिळवणी करून देणें, हें लॉर्ड मेयो यांजवर पडलेलें तिसरें व सर्वांत जबाबदारीचें काम होय. त्यांनीं कांहीं थोडा नवीन कर बसवून व विशेषतः खर्चांत बेतबात व काटकसर करून हें काम तडीस नेलें. १८६९ च्या जान्युआरी महिन्यांत एथें आल्याबरोबर लॉर्ड मेयो यांना आढळून आलें कीं, आपणांस प्रथमतः दोन खलित्यांचा

विचार कर्तव्य आहे. पहिला खलिता त्यांच्या पूर्वींचे व्हाइसराय लॉर्ड लॉरेन्स यांचा असून त्यांत प्राप्तीवर कर ( इन्कम् टॅक्स ) बसविण्याविषयीं त्यांनीं स्टेट सेक्रेटरी यांस आग्रह केला होता. वास्तविक पाहिलें असतां पूर्वीं लायसेन्स ( एकादा व्यापारधंदा वगैरे करण्यासाठीं परवाना मिळण्याबद्दल ) टॅक्स होता; तोच विशेष व्यापक करून त्याला प्राप्तीवरील कराचें स्वरूप द्यावयाचें; असें म्हटलें असतां अधिक शोभेल. लवकरच सुरू होणाऱ्या १८६९-७० सालापासून ह्या कराची अंमलबजावणी व्हावयाची. लॉर्ड लॉरेन्स यांच्या ह्या सूचनेस स्टेट सेक्रेटरी यांनीं मंजुरी दिली; त्या संबंधाचा दुसरा खलिता होय. ह्याप्रमाणें लॉर्ड मेयो हे हिंदुस्तानांत येण्यापूर्वींच प्राप्तीवर कर बसविण्याचा ठराव झालेला होता. ह्मणून हिंदुस्तानचें उत्पन्न वाढविण्यासाठीं त्यांचा पहिला उपाय म्हणजे तो कर बसविणें हा होय. शिवाय इतर कित्येक प्रांतांतून मिठावरील कर एका प्रमाणांत आणून मिठाचा पुरवठा होण्याचीं साधनेंही वाढवावयाचीं, तसेंच तें प्रांतोप्रांतीं नेण्यास लागणारा खर्च कमी करण्याचा त्यांनीं प्रयत्न केला. अशा उपायांनींही त्यांनीं हिंदुस्तानचें उत्पन्न वाढविण्याचा पाया घातला; व ह्या कामीं प्रजेवर जितका कमी बोजा ठेवितां येईल तितकाच त्यांनीं ठेविला.

तथापि शिलक पाडण्याच्या कामीं वाढलेल्या करावर फारशी भिस्त न ठेवितां खर्चांत बेतबात राखण्यावरच त्यांनीं विशेष भिस्त ठेविली. इतकेंच नाहीं, तर निर्गत मालावरील जकातीसारखे हिंदुस्तानांत जे कित्येक अयोग्य

कर होते, त्यांतील कांहीं बंद करणें अवश्य आहे, अशी त्यांची पक्की समजूत होती; व बाह्य देशीं जाणाऱ्या गव्हांवरील जकात बंद करून त्यांनीं त्या कामास आरंभही केला. शिवाय खर्चाच्या प्रत्येक खात्याची त्यांनीं बारकाईनें तपासणी केली; व त्या खात्यांचें काम उत्कृष्ट रीतीनें चालण्यास व्यत्यय येणार नाहीं अशा बेतानें त्यांत करण्यासारखी सर्व काटकसर त्यांनीं मोठ्या कडक रीतीनें केली. अशी काटकसर केली व प्रांतांवर नवीन कर बसविला; तरी प्रत्यक्ष पाहिलें असतां यांच्या तीन वर्षांच्या कारकीर्दींत ह्यांच्या पूर्वीच्या वर्षांपेक्षां–१८६८–६९ सालापेक्षां–सरासरीनें हिंदुस्तानचें वार्षिक उत्पन्न सुमारें १० लक्ष पौंडांनीं कमीच असे; व खर्च दरसाल सुमारें ५० लक्ष पौंडांनीं कमी असे. त्यांच्या कारकीर्दीपूर्वीं कित्येक वर्षें सालोसाल तूट पडत असे. परंतु जमाखर्चाचा बंदोबस्त दक्षतेनें ठेवून त्यांनीं उलट ओळीनें शिलक पाडण्यास सुरवात केली. त्यांच्या त्या पद्धतीचा परिणाम पुढील कोष्टकावरून नजरेस येईल. पार्लमेंटसंबंधी जमाखर्चाशीं लावून पाहतां यावें म्हणून त्या वेळची रुपयाची सरकारी किंमत हिशेबांत घेऊन ह्या कोष्टकांतील आंकडे दिले आहेत. ह्यास्तव पृष्ठ २२४ मधील कोष्टकांत दाखविल्याप्रमाणें शिलकेचा पौंडांत नक्की आंकडा एथें नजरेस येत नाहीं.

**लॉर्ड मेयो यांच्या कारकीर्दींतील हिंदुस्तानचें उत्पन्न व खर्च** ( त्या वेळची पौंडाची सरकारी किंमत जी १० रुपये ती हिशेबांत धरून ):—

| वर्ष. | उत्पन्न. | | साधारण खर्च. |
| --- | --- | --- | --- |
| १८६८–६९ | पौं. ५१६५७६५८ | लॉर्ड मेयो यांच्या कारकीर्दीपूर्वीचें तुटीचें साल. | पौं. ५४४३१६८८ |
| १८६९–७० | ५०९०१०८१ | जमा व खर्च बरोबर असल्याचें त्यांच्या कारकीर्दीचें पहिलें वर्ष. | ५०७८२४१३ |
| १८७०–७१ | ५१४१३६८५ | त्यांच्या कारकीर्दींतील शेवटचीं दोन शिलकेचीं वर्षें. | ४९९३०६९५ |
| १८७१–७२ | ५०११०९३ | | ४६९८४९१५ |

त्यांच्या परिश्रमामुळें कायमचा घडून आलेला सुपरिणाम त्यांच्या हयातींत त्यांच्या नजरेस पडला नाहीं. तथापि हिंदुस्तानच्या जमाखर्चासंबंधीं खात्याच्या सेक्रेटरींनीं लॉर्ड मेयो यांच्या मृत्यूनंतर तीन वर्षांनीं ह्या बाबतींत सर विल्यम हंटर यांस एक पत्र लिहिलें. इतक्या कालावधींत त्यांच्या तजविजींना आयतीच कसोटी लागली होती. ह्यास्तव त्यांच्या योजनांची ही संक्षिप्त हकीगत तें पत्र एथें देऊन पुरी करण्यासारखा उत्तम मार्ग नाहीं. सदर्हू पत्र असें:—

“ जमाखर्चाच्या बाबतींत अति सूक्ष्म रीतीनें मन घालण्याचें त्यांचें काम कधींच मंदावलें नाहीं. कैक

दिवस तूट पडत असे, तिच्या ऐवजीं दृढनिश्चयानें उपाय योजून सतत शिलक पाडण्याची त्यांनीं सुरवात केली; तसेंच वरिष्ठ सरकारच्या खजिन्यावर प्रांतिक सरकारें अधिकाधिक मागणी करीत तिला त्यांनीं आळा घातला. तथापि आपापल्या प्रांतांच्या जमाखर्चासंबंधीं जास्त अधिकारही त्यांनीं त्या सरकारांना दिले. देशाच्या खर्चावर व्यवस्थित रीतीनें नजर ठेवून तो बेताबातानें करण्याची पद्धति त्यांनीं सुरू केली. त्यांच्या एकंदर परिश्रमांचें व त्यांनीं सोसलेल्या त्रासाचें सार्थक होण्याचा काळ आतां येत चालला होता; म्हणजे आपणांस नाखुषीनें बसवाव्या लागलेल्या कराचें ओझें कमी करण्याचें सामर्थ्य त्यांच्या आंगीं येऊन तेणेंकरून त्यांच्या मनाला समाधान वाटण्याचा काळ येत चालला होता. फार कशाला, ज्या प्रवासामुळें त्यांचा असा शोचनीय शेवट झाला, त्या प्रवासांत देखील कराचें ओझें कमी कसें करावें, ह्या प्रश्नाचा त्यांचा विचार सुरूच होता. कराचें ओझें उत्कृष्ट रीतीनें कमी करणें शक्य आहे अशी आशा बाळगण्यास त्यांना आधार होता. तथापि कोणता कर कमी केला पाहिजे, ह्याविषयीं त्यांच्या मनाचा अद्यापि निश्चय ठरला नव्हता. रयतेवरील कराचा बोजा कमी केल्यानें प्रजेला आनंदच व्हावयाचा होता; व असे उपाय योजण्याचें सामर्थ्य हिंदुस्तान सरकारला पुढें लवकरच आलें. तथापि लॉर्ड मेयो यांनीं खर्चांत काटकसर करून बेतबात राखण्याचें धोरण मोठ्या निश्चयानें सुरू केल्यामुळेंच असें सामर्थ्य पुढें हिंदुस्तान सरकारला आलें; ही गोष्ट कधीं विसरून उपयोग नाहीं.

"त्यांच्या कारकीर्दीच्या आरंभीं त्यांना जमाखर्चांत भयंकर तूट आढळली. परंतु आपल्या कारकीर्दीच्या अखेरीस त्यांनीं चांगलीच शिलक पाडिली. पूर्वीं अंदाजपत्रकें नेहमीं बेभरवशाचीं असत; परंतु ह्यांच्या कारकीर्दींत त्यांवर पूर्ण विश्वास ठेवितां येऊं लागला. पूर्वींचे जमाखर्च पुरे नसून आंकड्यांची माहिती अर्धवट असल्याचें त्यांना आढळून आलें. तथापि त्यांच्या कारकीर्दीच्या अखेरीस तेच वेळच्या वेळीं पुरे होऊं लागले. पूर्वीं स्थानिक सरकारें व वरिष्ठ सरकार ह्यांजमधील संबंध समाधानकारक नसून जमाखर्चासंबंधीं अयोग्य प्रकारचीं बंधनें स्थानिक सरकारांवर असल्यामुळें त्यांना आपापल्या प्रांतांचें हित साधण्यास अडथळा येत असे; असें त्यांना आढळलें. परंतु यांच्या कारकीर्दीच्या अखेरीस स्थानिक सरकारें आपापला राज्यकारभार हिंदुस्तान सरकारच्या देखरेखीखालीं आस्थापूर्वक एकमतानें व स्वतंत्रपणानें चालवूं लागलीं. पूर्वीं जमाखर्चासंबंधीं खात्याचें एकंदर काम ढिलाईनें चालत असे; परंतु ह्यांनीं तें मोठ्या खबरदारीनें व उत्कृष्ट रीतीनें चालेलसें केलें. सारांश, लॉर्ड मेयो यांचीं जमाखर्चासंबंधीं तत्त्वें निर्दोष असून त्यांचें त्यांना अत्यन्त महत्त्व वाटे; व त्यांच्या अमलांत त्या तत्त्वांची पूर्ण उपयुक्तता सिद्ध झालेली होती. म्हणून ह्या तत्त्वांना अनुसरून जमाखर्चाची व्यवस्था राहील तोंपर्यंत, ज्या प्रकारच्या विपत्तींतून हिंदुस्तानची सुटका त्यांनीं केली, तशा विपत्तींत हा देश पुनः पडावयाचाच नाहीं."

# प्रकरण सातवें.

## लॉर्ड मेयो यांचें लष्करी धोरण.

[ यांच्या वेळची एकंदर ब्रिटिश फौज.—लष्करी खर्चांत काटकसर करण्याविषयीं त्यांजवर स्टेट सेक्रेटरी यांनीं टाकिलेला बोजा.—काटकसरीचीं दोन अंगें.—गोऱ्या फौजेसंबंधानें त्यांचे विचार.—त्या फौजेच्या खर्चांत केलेली काटकसर.—काळ्या फौजेंतील काटकसरीसंबंधानें त्यांचे दोन विचार.—ह्या संबंधानें अखेरीस स्टेट सेक्रेटरी यांस सूचना:—काळ्या फौजेच्या तोफखान्यासंबंधीं काटकसर.—बंगालच्या फौजेंत काटकसर.—मद्रासच्या फौजेंत काटकसर.—मुंबईच्या फौजेंत काटकसर.—काळ्या फौजेंतील काटकसरीचा एकंदरीनें परिणाम.—काटकसरीसाठीं सैन्याचें सामर्थ्य त्यांनीं कमी होऊं दिलें नाहीं.—ह्यांनीं सुचविलेल्या सुधारणांचे परिणाम:—स्टेट सेक्रेटरी यांनीं उलट सुचविलेले उपाय.—स्टेट सेक्रेटरी यांच्या उपायांवर हिंदुस्तान सरकारचें उत्तर.—ह्यांच्या कारकीर्दीत अमलांत आलेल्या सुधारणांमुळें झालेली काटकसर.—यांच्या लष्करी उपायांसंबंधानें एका प्रख्यात अधिकाऱ्याचें मत.—सैन्यासंबंधीं त्यांच्या किरकोळ सुधारणा.—ह्या संबंधानें त्यांचा आणखी एक उतारा.—ह्या प्रकरणाचा उपसंहार. ]

१८५७ सालच्या बंडानंतर हिंदुस्तान सरकारपाशीं राहिलेल्या मोठ्या सैन्याचे मुख्य दोन भाग होते:—एक अगदीं अव्यवस्थित होऊन गेलेलें अफाट काळें ( नेटिव्ह ) सैन्य, व दुसरें गोरें ( युरोपियन ) सैन्य. गोरें सैन्य काळ्यापेक्षां कमी होतें, परंतु त्याची तयारी उत्तम प्रकारची होती; बंडांतील निकराच्या प्रसंगांमुळें तें काटक झालेलें होतें; व युद्धप्रसंगाला केव्हांही सज्ज राहील अशा बेतानेंच त्याची व्यवस्था

ठेविलेली होती. बंडामुळें मिळालेल्या शिक्षणाचें विस्मरण इंग्लिशांना कधीं होणारें नव्हतें. बंडाच्या आदल्या वर्षी काळें सैन्य २४९१५३ व गोरें सैन्य ४५५२२ होतें. बंडापासून इंग्लिशांनीं धडा घेतला; त्याचा परिणाम असा झाला कीं, काळें सैन्य त्यांनीं जवळ जवळ निमें कमी केलें; व गोरें सैन्य दीडपटीवर वाढविलें. बंडासंबंधीं धामधूम चालू राहण्याची भीति १८६२ त काडीमात्र राहिली नाहीं; व देशांत इतःपर सर्वत्र शांतता राहणार अशा समजुतीनें नवीन ठरविलेल्या व्यवस्थेच्या धोरणा-वर ह्या सैन्यांची संख्या तेव्हांपासून राहूं लागली. ह्या सालीं काळ्या सैन्यांत वरिष्ठ कामगार व शिपाई मिळून १४०५०७ लोक असून गोरें सैन्य ७५३३७ होतें. लॉर्ड लॉरेन्स यांची गव्हर्नर जनरलची कारकीर्द १८६४–६९ पर्यंत मोठी जोरदार झाली. ह्या मुदतींत मुलकी राज्यकारभार विशेष उत्तम प्रकारें चालू लागला; व देशांत सर्वत्र शांतता होऊन तिचा भंग होणार नाहीं असा भर-वसा आला. ह्यामुळें तर सैन्य आणखी कमी करितां आलें. सारांश, ता. १ एप्रिल १८६९ रोजीं कामगार व शिपाई वगैरे मिळून काळें सैन्य १३३३५८ राहून गोरें सैन्य ६१९४२ राहिलें.

लॉर्ड मेयो हे कलकत्त्यास पोहोंचले तेव्हांची वस्तु-स्थिति अशी होती परंतु ते आल्यानंतर १५ दिव-सांनींच तेव्हांचे हिंदुस्तानचे स्टेट सेक्रेटरी ड्यूक ऑफ् आर्गइल ह्यांनीं त्यांस एक खलिता लिहिला. त्या योगानें हिंदुस्तानच्या लष्करी खात्याच्या सुधारणेच्या संबंधानें

नवीन नवीन प्रश्न उपस्थित झाले. ड्यूक ऑफ् आर्गइल यांनीं त्यांच्या नजरेस आणिलें कीं, बंडापासून सैन्याची संख्या कमी झाली खरी; तथापि १८५६-५७ सालीं सैन्याचा खर्च १ कोटि २७¾ लक्ष पौंड होता तो १८६८-६९ सालीं १ कोटि ६० लक्ष पौंडांवर गेला. तसेंच पोलीस खात्याची नवीन व्यवस्था होऊन तिकडे बराच खर्च होऊं लागला; परंतु ह्या नवीन पोलीस व्यवस्थेमुळें लष्करीखात्यांत काटकसर होईल असा अजमास होता, त्याप्रमाणें मात्र घडून आलें नाहीं; ह्याचाही उल्लेख त्यांनीं त्या खलित्यांत करून हिंदुस्तानांतील लष्करी खात्याच्या खर्चामध्यें १९ लक्ष पौंडांची काटकसर करण्यासाठीं व्हाइसराय कांहीं शक्कल काढतील, अशी उमेद त्यांनीं शेवटीं प्रदर्शित केली.

लष्करीखात्यांत काटकसर करण्यास दोन अगदीं भिन्न भिन्न मार्ग आहेत असें लॉर्ड मेयो यांच्या नजरेस आलें:—
( १ ) लष्करीखात्याच्या कारभारांत काटकसर करणें; व
( २ ) फौजेची संख्या कमी करणें. ह्यांतील प्रत्येक भागाचे पुनः दोन पोटभाग पडतातच. पहिल्या भागाचे पोटभाग म्हणजे (अ) लष्करीखात्यांतील कामगारांत छाटाछूट व (ब) प्रत्यक्ष लष्करीखात्यांत छाटाछूट. दुसऱ्या भागाचे पोटभाग म्हणजे ( अ ) गोरें सैन्य कमी करणें व ( ब ) काळें सैन्य कमी करणें. तपासाअंतीं त्यांची अशी खात्री झाली कीं, लष्करी कामगारांत व लष्करीखात्यांत सामर्थ्यासंबंधानें कोणत्याही प्रकारचें न्यून पडूं न देतां एकंदर मिळून ७९००० पौंडांचा खर्च कमी करितां येण्याजोगा आहे;

व त्यांनीं तशी छाटाछूट सक्तीनें अमलांतही आणिली. परंतु गोरें सैन्य व काळें सैन्य कमी करण्याचा प्रश्न येऊन ठेपला; तेव्हां तो पहिल्यापेक्षां विशेष घोटाळ्याचा आहे, असें त्यांना आढळून आलें; आणि त्यांच्या ह्या संबंधाच्या विचारांविषयीं कित्येकांचा गैरसमज होत गेला आहे, ह्यास्तव ते त्यांचे विचार जसेच्या तसेच येथें देण्याचा प्रयत्न केला आहे.

गोऱ्या सैन्यासंबंधानें त्यांची अशी समजूत होती कीं, हिंदुस्तानांत फाजील एकही गोरा शिपाई नाहीं. राणी सरकारच्या प्रधानमंडळांपैकीं एकाला ह्या संबंधानें त्यांनीं एक खाजगी पत्र लिहिलें होतें. त्यांत काटकसरीसाठीं आपण योजिलेल्या उपायांचें आग्रहपूर्वक प्रतिपादन करून पुढें ते म्हणतातः—“ माझी सविनय प्रार्थना अशी आहे कीं, आपण गोऱ्या सैन्यापैकीं एकही शिपाई कमी करूं नये: मग तो घोडेस्वारांपैकीं असो किंवा पायदळांतील असो. माझी खरोखर समजूत आहे कीं, लाल डगल्याच्या गोऱ्या तोंडाच्या माणसांपैकीं एकाही माणसास रजा दिल्याशिवाय आपणास लष्करी खर्चांत दहा लक्ष पौंडांची काटकसर करितां येईल.” ह्यानंतर कित्येक आठवड्यांनीं ते आपल्या सरकारी खलित्यांत लिहितातः— “ ह्या देशांत एकही फाजील गोरा शिपाई आपल्या सैन्यांत नाहीं असें जें मत आहे, तें आमच्या मनांत पक्कें बिंबलें आहे. गोरी फौज कोणत्याही प्रकारें कमी करण्यास आमची फार हरकत आहे. कारण तसें केल्यास आपल्या सत्तेस धोका बसल्याशिवाय व ती कमजोर

झाल्याशिवाय राहणार नाहीं; अशी आमची खात्री आहे. व ही सत्ता म्हणजेच ब्रिटिश राज्याचा एक मुख्य आधारस्तंभ आहे. ''

अशी वस्तुस्थिति होती तरी गोऱ्या फौजेकडे होणाऱ्या खर्चांत ५ लाख पौंडांची काटकसर करण्याचा त्यांनीं निश्चय केला. शिवाय ही काटकसर अशा रीतीनें करावयाची कीं, सैन्यांपैकीं एकाही माणसाला फाटा द्यावयाचा नाहीं, अथवा कामगारांच्या किंवा शिपायांच्या पगारांत पैही कमी करावयाची नाहीं. हिंदुस्तानांतील गोऱ्या सैन्याचें पूर्णपणें जें सामर्थ्य असावयाचें तें हळू हळू कमी होत आलें होतें. त्यामुळें तें सामर्थ्य कायम राखण्यासाठीं गोऱ्या पलटणींची संख्या वाढवावी लागली होती. ह्याप्रमाणें पलटणींची संख्या वाढल्यामुळेंच मुख्यत्वें लष्करी खर्च वाढला होता, असें त्यांनीं सिद्ध केलें. म्हणून या वाढलेल्या खर्चाबद्दल स्टेट सेक्रेटरी यांनीं वर दर्शविल्याप्रमाणें तक्रार केली; हें यथायोग्यच झालें. प्रत्येक पलटणींतील जवानांची संख्या वाढवून एकंदर पलटणींची संख्या कमी करावयाची; मात्र एकंदर लष्कराची संख्या कायमच ठेवावयाची; असा त्यांनीं बेत केला. सारांश, गोऱ्या पलटणींच्या संख्येमध्यें फाजील ११ पलटणी वाढून त्यांजबद्दल खर्च वाढला होता. ती वाढलेली संख्या ह्या व्यवस्थेनें कमी होणार होती. तसेंच ह्या पलटणींची संख्या विनाकारण वाढल्यामुळें त्यांचीं सदर स्टेशनें वाढून हिंदुस्तानच्या तिजोरीवर जो विलक्षण बोजा पडत होता. प्रत्येक पलटणींतील शिपायांच्या

रांगा किंचित् वाढवावयाच्या; परंतु पलटणींतील कामगारांचे व शिपायांचे पगार पूर्वींचेच रहावयाचे. ह्याप्रमाणें केवळ पलटणींची संख्या कमी केल्यानें सैन्याची योग्यता कमी होणार नाहीं; व पलटणींची फाजील वाढलेलीं ठाणीं कमी केल्यानें व अशाच प्रकारचे घोडेस्वारांसंबंधीं व पायदळासंबंधीं खर्च कमी केल्यानेंच दरसाल २९७२२० पौंडांची शिलक राहणार होती. तोफखान्यांत जरी अगदीं ह्याच प्रकारची काटकसर करितां येण्याजोगी नव्हती; तरी ह्या धोरणावर करितां येण्यासारखी होती; व ह्यामुळें दरसाल आणखी २७१५४२ पौंड शिलक पडणार होती. ह्याप्रमाणें गोऱ्या सैन्यांत एकंदर काटकसर ५६८७६२ पौंड व्हावयाची.

काळ्या सैन्यांतील काटकसरीसंबंधानें लॉर्ड मेयो यांनीं लिहिलेले अभिप्राय वाचले असतां दोन विचार त्यांना पडल्याचें तेव्हांच दिसून येतें. पहिला असा कीं, उत्तर हिंदुस्तानची सरहद्द लांबलचक असून तिच्या संरक्षणार्थ तजविजी झालेल्या नाहींत, व त्या सरहद्दीच्या आंत तेव्हांच अस्वस्थता उत्पन्न होण्याजोगीं अनेक कारणें आहेत. म्हणून बंगाल्यांतील काळ्या घोडेस्वारांत किंवा पायदळांत म्हणण्यासारखी काटकसर करतां येणें अशक्य आहे. दुसरा विचार असा कीं, बंगालच्या काळ्या फौजेला धक्का न लावितां फक्त मद्रास व मुंबई इलाख्यांतील काळ्या फौजेंतच काटकसर केल्यास त्या फौजांना चीड येणार; कारण त्यांना स्वाभिमान असावयाचाच. सारांश, हिंदुस्तानांतील काळ्या सैन्याचे असे तीन मुख्य पोट-

भाग असून आपापल्या विभागासंबंधानें प्रत्येक इलाख्यांतील सैन्याची विशेष प्रेमबुद्धि असावयाचीच. म्हणून ह्या तिन्ही सैन्यांपैकीं कोणाच्याही मनाला होतां होई तों न दुखविण्याविषयीं व्हाइसराय व कमांडर-इन्-चीफ ( सेनापति ) ह्या उभयतांची उत्कट इच्छा असे. तथापि त्यांचें मुख्य कर्तव्य म्हणजे, एकंदर ब्रिटिश हिंदुस्तानच्या संरक्षणास धोका पोहोंचणार नाहीं, अशा बेतानें काय ती काटकसर करावयाची. अर्थात् ठिकठिकाणच्या सैन्याच्या सर्व सोईगैरसोईपेक्षां हें कर्तव्य जास्त महत्त्वाचें होतें.

लष्करी कामकाजांतील सल्लामसलतगारांबरोबर व स्थानिक सरकारांबरोबर ह्या विषयाची बराच काळ मोठ्या आस्थेनें चर्चा केल्यानंतर त्यांनीं ह्या बाबतींत खालीं लिहिल्याप्रमाणें स्टेट सेक्रेटरी यांस सूचना केल्या.

काळ्या फौजेच्या तोफखान्यासंबंधानें अलीकडे असें धोरण ठरलें होतें कीं, काळे गोलंदाज कमी करावे. हेंच धोरण लॉर्ड मेयो यांनीं अंगीकारिल्यामुळें ह्या संबंधाच्या त्यांच्या सूचना स्टेट सेक्रेटरी यांनीं तेव्हांच मंजूर केल्या. त्यांनीं बंगालसंबंधीं दोन मोर्चेबंदीचीं ठाणीं उठविलीं; [ म्हणजे आसामांतील युरेजियन मोर्चेबंदीचें ठाणें व पंजाब सरहद्दीवरील फौजेचें मोर्चेबंदीचें ठाणें ]; मद्रास इलाख्यांतील तोफखान्याकडील काळ्या सैन्याची तुकडी कमी केली; व मुंबई इलाख्यांतील तोफखान्याकडील एक काळी तुकडी कमी केली. तोफखान्याकडील काळ्या फौजेंत एकंदरीनें चार मोर्चेबंदीचीं ठाणीं अथवा तुकडया कमी केल्या. ह्यामुळें दरसाल १७००३ पौंड काटकसर झाली.

रांगा किंचित् वाढवावयाच्या; परंतु पलटणींतील कामगारांचे व शिपायांचे पगार पूर्वींचेच रहावयाचे. ह्याप्रमाणें केवळ पलटणींची संख्या कमी केल्यानें सैन्याची योग्यता कमी होणार नाहीं; व पलटणींची फाजील वाढलेलीं ठाणीं कमी केल्यानें व अशाच प्रकारचे घोडेस्वारांसंबंधीं व पायदळासंबंधीं खर्च कमी केल्यानेंच दरसाल २९७२२० पौंडांची शिलक राहणार होती. तोफखान्यांत जरी अगदीं ह्याच प्रकारची काटकसर करितां येण्याजोगी नव्हती; तरी ह्या धोरणावर करितां येण्यासारखी होती; व ह्यामुळें दरसाल आणखी २७१५४२ पौंड शिलक पडणार होती. ह्याप्रमाणें गोऱ्या सैन्यांत एकंदर काटकसर ५६८७६२ पौंड व्हावयाची.

काळ्या सैन्यांतील काटकसरीसंबंधानें लॉर्ड मेयो यांनीं लिहिलेले अभिप्राय वाचले असतां दोन विचार त्यांना पडल्याचें तेव्हांच दिसून येतें. पहिला असा कीं, उत्तर हिंदुस्तानची सरहद्द लांबलचक असून तिच्या संरक्षणार्थ तजविजी झालेल्या नाहींत, व त्या सरहद्दीच्या आंत तेव्हांच अस्वस्थता उत्पन्न होण्याजोगीं अनेक कारणें आहेत. म्हणून बंगाल्यांतील काळ्या घोडेस्वारांत किंवा पायदळांत म्हणण्यासारखी काटकसर करतां येणें अशक्य आहे. दुसरा विचार असा कीं, बंगालच्या काळ्या फौजेला धक्का न लावितां फक्त मद्रास व मुंबई इलाख्यांतील काळ्या फौजेंतच काटकसर केल्यास त्या फौजांना चीड येणार; कारण त्यांना स्वाभिमान असावयाचाच. सारांश, हिंदुस्तानांतील काळ्या सैन्याचे असे तीन मुख्य पोट-

भाग असून आपापल्या विभागासंबंधानें प्रत्येक इलाख्यांतील सैन्याची विशेष प्रेमबुद्धि असावयाचीच. म्हणून ह्या तिन्ही सैन्यांपैकीं कोणाच्याही मनाला होतां होई तों न दुखविण्याविषयीं व्हाइसराय व कमांडर-इन्-चीफ ( सेनापति ) ह्या उभयतांची उत्कट इच्छा असे. तथापि त्यांचें मुख्य कर्तव्य म्हणजे, एकंदर ब्रिटिश हिंदुस्तानच्या संरक्षणास धोका पोहोंचणार नाहीं, अशा बेतानें काय ती काटकसर करावयाची. अर्थात् ठिकाठिकाणच्या सैन्याच्या सर्व सोईगैरसोईंपेक्षां हें कर्तव्य जास्त महत्त्वाचें होतें.

लष्करी कामकाजांतील सल्लामसलतगारांबरोबर व स्थानिक सरकारांबरोबर ह्या विषयाची बराच काळ मोठ्या आस्थेनें चर्चा केल्यानंतर त्यांनीं ह्या बाबतींत खालीं लिहिल्याप्रमाणें स्टेट सेक्रेटरी यांस सूचना केल्या.

काळ्या फौजेच्या तोफखान्यासंबंधानें अलीकडे असें धोरण ठरलें होतें कीं, काळे गोलंदाज कमी करावे. हेंच धोरण लॉर्ड मेयो यांनीं अंगीकारिल्यामुळें ह्या संबंधाच्या त्यांच्या सूचना स्टेट सेक्रेटरी यांनीं तेव्हांच मंजूर केल्या. त्यांनीं बंगालसंबंधीं दोन मोर्चेबंदीचीं ठाणीं उठविलीं; [ म्हणजे आसामांतील युरेजियन मोर्चेबंदीचें ठाणें व पंजाब सरहद्दीवरील फौजेचें मोर्चेबंदीचें ठाणें ]; मद्रास इलाख्यांतील तोफखान्याकडील काळ्या सैन्याची तुकडी कमी केली; व मुंबई इलाख्यांतील तोफखान्याकडील एक काळी तुकडी कमी केली. तोफखान्याकडील काळ्या फौजेंत एकंदरीनें चार मोर्चेबंदीचीं ठाणीं अथवा तुकड्या कमी केल्या. ह्यामुळें दरसाल १७००३ पौंड काटकसर झाली.

बंगालच्या काळ्या फौजेंतील घोडेस्वार व पायदळ ह्यांसंबंधानें व्हाइसराय यांचें अखेरीस असें मत ठरलें कीं, ह्यांतून एकही मनुष्य कमी करितां येण्यासारखा नाहीं. त्यांच्या लष्करी सल्लामसलतगारांनींही असाच पुरावा आणिला होता. तथापि निरनिराळ्या पलटणींची संख्या कमी केल्यानें व राहिलेल्या पलटणींची स्थिति विशेष रीतीनें सुधारिल्यानें बरीच काटकसर करितां येईल असें त्यांना आढळून आलें; व ह्या कामीं त्या सल्लामसलतगारांचीही त्यांना संमति मिळाली. म्हणून लॉर्ड मेयो यांनीं अशी सूचना केली कीं, बंगालच्या काळ्या फौजेपैकीं घोडेस्वारांची एक पलटण व पायदळांपैकीं एक पलटण मिळून दोन पलटणी कमी कराव्या; व हे सर्व शिपाई राहिलेल्या इतर पलटणींतून असे वांटून द्यावे कीं, बंगालच्या काळ्या फौजेंतील शिपायांची एकंदर संख्या कायम राहील. ह्या व्यवस्थेनें दरसाल २७२०० पौंडांची काटकसर व्हावी.

मद्रासच्या काळ्या फौजेसंबंधानें मद्रासचे गव्हर्नर लॉर्ड नेपियर ऑफ् एट्रिक यांच्या ठरावाला अनुसरून ते चालले. हिंदुस्तानचे कमांडर–इन्–चीफ लॉर्ड स्यांढर्स्ट–मुंबईस ह्याच नांवाचें एक गव्हर्नर होऊन गेले ते हे नव्हत—व मेजर जनरल सर हेन्री डय़ूरंड यांनींही हा ठराव पसंत केलेला होता. मद्रासच्या गव्हर्नरनीं असें लिहिलें होतें:—" माझें मत असें आहे कीं, इलाख्याच्या मानानें वास्तविक जितका खर्च सैन्याकडे होणें जरूर आहे, त्यापेक्षां फार फाजील होत आहे. " वस्तुतः मद्रास

इलाख्याच्या फौजेपैकीं फाजील सैन्य, म्हणजे काळ्या घोडेस्वारांची एक पलटण व पायदळाच्या ५ पलटणी, बंगाल्यांतील निरनिराळ्या ठिकाणीं आज कित्येक वर्षें कामकाजास पाठविण्यांत येत होत्या. अशा प्रकारच्या व्यवस्थेमुळें फार उधळेपणा होत होता, असें प्रत्ययास आलें. ह्याप्रमाणें फक्त ३०० शिपायांच्या मद्रास घोडेस्वार पलटणीस बंगाल्यांत पाठविल्यास दरसाल २२९३७ पौंड खर्च येई; परंतु खुद्द बंगाल्यांतील ३८४ घोडेस्वारांच्या पलटणीस दरसाल फक्त २१९६३ पौंड खर्च येत असे.

मद्रास सैन्यांत कुटुंबांतील माणसें बरोबर बाळगण्याची पद्धति असल्यामुळें तर निरर्थक खर्च अधिकच होत असे. ते शिपाई आपापलीं बायकामुलें बरोबर ठेवीत. आतां इलाख्याबाहेर न जाणाऱ्या स्थाइक सैन्याला ही पद्धति कदाचित् सोईची असेल. परंतु त्या पलटणी इतर इलाख्यांतून पाठविल्यास फार अनिष्ट परिणाम उत्पन्न होतात. उदाहरणार्थ, पटकीच्या सांथींचा आजार सुरू झाला असतां पलटणीचा तळच बदलावयाचा, अशी बंगाल्यांत वहिवाट असे. परंतु मद्रास इलाख्यांतील एका घोडेस्वारांच्या पलटणीसंबंधानें असा प्रसंग आला असतां किती अडचण पडली, तें कमांडर-इन्-चीफ यांना वरिष्ठ सरकारच्या निदर्शनास नुकतेंच आणून द्यावें लागलें होतें. सदर स्टेशनमध्यें खुद्द शिपायांची संख्या २०२ होती; परंतु बायकामुलें व इतर चाकरमाणसें मिळून त्यांजबरोबरच्या इतर माणसांची संख्या १२९६ हून कमी नव्हती.

ह्यास्तव लॉर्ड मेयो यांनीं सुचविलें कीं, मद्रास इलाख्यांतील पलटणी इतःपर त्याच इलाख्यापुरत्या ठेवाव्या. ह्या वेळीं मद्रासच्या पायदळाच्या पांच व घोडेस्वारांची एक अशा सहा पलटणी बंगाल्यांतील निरनिराळ्या ठिकाणीं कामावर होत्या. ह्या पलटणी किंवा ह्यांच्याच इतक्या त्या इलाख्यांतील इतर पलटणी त्यांना वरील उपायानें कमी करतां येणार होत्या. त्यांना आणखी असेंही आढळून आलें कीं, मद्रासच्या पायदळ पलटणींपैकीं आणखीं तीन पलटणी बिनधोक कमी करतां येतील. मद्रास घोडेस्वारांच्या तीन पलटणी मोडून त्यांच्या दोन केल्यानें घोडेस्वारांची एक पलटणही कमी होण्याजोगी होती. सारांश, मद्रासच्या काळ्या फौजेंत एकंदर छाटाछाट व्हावयाची ती अशीः—घोडेस्वार—२ पलटणी ( एक अजी कमी व एक तीन मोडून दोन केल्यामुळें कमी होणारी ); पायदळ—४० पलटणींपैकीं ८ पलटणी कमी. ह्यामुळें दरसाल काटकसर १७८७४५ पौंड.

मुंबई इलाख्यांत जितक्या फौजेची वास्तविक आवश्यकता होती, तितकीच तेथें असल्याचें आढळून आलें. तथापि सिंध प्रांतांत घोडेस्वारांच्या तीन पलटणी असून प्रत्येक पलटणींत तीन तुकड्या [ स्क्वाड्रन्स* ] होत्या. त्या मोडून त्यांऐवजीं ४।४ तुकड्यांच्या दोन पलटणी केल्यानें दरसाल ९९०० पौंड काटकसर करितां येण्यासारखी आहे, असें दिसलें. पायदळासंबंधानें पाहिलें

---

* प्रत्येक स्क्वाड्रनमध्यें १०० पासून २०० पर्यंत घोडेस्वार असतात. ( भा. क. )

असतां, मुंबई इलाख्यांतील दोन पलटणी चीन देशांत होत्या; तेव्हां देखील दोन पलटणी कमी करितां येतील असा प्रश्न उद्भवला होता. या वेळेस तर सदरहू पलटणी चिनाहून परत आल्या होत्या; पोलीस खात्याची व्यवस्था उत्तम झाली होती; इलाख्यांत सर्वत्र शांतता होती; इलाखा फार विस्तृत नसून लोकसंख्याही बेताबाताची होती; व सिंधशिवाय इतर कोठेंही सरहद्दीसंबंधानें संरक्षणाच्या तजविजी करण्याची आवश्यकता नव्हती. ह्या सर्व गोष्टी विचारांत घेऊन गव्हर्नर जनरल इन् कौन्सिल यांनीं आतां असें ठरविलें कीं, मुंबई इलाख्यांतील ४ पायदळ पलटणी बिनधोक कमी करितां येतील; व ह्यामुळें दरसाल ६७७१९ पौंड शिलक राहतील. म्हणून मुंबई इलाख्यांतील काळ्या फौजेंत एकंदर दरसाल काटकसर ७७६१९ पौंड.

ह्या सुधारणा अमलांत आणण्याचें जोखीम बंगालच्या काळ्या फौजेवर पडलें. त्या फौजेचीं तोफखान्यासंबंधीं मोर्चेबंदीचीं २ ठाणीं कमी झालीं; आणि घोडेस्वाराची १ पलटण व ४ पायदळ पलटणी कमी झाल्या. मात्र घोडेस्वार व पायदळ यांच्या एकंदर संख्येंत कमजास्तपणा मुळींच झाला नाहीं. तसेंच मद्रास इलाख्यांतील ६ पलटणी बंगाल्यांत काम करीत होत्या, त्या तिकडे परत पाठवावयाच्या असल्यामुळें त्यांच्या कामाचा बोजाही बंगालच्या फौजेवर पडला. परंतु ह्या गोष्टीस इलाज नव्हता. लॉर्ड मेयो यांच्या ह्या बाबतींतील लष्करी धोरणासंबंधानें कमांडर-इन्-चीफ ह्यांनीं थोडक्यांत असें

लिहिलें आहे:—हरएक प्रकारची भीडमुरवत, तसेंच अमुक फेरफार केल्यानें अमुक इलाख्याचें नुकसान होईल हे विचार; सारांश, जेणेंकरून आपल्यावर पक्षपाताचा यत्किंचित् आरोप येऊं शकेल अशा सर्व गोष्टी आपण मोठ्या निश्चयानें बाजूस ठेविल्या आहेत; व केवळ देशाचें हित कोणत्या गोष्टींत आहे तेवढाच विचार केला आहे.

" ह्या प्रकरणीं सर्व प्रश्नांची बराच काळ मोठी कडाक्याची वाटाघाट आपणांमध्यें झाली. परंतु ती सर्व सुरू असतां आपली मनोवृत्ति केवळ देशाचें कल्याण व्हावें एवढीच होती; असें म्हणण्यास मला शंका नाहीं.

" हिंदुस्तानांतील ज्या भागांत युद्धप्रसंग उत्पन्न होणें अशक्य आहे, त्यांना किती सैन्याची आवश्यकता आहे, ह्याचा अजमास आपणांस ठरवावा लागला. तसेंच ज्या विस्तृत सरहद्दींवर युद्धप्रसंग आपल्याशीं सर्वकाळ दत्त म्हणून उभे आहेत, इतकेंच नाहीं तर जेथें कोणत्याना कोणत्या रूपानें युद्ध सर्वकाळ सुरूच असतें असें म्हणण्यास हरकत नाहीं; अशा त्या सरहद्दींचाही विचार आपणांस करावा लागला. "

ह्याप्रमाणें सैन्यांतील काटकसरीसंबंधाची ही त्यांची योजना त्यांनीं राणी सरकारांकडे पाठविली; तेव्हां त्यांची समजूत अशी होती कीं, हिंदुस्तानांतील सैन्याची स्थिति ह्या योजनेमुळें खरोखर सुधारेल. तेव्हांचे सेनापति लॉर्ड स्यांढर्स्ट व मंत्रिमंडळांतील लष्करी सभासद सर हेन्री ड्यूरंड ह्या उभयतांचाही त्या कामीं त्यांना दुजोरा होता.

लष्करी खात्याच्या कारभारांत बेताबातानें खर्च व्हावा म्हणून त्यांनीं परिश्रम केला खरा. तथापि त्या सैन्याकडून युद्धाच्या वगैरे कामांत उत्कृष्ट प्रकारची कामगिरी बजाविली जावी; अशी स्थिति त्या सैन्यास आणून ती कायम राखण्यास अवश्य तो खर्च करण्यास त्यांची अगदीं कुरकूर नसे. ह्या विषयासंबंधानें त्यांचा स्वतःचा विचार, तसेंच ज्या प्रख्यात लष्करी सल्लामसलतगारांच्या मसलतींना अनुसरून ते वर्तले त्यांचा विचार, हे दोन्हीही एथें दिले आहेत. लॉर्ड मेयो यांनीं १८७० त आपल्या एका मित्रास लिहिलें:—"हिंदुस्तानांतील प्रत्येक युरोपियन व व्हालंटीयर* इसमास ताबडतोब स्नायडर नांवाच्या बंदुकी देण्याची आवश्यकता आहे; अशी विलायत सरकारास चालू सालीं मी निकड लाविली; व ह्या बाबतींत मला इतर कोणाकडूनही सूचना झाली नव्हती. तोफखान्याची स्थिति निकृष्ट असल्याबद्दल १८६९ च्या अगदीं आरंभापासून ( ह्या कामाचा चार्ज घेतल्यापासून ) मीं सतत निदर्शनास आणून दिलें आहे; व रायफल† तोफांची ताबडतोब सुरवात करण्याविषयीं शिफारस केली आहे. ह्यास्तव खर्च करणें अवश्य असेल तेव्हां काटकसरीचा प्रश्न मी नेहमीं बाजूस ठेवीत असें.

* कोणत्याही प्रकारचा मोबदला मिळण्याची अट न ठेवितां जो इसम देशासाठीं लष्करी काम स्वसंतोषानें बजावण्यास तयार होतो त्याला व्हालंटीयर म्हणतात. ( भा. क. )

† ज्या बंदुकीच्या नळीच्या आंतील भाग मळसूत्राच्या खाचणीप्रमाणें कोरलेला असतो तिला रायफल म्हणतात. अशा खाचणींतून गोळी जावयाची असल्यामुळें तिला गति फार जोराची मिळते.

जेणेंकरून आपल्या लष्कराचें सामर्थ्य कमी होईलसें मला वाटलें, असा एकही उपाय मीं सुचविला नाहीं. तथापि लष्करी खर्चांत बरीच काटकसर करण्याची माझी मनापासून इच्छा आहे. हिंदुस्तानांत अशा कांहीं पलटणी आहेत कीं, त्या कमी केल्यानें आपला फायदाच आहे; व ज्या पलटणींचा युद्धप्रसंगांत उपयोग होईल अशाच पलटणी सज्ज ठेवणें अधिक हितावह आहे; अशी माझी पक्की समजूत आहे. ”

त्यांनीं सुचविलेल्या सुधारणांमुळें घडून आलेले परिणाम थोडक्यांत पुढें दिले आहेत. हिंदुस्तानांतील लष्करी कामगार मंडळी व लष्करी खातीं, ह्या दोहोंत काटकसर करण्याविषयींची त्यांची पहिली सूचना स्टेट सेक्रेटरी यांनीं पूर्णपणें मंजूर केली. परंतु हिंदुस्तानांतील गोऱ्या पलटणींसंबंधानें व काळी फौज कमी करण्यासंबंधानें लॉर्ड मेयो यांनीं सुचविलेले अनेक उपाय त्यांना पूर्णपणें मंजूर करतां आले नाहींत. गोऱ्या घोडेस्वार पलटणींपैकीं ४ पलटणी कमी न करितां त्यांनीं २ कमी केल्या; व पायदळापैकीं ७ कमी न करितां २ कमी केल्या. तथापि राहिलेल्या पलटणींतील शिपायांची संख्या त्यांनीं वाढविली नाहीं; आणि ह्या मुद्यावर तर हिंदुस्तान सरकारचा विशेष कटाक्ष होता. काळ्या फौजेसंबंधानें पाहिलें असतां तोफखान्याच्या बाबतींत सुचविलेली काटकसर स्टेट सेक्रेटरींनीं मंजूर केली; परंतु घोडेस्वार व पायदळ यांत सुचविलेल्या काटकसरी अमलांत आणिल्यास मद्रास सैन्याला फार जड जाणार; असें त्याचें मत पडलें. त्यांनीं

उलट दुसरी तजवीज सुचविली. ती अशी कीं, घोडे-स्वारांपैकीं बंगालच्या दोन व मुंबई व मद्रासपैकीं एक एक अशा ४ पलटणींना फाटा द्यावा; आणि ह्या प्रत्येक इलाख्यांतील २।२ पायदळ पलटणींना, म्हणजे एकंदर ६ ना, फाटा द्यावा.

उलटपक्षीं इकडे हिंदुस्तान सरकारला असें वाटलें कीं, उत्तर हिंदुस्तान व मध्य एशियेला लागून असणारी त्याची अफाट सरहद्द ह्यांचें लष्करीदृष्ट्या संरक्षण होणें असेल तर स्टेट सेक्रेटरी यांनीं सुचविलेली योजना अमलांत आणतां यावयाची नाहीं. ह्यास्तव त्यांनीं अशी तोडजोड सुचविली कीं, प्रत्येक इलाख्यांतील एक एक, ह्याप्रमाणें काळ्या घोडेस्वारांपैकीं ३ पलटणी कमी कराव्या; व पायदळापैकीं बंगालमधील २, मद्रासपैकीं ४ व मुंबई-पैकीं २, मिळून ८ पलटणी कमी कराव्या. हिंदुस्तान सरकारच्या ह्या सूचनेचा राणी सरकारच्या मंत्र्यांनीं लक्ष-पूर्वक विचार केला; व लॉर्ड नेपियर ऑफ् मागडाला यांचाही ह्या कामीं त्यांनीं अभिप्राय घेतला. पूर्वींचे कमांडर -इन्-चीफ लॉर्ड स्यांढर्स्ट यांचें ह्या बाबतींतील मत लॉर्ड नेपियर यांस मान्य नव्हतें. तेव्हां अखेरीस राणी सर-कारच्या मंत्र्यांना हिंदुस्तान सरकारची ही तोडजोड मान्य होईना. म्हणून त्यांनीं तिसरा एक उपाय सुच-विला. ह्या अन्वयें एकंदर काळ्या फौजेपैकीं ९००० सैन्य कमी व्हावयाचें; व तें प्रत्येक इलाख्यांत सारखें, म्हणजे ३००० कमी व्हावयाचें. तथापि हिंदुस्तान सरकारची अशी समजूत होती कीं, अशा रीतीनें सैन्य

कमी करणें हें लष्करीदृष्ट्या धोक्याचें आहे. म्हणून त्यांनीं पूर्वीं केलेल्या सूचनाच पुनः विचारासाठीं परत पाठविल्या. सारांश, लॉर्ड मेयो यांच्या मरणकालीं ह्या प्रश्नानीं मजल एथवरच पोहोंचली होती.

लष्करी खात्यासंबंधानें त्यांनीं सुचविलेल्या ह्या उपायांपैकीं सर्व नाहींत तरी बरेच यांच्या कारकीर्दींत अमलांत आले. वास्तविक पाहतां ही गोष्ट त्यांच्या राज्यकारभारासंबंधीं हरएक खात्याला लागू आहे. त्यांची अगदीं मूळची सूचना अमलांत आली असती तर अखेरीस लष्करी खर्चांत दरसाल ९४८२५३ पौंडांची काटकसर झाली असती. तथापि त्यांच्या सूचनांपैकीं ज्या सूचना राणी सरकारांनीं मंजूर केल्या व प्रत्यक्ष अमलांत आल्या, त्यांमुळें दरसाल ५०.१४४० पौंड खर्च कमी झाला.

हिंदुस्तानचा लष्करासंबंधीं साधारण कारभार कमांडर-इन-चीफ हे चालवितात. ह्यास्तव लॉर्ड मेयो यांच्या कारकीर्दींत प्रत्येक बाबींत घडून आलेल्या सुधारणांचें श्रेय त्या मुदतींतील सेनापति लॉर्ड स्यांढर्स्ट व लॉर्ड नेपियर ऑफ मागडाला ह्या उभयतांस आहे. तथापि ह्या सुधारणांस व्हाइसराय यांनीं मनःपूर्वक मोठ्या उत्साहानें मदत केली. त्यांच्या लष्करी खात्यासंबंधीं ह्या उपायांसंबंधानें एक प्रख्यात अधिकारी म्हणतातः—“ उधळेपणाचा लॉर्ड मेयो यांना तिटकारा होता. तथापि फाजील खर्चामुळें जितका पैशाचा अपव्यय होतो, तितकाच फाजील काटकसरीनेंही होतो; हें तत्त्व त्यांना अवगत होतें. म्हणून फौजेंत फाजील भाग असेल तितका कमी कर-

ण्याचा त्यांचा संकल्प होता; तथापि ज्या सैन्याची आवश्यकता होती त्याच्या खर्चांत काटकसर करून त्याची निकृष्टावस्था करण्याचा त्यांचा हेतु नव्हता. " युरोपियन शिपायांसाठीं आरोग्यगृहें व डोंगरांवरून हवा खाण्याचीं ठिकाणें बांधिल्यानें त्यांच्या आरोग्यास विनाकारण धक्का बसणार नाहीं, व त्यांच्या आंगचा उत्साह व्यर्थ नष्ट होणार नाहीं; म्हणून ह्या कामीं त्यांनीं फार रदबदली केली. ह्यांच्या कारकीर्दीच्या अखेरीस लष्करी खात्यासंबंधानें ह्यांनीं सोडिलेल्या हुकमांपैकीं एक ह्याच उद्देशाचा होता. वर ज्या प्रख्यात अधिकाऱ्याचा उतारा दिला आहे ते म्हणतातः—" डोंगरावरील ठाण्यांत सैन्य घरांतून किंवा झोंपड्यांच्या बराकींतून सांप्रत राहतें; व सैन्यांत आरोग्य, आराम व शिस्त राहण्यास अवश्य अशा एकाही गोष्टीची त्या ठिकाणीं उणीव नसते. जुन्या पद्धतीप्रमाणें बांधिलेल्या इमारती भपकेदार असत, परंतु त्यांत सोई कमी असत. पलटणींतील तीन कंपन्यांना* तसल्या इमारती बांधण्यास लागणाऱ्या खर्चाहून कमी खर्चांत सर्व पलटणीची राहण्याची व्यवस्था वरील पद्धतीनें होऊं लागली. ह्या नवीन पद्धतीचें श्रेय बहुतांशीं त्यांनाच आहे. कोणत्याही ठिकाणीं ते गेले असतां प्रथमतः दवाखाना पाहण्याची त्यांना इच्छा असे; आणि आरोग्यरक्षणार्थ योजिलेल्या हरएक उपायास त्यांजकडून पैशाची चांगलीच मदत होई.

---

* पायदळ पलटणींत सुमारें १०० शिपायांची एक एक तुकडी असते तिला कंपनी म्हणतात. अशा ८।१० कंपन्यांमिळून एक पलटण—रेजिमेंट—होते. ( भा. क. )

हिंदुस्तानांतील ब्रिटिश शिपायांच्या मुलाबाळांची व पोरक्या मुलांची पुढें योग्य प्रकारें सोय कशी लावावी हा गूढ प्रश्न होता; व ह्याचें त्यांनीं मोठ्या आस्थेनें मनन केलें. ह्या कामीं त्यांनीं कित्येक उपाय योजिले. त्यांतील एक उपाय असा कीं, सर हेन्री लॉरेन्स ह्यांनीं आपल्या मरणापूर्वीं ह्या बाबतींत केलेली व्यवस्था विशेष उत्कृष्ट प्रकारें चालवितां यावी म्हणून त्यांनीं एक कमिटी नेमिली. ह्या संबंधाच्या पत्रव्यवहाराची मोठीच फाईल झाली आहे. तीवरून लॉरेन्स साहेबांच्या नांवानें अशा मुलांसाठीं स्थापिलेल्या आश्रमासंबंधानें—लॉरेन्स आसायलम्स् संबंधानें—हे स्वतः किती काळजी घेत तें उघड होतें. हिंदुस्तानांतील कडक हवेच्या तडाक्यांतही ब्रिटिश शिपायांचें मानसिक सामर्थ्य कायम राहावें म्हणून पलटणींत कारखानें* व प्रदर्शनें काढीत; व इतर हरएक युक्तिप्रयुक्ति लढविण्यांत येई. अशा हरएक कृत्याला ते नेहमीं अनुकूल असत. सैन्याची प्रत्यक्ष योग्यता वाढविण्यासाठीं केलेल्या सुधारणांसंबंधानें थोडक्यांत असें म्हणतां येईल कीं, यांच्या कारकीर्दींत हिंदुस्तानांतील फौजेला विशेष उत्कृष्ट प्रकारचीं शस्त्रें मिळालीं; तोफखान्याकडे अत्युत्कृष्ट ठरलेल्या अशा रायफल तोफा देण्यांत आल्या; व हिवाळ्याच्या दिवसांत लष्करी कवाइतीसाठीं लटक्या लढायांची पद्धति तर प्रत्यक्ष त्यांच्या नजरेखालींच सुरू झाली.

* पलटणींत लागणाऱ्या बंदुकीची दारू वगैरे जिनसांचा पुरवठा व्हावा म्हणून अशा प्रकारचे कारखाने पलटणींत काढिलेले असतात.

( भा. क. )

हिंदुस्तानांत शिपायांस लष्करी शिक्षण देण्याचें ह्या लढाया हें सांप्रत फार महत्त्वाचें साधन ठरलेलें आहे. ह्या व हिंदुस्तानचें संरक्षण पूर्णपणें व्हावें म्हणून योजिलेल्या हरएक उपायास लागणारा पैसा लॉर्ड मेयो पुरवीत असत; मग त्यांना खर्चाची कितीही मोठी अडचण असो. निष्कारण खर्च टाळण्याची त्यांची इच्छा असे; तथापि कांहीं झालें तरी सैन्याची स्थिति उत्तम प्रकारची ठेवण्याविषयीं त्यांचा संकल्प असे; आणि काळ्या व गोऱ्या दोन्ही सैन्यांत ते स्वतः इतके प्रिय झाले होते कीं, हिंदुस्तानच्या थोड्याच गव्हर्नर जनरलनीं तितकी लोकप्रियता संपादिली असेल.

लॉर्ड मेयो यांनीं १८७० सालीं लिहिलें आहेः—

" हिंदुस्तानच्या लोकांची नैतिक आणि सांपत्तिक स्थिति सुधारण्यासाठीं पुष्कळ पैसा खर्च करणें आपलें कर्तव्य आहे. म्हणून लष्करी खर्चाकडे एकादा रुपयाही निष्कारण खर्चास घेतला असतां तेवढा त्या रकमेंतून कमी केल्याप्रमाणें होईल. तथापि जींत काडीमात्रही व्यंग नाहीं, अशी उत्कृष्ट प्रकारची लष्करी व्यवस्था ठेवणें, हाच आपल्या देशांतील सत्तेचा आधारस्तंभ आहे; हें मला पूर्ण संमत आहे. फौजेंतील हरएक कामगार व शिपाई केव्हांही प्रसंग आल्यास युद्धास सज्ज राहील; आणि प्रत्येक हत्यार व लष्करी कामास लागणारी इतर हरएक वस्तु अत्युत्तम स्थितींत ठेविली जाईल, हें आपण पाहिलेंच पाहिजे. लष्करी सुधारणेसंबंधानें केलेल्या सूचना ह्या तत्त्वांना पूर्णपणें अनुसरून आहेत; अशी माझी समजूत आहे. "

लॉर्ड मेयो यांनीं आपल्या हयातींत लष्करी सुधारणें-संबंधानें लिहिलेल्या शेवटच्या खलित्यांपैकीं एकच वाक्य एथें देऊन हें प्रकरण पुरें केलें असतां नीट दिसेल. तें असें:—" देश निर्भय राहून त्याचें संरक्षण होण्यास अत्यावश्यक जितका पैसा पाहिजे त्याहून एकं पैही प्रजेला जास्त द्यावी लागल्यास तें न्यायाचें होईल, असा विचार आम्हांस मान्य होत नाहीं. "

# प्रकरण आठवें.

## लॉर्ड मेयो यांची आभ्यंतर व्यवस्था.

[ प्रांतांची स्थिति समजून घेण्याची त्यांची इच्छा.– पब्लिक वर्क्स् खात्यांतील अधिकाऱ्यांची स्थिति.–त्या खात्याकडून कामें कशीं चालतात तो प्रकार.–त्या खात्यांतील व्यंगें.–सरकारी कामें व इतर कामें ह्यांतील तफावत.– पब्लिक वर्क्स् खात्यांतील कामांसाठीं कर्ज न काढणें.–ह्या खात्यासंबंधीं यांचीं मुख्य दोन तत्त्वें.–दुष्काळ निवारणार्थ त्यांचे विचार.–दुष्काळासंबंधानें त्यांच्या मतें सरकारचें कर्तव्य.–यांच्या वेळची आगगाडीच्या सडकांची स्थिति.– सरकारी पैशानें ह्या सडका बांधण्याची सुरवात.–पाटबंधाऱ्यासंबंधीं त्यांनीं केलेलीं कामें.–बंगालच्या बाजूचीं व इतर कामें.–त्यांच्या पूर्वींची सार्वजानिक शिक्षणाची दोन प्रकारची पद्धति.–दुसऱ्या पद्धतीसंबधानें त्यांचा अभिप्राय.–बंगाल्यांत सार्वजनिक शिक्षणांत पडलेला फरक.–मुसलमान लोकांच्या शिक्षणासंबधीं त्यांचे विचार.– गरीब स्थितींतील युरोपियन लोकांच्या शिक्षणाची तजवीज.–सरकारी अधिकाऱ्यांच्या शिक्षणार्थ त्यांची खटपट.–सरकारी कामकाज चालण्यास अवश्य माहितीचा अभाव.–ह्या संबधानें त्यांनीं योजिलेले दोन उपाय.–शेतकी खात्याविषयीं त्यांचा अभिप्राय.–स्थानिक–स्वराज्यासंबधीं त्यांचे विचार.–त्यांच्या कारकीर्दींतील कायदे वगैरे.–त्यांचा आदरशील स्वभाव.–त्यांच्या स्वभावांतील गुण.]

मोगल लोकांच्या सत्तेच्या भरभराटीच्या काळांत त्यांची राजधानीची एकच जागा नसे. ज्या वेळीं जेथें लष्कराचा तळ असेल, तीच तेव्हां राजधानी समजत. पुढें ती पद्धति त्यांनीं सोडून दिली; तेव्हांपासूनच अनेक सुभ्यांचा कारभार मुख्य राजधानीच्या एकाच ठिकाण-

वरून पाहण्याची घातक सुरवात झाली; व दिल्लीचें राज्य मोडून त्याचे तुकडे होण्यास हें एक बऱ्याच अंशीं कारण झालें. लॉर्ड मेयो यांच्या लक्षांत ही गोष्ट आली होती. ह्मणून आपल्या ताब्यांतील भिन्न भिन्न प्रांतांत फिरण्याची उत्तम प्रकारें योजना करून त्यांनीं त्यांची माहिती करून घेतली. प्रत्येक स्थानिक सरकारची राज्यकारभाराची पद्धति निरनिराळीच असे. तिची माहिती करून घेण्यासाठीं त्यांनीं फार परिश्रम केलेच. शिवाय ती पद्धति अमलांत आणणाऱ्या अधिकाऱ्यांचें वर्तन व त्यांची योग्यता समजून घेण्यासाठीं त्यांनीं फार परिश्रम केले. त्यांच्या स्वभावांत असा कांहीं गुण होता कीं, ते सर्वांस हवेसे वाटत; त्यांत शिकार वगैरेंचीही त्यांस आवड होती. शिवाय राज्यकारभारासंबंधाचें प्रत्यक्ष कामकाज पाहण्यासाठीं अविश्रांत सामर्थ्य त्यांच्या आंगीं असे. ह्यामुळें हिंदुस्तानांतील एकंदर जिल्हाकामगारांचें प्रेम त्यांजवर बसून त्यांच्यावर विश्वासही बसला. तथापि हिंदुस्तानांतील त्यांच्या एकंदर २१७६३ मैल प्रवासांत त्यांना शारीरिक व मानसिक श्रम किती झाले, ह्याचा अंदाज त्यांजबरोबर प्रत्यक्ष असलेल्या माणसाशिवाय इतर कोणासही व्हावयाचा नाहीं. तसेंच भिकार सडकांनीं अथवा डोंगराळ प्रदेशांतील कड्यांजवळून घोड्यावरून भरधाव जात असतां त्यांजवर धोक्याचें किती प्रसंग येण्याचा संभव असे, ह्याची कल्पनाही इतरांस होणार नाहीं. केवळ चैनीखातर असा एकच प्रवास करण्याविषयीं कामगार मंडळीनीं त्यांना सूचना केली होती; परंतु

तें त्यांनीं तत्काळ नाकारिलें. पहांटेस पांच वाजतां उठावें; दिवसभर प्रवास करावा; सरकारी कामगार अथवा एतद्देशीय राजे यांच्या भेटी घ्याव्या; पब्लिक वर्क्स् खात्याचीं कामें तपासावीं; व मध्य रात्रीपर्यंत आपल्या परराष्ट्रसंबंधी, प्रायव्हेट किंवा लष्करी सेक्रेटरीबरोबर कामकाजाचा उलगडा लावीत बसावें; अशी तर त्यांची नेहमींचीच दिनचर्या असे.

ह्या प्रवासांतून त्यांना अशा अनेक प्रशंसनीय गोष्टी आढळल्या; परंतु ज्यांत सुधारणा करणें इष्ट आहे अशाही पुष्कळ गोष्टी आढळल्या. पब्लिक वर्क्स् खातें हें अफाट असून हिंदुस्तानांतील खर्चाच्या खात्यांमध्यें हें गेल्या बारा वर्षांत अग्रगण्य बनलें होतें. त्या खात्याचा विस्तार सपाट्यानें वाढत चालला होता. म्हणून लष्करी कामगारांपैकीं अथवा दुसऱ्या कोठें मिळतील तेथून कामगारांची भरती ह्या खात्यांत करून घ्यावी लागे; व त्यांजकडे जें नवीन काम येणार त्या संबंधानें त्यांना पूर्वीं कांहीं शिक्षण मिळालेलें आहे किंवा नाहीं, इकडे केव्हां केव्हां मुळींच लक्ष देण्यांत येत नसे. ह्याचा परिणाम असा झाला कीं, कामांतून भयंकर चुका होऊन उधळेपणा फार होऊं लागला. हा परिणाम टाळण्याच्या कामीं लॉर्ड मेयो यांच्या पूर्वींचे गव्हर्नर जनरल निराश झाले. तेणेंकरून वर्तमानपत्रांतून सरकारवर कडक टीका होऊं लागली.

ही स्थिति सुधारण्यासाठीं लॉर्ड मेयो यांनीं आपल्या प्रवासांत सुरुवात केली; व कौन्सिलांतही ह्या विषयाचा विचार करून उपाय योजण्याची त्यांनीं सुरवात केली. ह्या

खात्यासंबंधीं एका कामावर त्यांनीं अभिप्राय दिला आहे, त्यांत ते म्हणतातः—" एकाद्या मोठ्या इमारत कामाच्या रचनेंत घडण्यासारख्या जितक्या चुका असतील, त्यांतील बहुतेक सर्व ह्या कामीं घडल्या आहेत. खर्चाचीं अंदाजपत्रकें शेंकडा शंभर वाट्यांनीं खोटीं; कामाचे नकाशे वगैरे चुकीचे; तळचे थर बारकाईनें तपासणें अवश्य, परंतु तसें न करितां एकदम पायास सुरवात; काम सुरू असतां अंदाजपत्रकाबाहेर लागणाऱ्या खर्चाबद्दल विचारपूस मुळींच न करणें; इत्यादि अनेक दोष आहेत." दुसऱ्या एका कामासंबंधानें ते लिहितातः—" कामगारांचा गैदीपणा, त्यांची नालायकी व लाचलुचपतीचा प्रकार; ह्यांची शोचनीय हकीगत वाचून मला फार वाईट वाटलें आहे. ह्या इमारतींच्या कामावर आरंभापासून जे मुख्य कामगार आहेत, त्यांपैकीं प्रत्येकाचेंच वर्तन गैदीपणाचें आहे; त्यांच्या हाताखालच्या कामगारांपैकीं बहुतेक सर्व नालायक आहेत; व मक्त्यानें कामें करणारांत लाचलुचपत आहे." आणखी एका प्रसंगीं ते म्हणतातः—" ह्या बराकींसंबंधीं रिपोर्ट मीं वाचला. तो अति भयंकर आहे. ह्या रिपोर्टांत ज्यांचा उल्लेख आहे, त्यांपैकीं एका शिवाय कोणींही आपलें कर्तव्य बजाविलेलें दिसत नाहीं; व ज्यानें बजाविलें त्याला उलट खरमरीत ठपका मिळाला आहे. ह्या खात्याची पुनः व्यवस्था लावण्याच्या कामीं ह्या रिपोर्टाची मला मदत होईल."

ह्याप्रमाणें पब्लिक वर्क्स खात्यांतील कामांची पाहणी करून परत आल्यावर केव्हां केव्हां त्यांचें मन निराश

होत असे. तथापि कोणत्याही कामगाराला एकदम ठपका देण्यास ते तयार नसत. शिवाय त्यांच्या लवकरच नजरेस आलें कीं, ह्या कामीं मुख्यत्वें आपली पद्धतिच दोषार्ह आहे. पहिलें व्यंग त्यांच्या असें ध्यानांत आलें कीं, खात्यांतील कामगारांना मानसिक श्रम फाजील पडतात. देखरेख करणाऱ्या कामगारांना जितक्या भागावर देखरेख करितां येण्याजोगी असेल, त्यापेक्षां मोठ्या भागांची जबाबदारी त्यांजवर टाकीत;—ह्याचा परिणाम देखरेख न राहणें. दुसरें व्यंग असें कीं, मोठमोठीं अनेक कामें एकाच वेळीं देशांत सर्वत्र सुरू करण्यांत येत; परंतु त्या मानानें कामगारांची संख्या वाढवीत नसत;—ह्याचा परिणाम कामांत विलक्षण उतावळी. तिसरें व्यंग असें कीं, प्रत्येक एंजिनीयरच्या ताब्यांत मोठमोठा प्रदेश देण्यांत येत असे; आणि पत्रव्यवहार व केवळ कचेरींतील इतर काम त्याला इतकें असे कीं, खोलींतून खुर्चीवरून हालण्यासही त्याला फुरसत नसे, व बाहेर काय चाललें आहे त्याजवर देखरेख ठेवण्यास ह्यामुळें व्यत्यय येत असे;—ह्याचा परिणाम स्वतः कांहींएक बंदोबस्त न ठेवितां येणें.

त्या वेळीं रेलवेसंबंधीं कांहीं कामें मक्त्यानें सुरू होतीं, तीं त्यांनीं पाहिलीं. तसेंच त्या सुमारास पब्लिक वर्क्स खात्याकडून सुरू असलेल्या एका इमारतीचें काम त्यांनीं पाहिलें. त्यामुळें तर ह्या खात्यांतील पद्धतींतील तिसरें व्यंग त्यांच्या मनावर पक्कें बिंबलें. मक्त्यानें सुरू असलेल्या रेलवेकडील कामावर तीन युरोपियन गृहस्थ भर दोन प्रहरच्या उन्हांत उभे राहून एतद्देशीय मजूर विटा

रचीत त्या प्रत्येक विटेवर स्वतः नजर ठेवीत, असें त्यांस आढळलें. त्या वेळीं त्यांच्या हातांत छत्री व डोक्यावर फार विस्तृत अशा मऊ टोप्या मात्र होत्या. पब्लिक वर्क्स खात्याकडून सुरू असलेल्या इमारतींसंबंधानें त्यांना असें आढळून आलें कीं, तेथें फक्त मजूर व गवंडी आहेत व त्यांजवर कोणत्याही प्रकारची देखरेख नाहीं. तपास केला तेव्हां एंजिनीयर यांनीं कचेरींतील कामाची सबब आणिली; व असिस्टंट एंजिनीयर यांनीं सबब आणिली कीं, जिल्हा मोठा असून त्यांत अनेक ठिकाणीं एकदम कामें सुरू केल्यामुळें त्या सर्वांवर देखरेख ठेवणें अशक्य होतें. सारांश, ह्याचा एकंदरीनें परिणाम असा घडला कीं, सरकारचें पैशाचें नुकसान होऊन बांधकाम कच्चें राहिलें. त्या वेळचे लॉर्ड मेयो यांचे उद्गार असे आहेतः—"आपणांस कोणत्या गोष्टीची आवश्यकता आहे तें माझ्या ध्यानीं आलें:—ती हीच कीं, उत्तम प्रकारची देखरेख ठेवून एका वेळीं एकाच कामास हात घालणें."

लॉर्ड मेयो यांना असेंही आढळून आलें कीं, पब्लिक वर्क्स खात्याचा खर्च उधळेपणानें होण्याचें बऱ्याच अंशीं कारण म्हटलें म्हणजे त्या कामासाठीं कर्ज काढून त्यांतून तीं करण्याची त्या काळची वहिवाट होय. म्हणून त्यांनीं असा सक्त नियम ठरविला कीं, ह्या खात्यांतील साधारण प्रतीचीं सर्व कामें—ज्या कामांपासून सरकारला पुढें फायदा वगैरे व्हावयाचा नाहीं व ज्यांपासून व्याज सुटावयाचें नाहीं अशीं कामें—देशाच्या चालू उत्पन्नांतूनच झालीं पाहिजेत.

ते ह्या संबंधानें निश्चयानें म्हणतातः—“ इतःपर राष्ट्राच्या कर्जांत कोणत्याही प्रकारची भर पडल्यास आपणांवर भयंकर प्रसंग ओढवल्याशिवाय राहाणार नाहीं. म्हणून अशा प्रकारची कांहींमात्र जबाबदारी मी आपल्या शिरावर घेणार नाहीं; व जें काम वस्तुतः साधारण प्रकारचेंच असून त्यापासून पुढें उत्पन्न व्हावयाचें नाहीं, अशा कामासाठीं एक रुपया कर्ज काढण्यासही शांततेच्या काळांत माझें मन कोणत्याही कारणानें वळावयाचें नाहीं. ही कर्ज काढण्याची पद्धति रद्द करण्याचा माझा संकल्प आहे; कारण ही रद्द करणें अवश्य आहे अशी माझी स्वतःची पक्की समजूत असून राणी सरकारच्या मंत्र्यांचेंही ह्या कामीं मला पूर्ण अनुमोदन आहे. ”

पब्लिक् वर्क्स खात्याची पुनः नीट व्यवस्था लावण्यासाठीं त्यांनीं अनेक उपाय योजिले. परंतु त्यांचें विवेचन करणें, हा ह्या पुस्तकाचा विषय नव्हे. एथें इतकें सांगितलें म्हणजे पुरें आहे कीं, त्यांनीं ह्या खात्यासंबंधानें आपलीं ठाम झालेलीं मतें कडक रीतीनें अमलांत आणिलीं. तीं तत्त्वें हींच कीं, प्रथमतः कामाला पैसा आहे किंवा नाहीं हें पाहणें, व देखरेख विशेष उत्तम प्रकारें ठेवणें. ह्या तत्त्वांमुळें त्यांनीं आपल्या कारकीर्दींत ह्या खात्यांत पुष्कळच शिलक पाडिली. इतकेंच नाहीं, तर ह्यामुळें ह्यांच्या कारकीर्दीनंतर देशावर कर्जाचा वगैरे बोजा पडल्याशिवाय ह्या खात्याचा विस्तार करितां आला.

सारांश, उत्तम प्रकारें कामें होण्यास अडथळा होणार नाहीं, अशा बेतानें त्यांनीं वर दर्शविल्याप्रमाणें खर्चांत

होईल तितकी काटकसर केली. नंतर दुष्काळांत प्रजेचें रक्षण कसें होईल, ह्याचा त्यांनीं मोठ्या कळकळीनें विचार सुरू केला. इंग्लंडांत *पूअर–लॉ म्हणून एक प्रकारची व्यवस्था आहे; बहुतेक तशाच मासल्याची एक सूचना हिंदुस्तानासाठीं एका कमिशनानें ह्या बाबतींत केली होती. परंतु ती ह्यांनीं प्रथमदर्शनींच बाजूस ठेविली. ते म्हणतात:--" युरोप खंडांतील अति भिकार देशांपैकीं एका देशांत पूअर-लाप्रमाणें कारभार पाहण्यांत माझें सर्व आयुष्य गेलें आहे; ह्यामुळें प्रथम मला असें सांगतां येईल कीं, हिंदुस्तानांतील साधारण नेहमींच्या दरिद्रावस्थेचा प्रतिकार करण्यास पूअर–लॉची व्यवस्था अवश्य नाहीं. दुसरें असें कीं, वेळोवेळीं पडणाऱ्या दुष्काळांच्या निवारणार्थ ठिकठिकाणीं जी रक्कम कराच्या रूपानें तशा व्यवस्थेनें उभारतां येण्याजोगी आहे, ती इतकी क्षुल्लक आहे कीं, तिच्या योगानें दुष्काळांचें निवारण करूं पाहणें म्हणजे केवळ थट्टा होईल."

असें होतें तरी दुष्काळामध्यें अन्नान्न करून सर्व माणसें मरूं नयेत अशाविषयीं ब्रिटिश सरकारावर जबाबदारी असून ती लॉर्ड मेयो यांनीं मोठ्या गंभीर-

---

* इंग्लंडांत भिकाऱ्यांस भिक्षा मागूं देत नाहींत. त्यांच्यासाठीं कारखाने काढिलेले असतात तेथें त्यांना नेतात. त्यांपैकीं आंधळे, पांगळे, अशक्त वगैरे असतील त्यांस फुकट अन्न देतात; व सशक्त असतील त्यांजकडून काम करून घेऊन नंतर त्यांस अन्न देतात; ही व्यवस्था चालण्यासाठीं लोकांवर एक प्रकारचा कर ज्या कायद्यानें बसविलेला असतो, त्यालाच पूअर–लॉ ( भिकाऱ्यांसंबंधीं कायदा ) म्हणतात. ( भा. क. )

पणानें स्वीकारिली. त्यांची समजूतही अशी होती कीं, हा प्रकार टाळण्याचीं साधनें सरकारच्या हातीं आहेत. ह्या प्रकरणासंबंधाच्या त्यांच्या आरंभींच्या एका पत्रांत असा उल्लेख आहे:—"हिंदुस्तानांत मुदतीमुदतीनें दुष्काळ पडतात; हा आपल्या राज्यकारभाराला बट्टा असून येणें-करून अति विलक्षण विपत्ति उत्पन्न होऊन लाखो लोकांचे बळी पडतात. तथापि ईश्वरी कृपा असेल तर आगगाडीचे रस्ते केल्यानें व पाटबंधाऱ्यांचीं मोठमोठीं कामें पुरीं केल्यानें असे दुष्काळ बंद करण्याचें सामर्थ्य आपल्या आंगीं येणार आहे ."

हिंदुस्तानांतील आगगाडीच्या रस्त्यासंबंधाचा पूर्वींचा इतिहास व उत्तरोत्तर त्याचा विस्तार कसा काय करावयाचा ह्याची हकीगत लॉर्ड लॉरेन्स यांनीं नुकतीच दप्तरीं सविस्तर लिहून ठेविली होती; तिचा विचार आपणांस कर्तव्य आहे, असें लॉर्ड मेयो हे कलकत्त्यास आल्या-बरोबर त्यांना आढळून आलें. लॉर्ड लॉरेन्स हे मूळचे मुलकी कामगार असून व्हाइसरायच्या योग्यतेस आलेले होते. त्यांनीं आगगाडीच्या रस्त्यांसंबंधीं आपल्या मागून येणाऱ्या व्हाइसरायांसाठीं लिहून ठेविलेली हकी-गत वाचून मनाला मोठी उमेद उत्पन्न होणारी होती. तथापि मन खट्टू होण्यासारखाही कांहीं प्रकार होता. १८५३ सालच्या अखेरीस हिंदुस्तानांत २१½ मैल आगगाडीचा रस्ता झालेला होता. तेव्हांपासून १८६९ सालच्या आरंभीं लॉर्ड लॉरेन्स हे ह्या देशाहून परत गेले तोंपर्यंत सुमारें ४००० मैल रस्ता मात्र सुरू

झाला होता. इतका रस्ता खाजगी कंपन्यांनीं तयार केला असून त्याजबद्दल हिंदुस्तान सरकारनें हमी घेतलेली होती. ड्यूक ऑफ आर्गाइल ह्यांनीं ह्या बाबतींत असें लिहिलें आहे:—"ह्या रस्त्यासाठीं भांडवल सरकारच्या पतीवर व त्यांच्या अधिकारानें उभारिलें होतें; कांहीं झालें तरी शेंकडा ५ टक्के व्याज पडलेंच पाहिजे, अशी सरकारनें हमी घेतली होती; भागीदारांवर कांहींएक जोखीम नव्हतें; व कोणत्याही प्रकारचा नफा होण्याचा संभव असल्यास तो न घेतां तोटा झाल्यास मात्र सरकार सोसण्यास तयार होतें. ह्याप्रमाणें सरकारानें हमी घेतलेल्या कंपन्यांना बेताबातानें खर्च करण्याविषयीं उत्तेजन मुळींच नसल्यामुळें दर मैली १७००० पौंड खर्च आला होता; व ह्या आगगाडीच्या रस्त्यावर सरकारची व कंपनीची अशी दुहेरी देखरेख होती. ह्यामुळें खर्च फार येई, काम चेंगटपणानें चाले, व घोंटाळे उत्पन्न होत. हा प्रकार फार खर्चाचा असल्यामुळें हिंदुस्तानांत अवश्य तितका रस्ता तयार होणें द्रव्यदृष्ट्या अशक्य होय; असें स्पष्ट दिसून आलें होतें."

म्हणून सरकारी हमीच्या आगगाडीच्या रस्त्यांच्या जोडीला खुद्द सरकारी पैशानें सर्वत्र आगगाडीचे रस्ते बांधण्याची सुरवात करण्याचा लॉर्ड मेयो यांनीं निश्चय केला; व ह्या कामीं जनरल स्ट्राचे यांची त्यांना मदत मिळाली. खाजगी कंपन्यांना ५ टक्के व्याज देण्याविषयीं हमी घेण्याऐवजीं सरकारनेंच रस्ते बांधण्यासाठीं शेंकडा ३ पासून ४ टक्क्यांपर्यंत भांडवल उभारिलें. तसेंच रुंद

सडका बांधण्यास प्रथम दर मैलीं १७००० पौंड लागत असत; म्हणून त्या ऐवजीं दर मैलीं सुमारें ६००० पौंड खर्चाचे अरुंद रस्ते बांधण्याचा सरकारनें निश्चय केला. पूर्वीं सडकांची व्यवस्था दुहेरी तंत्राची असून फार खर्चाची होती; तिच्या ऐवजीं नवीन पद्धति सुरू करून सर्व व्यवस्था एकतंत्रानें होऊं लागली. ह्याप्रमाणें अरुंद रस्ते करणें सोईचें किंवा गैरसोईचें, हा प्रश्न वादग्रस्त असून त्याचा विचार एथें करणें अवश्य नाहीं. इतकें सांगितलें ह्मणजे पुरे आहे कीं, अरुंद रस्त्यांपासून होणाऱ्या गैरसोई लॉर्ड मेयो यांच्या पूर्णपणें लक्षांत आल्या. त्यांची योजना वस्तुतः अशी होती कीं, आगगाडीचा अरुंद रस्ता इतका लांबपर्यंत तयार करावयाचा कीं, मध्यंतरीं रुंद रस्ता न येऊं देतां पुष्कळ लांब जातां यावें. रस्ता रुंद असल्यानें प्रत्यक्ष सोय कशी असते, तें पुढें आलेल्या अनुभवावरून अगदीं निश्चयात्मक ठरलें. तथापि थोड्याशा तुटक तुटक प्रदेशांखेरीज इतर ठिकाणीं सरकारी रस्ते बांधण्याची पद्धति लॉर्ड मेयो यांच्या कारकीर्दीपासूनच सुरू झाली. तसेंच ह्या पद्धतींत अलीकडच्या काळास अनुसरून अनेक प्रकारच्या सुधारणा झाल्या असून हिंदुस्तानांतील एकंदर* आगगाडीच्या रस्त्यांचा समावेश ह्या पद्धतींत होऊं लागला आहे.

दुष्काळाशीं टक्कर मारण्यासाठीं देशाची अंतःस्थिति

* थोड्याच वर्षांपूर्वीं जी. आय्. पी. रेलवे ही सरकारनें विकत घेतल्यामुळें तो सर्व रस्ता आतां सरकारी झाला आहे, हें वाचकांच्या ध्यानांत येईलच. (भा. क.)

सुधारण्याचा लॉर्ड मेयो यांचा दुसरा रामबाण उपाय म्हणजे पाटबंधारे वगैरे होत. ह्या संबंधाचीं कित्येक कामें त्यांनी सुरू करून रूपास आणिलीं व शेवटासही नेलीं. त्या कामांची नुसती यादी येथें दिली असतांही वाचकांस कंटाळा येईल. गंगेचा कालवा त्यांनीं वाढविला. त्या कामांत १७ वर्षें तोटा आला खरा; परंतु पुढें सरकारवर त्याबद्दल ओझें मुळींच पडेनासें झालें. अलीगडच्या समोरून गंगानदीला फाटा फोडून दुआबाच्या खालच्या एकंदर भागांत—म्हणजे फत्तेगडापासून अलाहाबादेपर्यंत पाणी खेळवण्यासाठीं पाटबंधारे बांधण्याची सुरवात त्यांनीं केली. ह्याच वेळीं सारदा कालव्याचें काम सुरू असून पूर्वेकडील अर्धे रोहिलखंड व अयोध्या प्रांतांतील पश्चिमेकडील जिल्हे यांजमध्यें अवर्षण व दुष्काळ यांची भीति राहणार नव्हती. पश्चिम रोहिलखंडासाठींही अशाच प्रकारें गंगा नदीचा कालवा काढण्याचें काम सुरू होतें. दिल्लीच्या पश्चिमेकडील रुक्ष प्रदेशाला यमुना नदीच्या पाण्याचा पुरवठा व्हावा म्हणून एक योजना ठरून त्यासंबंधीं नकाशे वगैरे तयार झाले; व स्टेट सेक्रेटरी यांची अंशतः मंजुरीही ह्या कामाला मिळाली. यमुनेच्या पश्चिम कालव्याचा याप्रमाणें बिस्तार व्हावयाचा होता. त्याचप्रमाणें यमुनेच्या खालच्या आंगच्या कालव्याची वाढही दिल्लीच्या आग्नेयीकडील प्रांताकडे होत चालली होती.

गंगानदीचें पात्र सोडून बरेंच खालीं आलें असतां बहार प्रांतांतूनही शोण नदाचे-कालवे काढण्याचें असेंच उपयुक्त काम सुरू असल्याचें आढळतें. हिंदुस्तानांत पुढील

दुष्काळ १८७४ सालीं ह्याच प्रांतांत पडला होता. समुद्र-किनाऱ्याच्या बाजूस खालच्या बंगाल्यापैकीं ओरिसा हा प्रांत असून शेवटच्या दुष्काळाच्या जबड्यांतून हा नुकताच सुटला होता. ह्या ओरिसा प्रांतांत दुष्काळाची भीति अनादि कालापासून असे. परंतु ह्या प्रांतांतून अनेक कालवे नेऊन व बाह्य प्रदेशाशीं दळणवळणाचीं साधनें वाढवून ह्या प्रदेशावर तसें संकट इतःपर न येईल अशी तजवीज झाली होती. ह्याच्याही खालीं दक्षिणेस गोदावरी नदीच्या कालव्याचीं कामें सुरू होतीं. अगदीं पश्चिमेकडे सिंध प्रांतांतील जिल्ह्यांतून वरचेवर अवर्षणें पडत; त्यांच्या निवारणार्थ कोणते उपाय योजितां येण्यासारखे आहेत त्यांचा विचार होऊन त्यांजबद्दल बारकाईनें चौकशी झाली होती. तसेंच मुंबई, मद्रास व इतर प्रांतांतून अनेक कामांस प्रारंभ झाला होता, कित्येक झपाट्यानें सुरू होतीं, व कित्येक पूर्ण झालीं होतीं. आतां हीं कामें वरच्यांसारखीं विस्तृत प्रमाणावर नव्हतीं खरीं; तथापि त्या त्या ठिकाणांना तीं फार उपयुक्त होतीं.

हिंदुस्तानांत आल्यावर लॉर्ड मेयो यांना असें आढळून आलें कीं, शिक्षणासंबधानें भिन्न भिन्न प्रकारचीं दोन मतें प्रचलित आहेत. कित्येक प्रांतांतून शिक्षणाची योजना सर्व लोकांस उपयुक्त अशा पायावर रचण्याविषयीं खटपट झाली असून तिला यश आलें होतें. अशा प्रांतांमध्यें मुंबई इलाख्याचा नंबर बराच वर लागणारा होता. इतर कित्येक प्रांतांत वरिष्ठ प्रतीच्या शिक्षणाची भरभराट झालेली होती; व प्राथमिक अथवा देशी शाळांची संख्या

तेथें फार अपुरी होती. ही गोष्ट बंगाल प्रांताला विशेष लागू होती. ह्या दुसऱ्या पद्धतीचे पुरस्कर्ते असें प्रतिपादन करीत कीं, हिचा अखेर परिणाम थेट खालच्या वर्गी-तील लोकांपर्यंत पोहोंचावयाचा. तथापि ह्या पद्धतीमुळें साक्षात् असा परिणाम घडत होता कीं, श्रीमान् व सत्ता-धीश असतील त्यांच्या हातीं मात्र हें नवीन ज्ञानरूपी शस्त्र येत होतें. व गरीब लोक अज्ञानांधकारांत पूर्ववत् अम्मडलेले राहून आपापला चरितार्थ चालविण्यासाठीं भडपडत होते. ही स्थिति सुधारण्यासाठीं खटपट सुरू होती. तीत लॉर्ड मेयो यांनीं आपल्या आंगच्या नेह-मीच्या उत्साहाला अनुसरून लक्ष घातलें.

ते आपल्या एका मित्रास लिहितातः—" वरिष्ठ शिक्ष-णाचा परिणाम खालच्या वर्गांतील लोकांपर्यंत आपाप जाऊन पोहोंचेल; हें तत्त्व मला संमत नाहीं. बंगाल्यांत आपण हजार पांचशें बाबूंना इंग्लिश भाषेचें शिक्षण देत असून त्याजबद्दल सरकारला फार खर्च सोसावा लागत आहे. त्यांपैकीं पुष्कळांना स्वतःच्या शिक्षणाचा खर्च सोसण्याची चांगली ऐपत आहे; व इंग्लिश शिकण्याचा त्यांचा हेतु सरकारी नौकरी मिळविण्याव्यतिरिक्त कांहीं एक नाहीं. इकडे खालच्या वर्गांतील लाखों लोकांना ज्ञानप्राप्ति करून देण्यासाठीं माल आपण कांहीं एक केलेलें नाहीं. बाबू तर तें कधींच करणार नाहींत. तुम्ही त्यांना अधिकाधिक शिक्षण द्याल, तों तों ते अधिकच स्वार्थदृष्टि होतील; व ह्या विशेष ज्ञानाचा उपयोग इतरांवर जुलूम जबरदस्ती करण्याकडे करतील. कलकत्त्यास हल्लीं

४०० बाबू वेडें वाकडें इंग्लिश शिकत आहेत; परंतु बंगाल्यांतील ४ कोट लोकांस त्यांजकडून त्या शिक्षणाचा फायदा मिळण्याची वाट आपण पाहात बसलों तर तुमचा हेतु लाखों* वर्षांनींही सिद्धीस जाण्याचा संभव नाहीं. बाबूंना तर इंग्लिश शिकूंच द्या. परंतु बंगाल्यांतील खेड्यापाड्यांतील लोकांस लिहिणें वाचणें व हिशेब इतकें शिकविण्यासाठींही तुम्ही थोडाबहुत प्रयत्न करा."

ह्या वेळीं ह्या संबंधानें ज्या तजविजी सुरू झाल्या त्या अमलांत आणण्याचें श्रेय त्या वेळचे बंगालचे लेफ्टेनेन्ट गव्हर्नर सर जॉर्ज क्यांबेल यांना आहे. शिक्षणासंबंधाच्या त्यांच्या सुधारणांमुळें त्या प्रांतांत मन्वंतरच झालें असें म्हणण्यास हरकत नाहीं.

सरकारी शाळाखात्याकडून १८७० सालीं खालच्या बंगाल्यांत १६३८५४ मुलांना शिक्षण मिळत असून त्या कामीं सरकारला १८६५९८ पौंड खर्च येत होता. सर जॉर्ज क्यांबेल यांनीं १८७४ त लेफ्टेनेंट गव्हर्नरच्या जागेचा चार्ज सोडिला; तेव्हां ४००७२१ मुलांना शिक्षण मिळूं लागलें, व खर्च २२८१५१ पौंड होऊं लागला. मध्यंतरीं त्यांनीं बंगाल्यांत सर्वत्र प्राथमिक शिक्ष-

---

* मूळ पुस्तकांत ह्या काळाच्या कल्पनेसाठीं 'सिल्यूरियन रॉक'-चा दृष्टांत दिला आहे. दक्षिण वेल्समध्यें सिल्यूअर्स नांवाचे ब्रिटिश लोक प्राचीन काळीं राहात होते; त्या प्रांतांत सांपडणारा हा एक जातीचा दगड होता, म्हणून त्याला 'सिल्यूरियन रॉक'–दगड–म्हणत. हा दगड पृथ्वीच्या गर्भांत लाखों वर्षें तयार होत असतो. म्हणून कोणतीही गोष्ट घडण्यास अति कालावधि लागत असला म्हणजे ह्या दृष्टान्ताची योजना करितात. (भा. क.)

णाच्या शाळा स्थापिल्या; खेड्यापाड्यांतून शिक्षण देण्याच्या जुन्या पद्धतीची जुळवाजुळव करून तिचें पुनरुज्जीवन केलें; व अशा रीतीनें देशांतील प्रजेसाठीं सार्वजनिक शिक्षणाची पद्धति वस्तुतः त्यांनीं सुरू केली. तथापि वरिष्ठ प्रतीच्या शिक्षणाला तर प्रत्यक्ष कमतरता त्यांनीं येऊं दिली नाहीं.

हिंदुस्तानांतील सरकारी शिक्षणाचा प्रसार खेड्यापाड्यांतून देशी शाळा स्थापून विस्तृत पायावर केला पाहिजे, असें लॉर्ड मेयो यांचें मत होतें. तथापि कित्येक जातींपुरती विशेष प्रकारची सवड ठेवणें अवश्य आहे; हेंही त्यांच्या लक्षांत आलें. मुसलमान लोक म्हणजे हिंदुस्तानच्या जुन्या राज्यकर्त्यांच्या वर्गांतील होत; व इंग्रज सरकारच्या सार्वजनिक शिक्षणाच्या पद्धतीमुळें जीवनकलहाच्या ह्या झटापटींत ते मागें पडले होते. असा परिणाम घडून येण्यास त्यांचा स्वतःचा हलगरजीपणा किती कारणीभूत झाला आहे; तसेंच आपल्या शिक्षणाची पद्धति योग्य नसल्यामुळें अथवा त्यांच्या स्थितीला ती जुळेशी नसल्यामुळें असा परिणाम किती अंशानें घडून आला आहे; ह्याचें ज्ञान त्यांनीं नीट रीतीनें करून घेतलें. त्या लोकांच्या अडचणी दूर व्हाव्या म्हणून त्यांच्या शिक्षणाची विशेष प्रकारची व्यवस्था करण्याची आवश्यकता असल्याविषयीं त्यांनीं स्थानिक सरकारास आग्रहपूर्वक सूचना केली व त्यांनीं सुचविलेल्या धोरणानें ह्या कामीं झालेल्या सुधारणांमुळें मुसलमान लोकांच्या शिक्षणाची अडचण बऱ्याच अंशीं दूर झाली.

दुसऱ्या एका वर्गांतील लोकांसाठीं लॉर्ड मेयो यांनीं अशाच प्रकारची कळकळ दाखविली. ह्या वर्गांतील मंडळीं मुसलमान लोकांपेक्षांही विद्येच्या कामीं मागासलेली होती. हिंदुस्तानचा राज्यकारभार चालवीत असतां कंगाल स्थितींतील गोऱ्या लोकांची व्यवस्था लावणें हा प्रश्न हिंदुस्तानच्या राज्यकारभारांत अति बिकट झाला आहे, असें त्यांच्या ध्यानीं आलें. वास्तविक प्रकार असा होता कीं, हिंदुस्तानांतील सार्वजनिक शिक्षणाची एकंदर पद्धति नेटिव्ह लोकांसाठींच योजिलेली असून तें रास्तच होतें. गरीब युरोपियन लोकांच्या शिक्षणासाठीं सरकारनें केलेली व्यवस्था फार अपुरी होती. ह्या बाबतींत लॉर्ड मेयो यांना हेंच करणें इष्ट वाटलें कीं, युरोपियन मुलांसाठीं असलेल्या शाळांची स्थिति सुधारून त्यांची व्यवस्था उत्तम प्रकारच्या पायावर लावावयाची; हें काम होईपर्यंत नवीन शाळा घालावयाच्या नाहींत. लॉरेन्स असायलम्स संबंधानें चौकशी करून त्यांत सुधारणा करण्यासाठीं त्यांनीं एक कमिशन नेमिल्याचा उल्लेख मागें आलाच आहे. इलाख्याच्या मुख्य शहरांतून कंगाल ख्रिश्चन मुलांच्या व विशेषतः अति कंगाल वर्गापेक्षां किंचित् वरच्या स्थितींतील मुलांच्या शिक्षणाचीं साधनें वाढविण्यासाठींही त्यांनीं आपलें वजन खर्च केलें. तथापि त्यांच्या मनांतील हेतु तडीस जाण्यापूर्वीच त्यांचा अकालीं अंत झाला.

हिंदुस्तानांतील लोकांत शिक्षणाचा विशेष विस्तार व्हावा अशी तजवीज लॉर्ड मेयो यांनीं केली. त्याचप्रमाणें

प्रजेवर प्रत्यक्ष अमल चालविणाऱ्या कलेक्टर वगैरे अधिकाऱ्यांना शिक्षण मिळण्याविषयींही त्यांनीं परिश्रम केले. ते काम पाहूं लागले तेव्हां हिंदुस्तानांतील अति सुधारलेल्या प्रांतांपैकींही एकाद्या जिल्ह्याची लोकसंख्या सरकारला माहीत नव्हती. पुढें लॉर्ड मेयो यांच्या हुकमावरून बंगाल इलाख्याची प्रथमतः खानेसुमारी झाली. तेव्हां फक्त बंगाल्यांतच २ कोटी ६० लक्ष लोकसंख्या अजमासाबाहेर असल्याचें एकाएकीं नजरेस आलें. लोकसंख्या एवढी वाढली असेल असें कधीं कोणाच्या स्वप्नीं नव्हतें.

बंगाल्यांतील कोणत्याही जिल्ह्यावर एकादा ईश्वरीप्रकोप झाला असतां त्याचा प्रत्यक्ष परिणाम काय घडेल, त्याचा अंदाज करितां येण्याजोगीं प्रमाणें त्या काळीं उपलब्ध नसत. बंगाल्यांतील समुद्रकांठच्या प्रदेशांत १८६६ त एकाएकीं दुष्काळ पडला. तेव्हां संकट अगदीं येऊन ठेपलें तरी सरकारला त्याची दाद नव्हती. शेवटीं त्याचा प्रतिकार करणें अशक्य झालें व दुष्काळामुळें उपासमार होऊन लोक मरूं लागले. तेव्हां तें सरकारच्या ध्यानीं आलें. परंतु तेव्हां उपाय काय ? कोणत्याही प्रांताला लागणाऱ्या धान्याचें त्या प्रांतांत उत्पन्न होणाऱ्या धान्यांशीं प्रमाण; प्रांताच्या प्रांतांत व बाह्य प्रदेशाशीं चाललेल्या व्यापाराची तेथील चळवळ; ज्या कृत्यांनीं प्रांतांतील संपत्ति विभागली जाते अथवा ती तेथें गोळा होते; व एका प्रांतांतील फाजील उत्पन्न ज्या प्रांतांत उत्पन्न कमी असेल तेथें पाठवून त्या प्रांताची गरज भागवितां येते; अशा गोष्टींविषयीं हरएक प्रकारच्या

आंकड्यांच्या माहितीचें नांवही, अत्यंत महत्त्वाच्या प्रत्यक्ष सरकारी अंदाजपत्रकांतून नव्हतें.

ही स्थिति सुधारण्यासाठीं दोन भिन्न भिन्न उपाय योजण्याचा लॉर्ड मेयो यांनीं प्रयत्न केला. हिंदुस्तानच्या देशस्थितीसंबंधीं पाहणी करण्याची व्यवस्था त्यांनीं लाविली; आणि शेतकी व व्यापार ह्यांसंबंधीं एक खातें त्यांनीं नवीन काढिलें. सर्व देशाची पहिली खानेसुमारी त्यांच्या हुकमावरूनच झाली. देशस्थिती-संबंधाच्या पाहणीमुळें प्रत्येक जिल्हा, शहर व खेडेगांव ह्यांसंबंधीं माहिती छापून तयार झाली. ही माहिती ठिकठिकाणीं काळजीपूर्वक तपास करून मिळविलेली होती; व लोकांच्या सांपत्तिक व सामाजिक स्थितीसंबंधीं गोष्टी तीवरून कळून आल्या. इंग्लंडांत व्यापारसंबंधी बोर्ड असून ( १८९१ त झालेलें ) शेतकीसंबंधी नवें खातें आहे. ह्या दोन्ही संस्थांकडून इंग्लंडांत जीं कामें होतात, तीं दोन्हीं कामें हिंदुस्तानसंबधानें व्हावीं, म्हणून त्यांनीं शेतकी व व्यापारसंबंधी खातें काढिलें. सरकार हें हिंदुस्तानांतील बडे जमीनदार होय. तेव्हां आपल्या साऱ्याचें ओझें रयतेवर जितकें कमी पडेल, तशा बेतानें सरकारला आपल्या अवाढव्य जमाबंदीची व्यवस्था लावावी लागेच. शिवाय शेतकऱ्यांना आपापल्या शेताची स्थिति सुधारितां यावी म्हणून पाटबंधाऱ्यांचीं कामें करून व त्यांस अगाऊ रोख पैसे देऊनही मदत करावी लागे. तसेंच देशांतील अफाट जंगलाची व्यवस्थाही सरकारला पाहावी लागे.

शेतकी खात्याची संस्थापना लॉर्ड मेयो यांनीं केली तेव्हां त्या खात्याच्या कामकाजासंबंधानें कांहीं मर्यादा त्यांनीं ठरवून दिली. त्या मर्यादेंत त्या खात्यांतील कामगार वागले असतां फायदा व्हावयाचा. वाफेचे नांगर अथवा " आमोनियाचीं खतें " ह्यांच्या योगानें हिंदुस्तानांतील शेतकऱ्याला त्याचा धंदा शिकवितां येईल अशी कल्पना मनांत आणणें फार अविचाराचें आहे, हें त्यांच्या लक्षांत आलें. त्यांनीं एकदां लिहिलें आहेः—" आमोनियाचें खत " ह्याचा नक्की अर्थ मला माहीत नाहीं. ह्याचा अर्थ जर ग्वानो नांवाचें, सल्फ्युरिक आसिड घातलेलें फास्फेटचें किंवा असेंच दुसरें एकादें कृत्रिम खत असेल, तर त्याचा उपयोग हिंदुस्तानांतील शेतकऱ्यांस करावयास सांगणें म्हणजे शांपेन* दारूच जमिनींत खताऐवजीं घालण्यास सांगण्याप्रमाणें होईल." हृदयाच्या नात्यानें लिहिलेल्या दुसऱ्या एका पत्रांत ते लिहितातः— ' शेतकीसंबंधानें आपणांस दोन गोष्टींची खबरदारी घेतली पाहिजे. पहिली अशी कीं, हिंदुस्तानांतील शेतकरी आज शेकडों वर्षे शेतकीसंबंधानें ज्या तजविजी करीत आले आहेत, त्यास करण्याविषयीं आपण त्यांना दिमाखानें सांगून उपयोग नाहीं. दुसरी अशी कीं, ज्या तजविजी त्यांना योजितां येण्यासारख्या नसतील, अथवा त्या योजितां येण्यास अवश्य तीं साधनें नसतील, अशा तजविजी योजण्याविषयींही सांगून उपयोग नाहीं. सारांश, ह्या दोन्हीं-

* फ्रान्स देशांत पूर्वीं शांपेन नांवाचा एक परगणा होता त्यांत केलेला दारू. ही फार सतेज व झगझगीत असते. ( भा. क. )

पैकीं कोणतीही गोष्ट आपण केल्यास ते आपल्याला हंसतील; व आपण त्यांच्या खऱ्या हिताचा उपदेश केला असतांही तिकडे दुर्लक्ष करण्याचें शिक्षण त्यांना मिळेल."

हिंदुस्तानांतील लोकांच्या स्थितींत कायमची सुधारणा होणें हें खुद्द लोकांवरच अवलंबून राहणार; अशी लॉर्ड मेयो यांची पक्की समजूत झालेली होती. स्थानिक स्वराज्याची सुरवात होऊन म्युनिसिपालिट्यांच्या कारभाराची बरीच मदत सरकारी अधिकाऱ्यांना मिळूं लागण्याचा काळ केव्हां येईल, इकडे त्यांचें लक्ष होतें. तसेंच अशा प्रकारच्या संस्था स्थापण्याच्या कामीं जी जबाबदारी असते, तिलाही हे डगमगले नाहींत. आपल्या विधायक कौन्सिलांत ते एकदां म्हणाले:—" ज्या शहरांतील म्युनिसिपालिट्या लोकांचें आरोग्य, त्यांची संपत्ति व त्यांचें सुख वाढवितील, अशी आमची समजूत होईल, त्यांना उसनवार पैसे देण्याची पद्धति आम्ही नुकतीच सुरू केली आहे." सर डोनल्ड म्याक्लिअड यांनीं पंजाबच्या लेफ्टेनेंट गव्हर्नरच्या हुद्द्यावर असतां हिंदुस्तानसंबंधानें जी अनेक प्रकारची उत्तम कामगिरी बजाविली, तींतील एक प्रकार असा कीं, त्यांनीं तेथें म्युनिसिपल संस्थांची वाढ उत्तम केली. ही गोष्ट लॉर्ड मेयो यांनीं प्रसिद्धपणें बोलून दाखविली आहे.

ते म्हणतात:—" पृथ्वीवरील हरएक देशांत मुलकी राज्यकारभाराचा पाया व सुधारणेचें मुख्य बीज म्हटलें म्हणजे नेहमीं म्युनिसिपल संस्थाच होत. तेव्हां अशा संस्था स्थापण्यांत ज्या माणसाला यश आलें, त्याची

प्रशंसा करावी तितकी थोडीच. माझी अशी समजूत आहे कीं, आपल्या शहाणपणाच्या राज्यकारभारामुळें, आपापल्या शहरच्या म्युनिसिपालिटीच्या कारभारांत चांगलेंच लक्ष घालण्याविषयीं त्यांनीं ( सर डोनल्ड यांनीं ) शेंकडों नेटिव्ह लोकांचें मन वळविलें; आणि ज्या स्थितीमुळें परिणामीं लोकांना फार सुख होणार, तिचा पाया त्यांनीं अशा रीतीनें घातला. " स्थानिक सरकारें व त्यांच्या प्रांताची जमाबंदी, ह्यांसंबंधानें त्यांनीं जे महत्त्वाचे फेरफार केले, त्यांचें सविस्तर वर्णन ६ व्या प्रकरणांत झालेंच आहे. त्या प्रसंगीं तरी लॉर्ड मेयो यांचा हेतु अशाच धोरणाचा होता.

स्थानिक स्वराज्यासंबंधाच्या सरकारी ठरावांत त्यांनीं आपल्या हातानें असा मजकूर घातला आहे:--" ह्या सरकारी ठरावाचा अंमल ह्याचा पूर्ण अर्थ मनांत आणून इमानेंइतबारें झाला असतां स्थानिक स्वराज्याची अभिवृद्धि करण्याची संधी मिळेल; म्युनिसिपल संस्था विशेष दृढतर करितां येतील; व कामकाज चालविण्याच्या बाबतींत एतद्देशीय व युरोपियन लोकांचें संघट्टन होण्याचे प्रसंग पूर्वीपेक्षां अधिक येतील. " त्यांनीं आपला मुख्य उद्देश थोड्या शब्दांत व्यक्त केला असून त्यांचें विस्मरण कधीं व्हावयाचें नाहीं. ते शब्द असे:—" हेतु इतकाच कीं, अनेक लोकांना व वर्गांना राज्यकारभाराच्या उत्तम पद्धतीचें शिक्षण मिळावें. "

लॉर्ड मेयो यांच्या कारकीर्दींतील कायद्यांविषयीं हकीगत विस्तारभयास्तव एथें देतां येत नाहीं. कायद्यांसंबंधीं

कामें तेव्हां फार झालीं; व तीं अति विचारपूर्वक झालीं. परंतु तीं कामें प्रत्यक्ष दोन प्रख्यात कायदेपंडितांकडून झालीं आहेत. ते सर हेन्री मेन व सर फिट्झजेम्स स्टीफन हे होत. लॉर्ड मेयो यांच्या कारकीर्दींत हे एकामागून एक कौन्सिलांत कायद्यासंबंधीं सल्लागार होते. ही सर्व हकीगत हंटर साहेबांच्या लॉर्ड मेयो यांच्या मोठ्या चरित्रांत सविस्तर दिलेली असून ती खुद्द सर फिट्झजेम्स यांनीं लिहिलेली आहे.

लॉर्ड मेयो यांच्या कारकीर्दींतील एक सर्वसाधारण गोष्ट मागील विवेचनांत पुष्कळांस आढळून येणार नाहीं. हिंदुस्तानांतील राज्यकर्त्यांना सरकारी कामकाजें करावीं लागतात; त्यांपैकींच संस्थानिक वगैरेंचें आदरातिथ्य हें एक आहे. हें कर्तव्य सर्व अधिकारी आपापल्या सामर्थ्यानुसार उत्तम प्रकारें बजावितात. मात्र कित्येकांना तें अनायासें बजावितां येतें; कित्येकांना ह्या कामीं विशेष यातायात पडते. लॉर्ड मेयो हे सर्व पदवींच्या व सर्व वर्गांच्या लोकांचें आदरातिथ्य मोठ्या थाटानें करीत. ह्यामुळें ब्रिटिश राज्याला तेणेंकरून एक प्रकारचा दुजोराच आला. इंग्लंडच्या राजपुत्राचा हिंदुस्तानांतील लोकांस व राजांस परिचय करून देण्याचा पहिला योग सुदैवानें आपल्याला आल्याबद्दल त्यांना मोठा अभिमान वाटे. राज्ञीपुत्र ड्यूक ऑफ् एडिंबरो हे देशांतून प्रवास करीत चालले, तेव्हां ह्या एशिया खंडांतील रहिवाशांच्या मनांतील अनेक मनोवृत्तींना भरतें आलें. दिल्लीचें बादशाही तख्त नष्ट झाल्यापासून अशा प्रकारच्या मनोवृत्ति

त्यांच्या अंतःकरणांत मुग्धच होत्या. परंतु हे राज्ञीपुत्र हिंदुस्तानांत प्रत्यक्ष आल्यामुळें एथील लोकांच्या राजनिष्ठेला उकळी आली. अशी उकळी आजपर्यंत कधीं आल्याचें दुसरें उदाहरण ब्रिटिश हिंदुस्तानच्या इतिहासांत सांपडावयाचें नाहीं. राज्ञीपुत्रांच्या आगमनामुळें शांततेचा भंग होण्याचा अगदीं संभव राहिला नाहीं. ज्या भयंकर झटापटीमुळें अखेरीस हिंदुस्तानचें राज्य प्रत्यक्ष इंग्लंडच्या राजाकडे गेलें त्या झटापटीचें विस्मरण पडून तीसंबंधानें लोकांच्या मनांत डाचत असलेल्या गोष्टींचेंही विस्मरण पडलें.

सरकारी कामकाजांत आपण कधीं हार जाणार नाहीं अशी लॉर्ड मेयो यांच्या मनाची पूर्ण खात्री असे; त्याचप्रमाणें आदरातिथ्यासंबंधीं कामांतही असे. राज्यकारभाराचें त्यांच्या आंगीं अलौकिक सामर्थ्य होतें; व जणूं काय त्यांत कांहीं व्यंग पडूं नये म्हणूनच कीं काय, त्यांचा चेहरा भव्य, त्यांचा आदरातिथ्याचा प्रकार थाटमाटाचा व राहणी भपकेदार असणें साहजिकच होतें. हिंदुस्तानसंबंधीं इंग्रजी कादंबऱ्यांपैकीं अत्यन्त मनोहर अशा कादंबरींत* ह्या देशांतील समाजाचे पुढारी कशा प्रकारचे असावे ह्याचें चित्र रेखाटलें आहे. आतां त्या कादंबरीकारानें कांहीं लॉर्ड मेयो यांस उद्देशून तें वर्णन केलेलें नाहीं; परंतु तें त्यांस हुबेहुब लागू पडतें. तथापि हिंदुस्तानच्या एकाद्या मोठ्या व्हाइसरायाच्या

* सर हेन्री कनिंगह्याम यांनीं केलेली दस्तिपूर—Dustypore—नांवाची कादंबरी.

सामाजिक आचरणाचें साधारण स्वरूप लक्षांत आणून देणें असल्यास त्याचें हुबेहुब चित्र उठल्याशिवाय प्रायः रहावयाचेंच नाहीं; ही गोष्ट त्या वर्णनकाराच्या कदाचित् लक्षांतही यावयाची नाहीं. मंत्रिसभेंत म्हणा किंवा दिवाण-खान्यांत म्हणा; त्यांचें आचरण एकसारखेंच शांत व ममतेचें असून त्यांत कोठेंही व्यंग नसे. सर फिट्झजेम्स स्टीफन यांना कांहीं आपल्या प्रिय पुरुषाचें स्तोम माजविण्याची हौस नसे. तथापि ते म्हणतातः—“ ज्यांवर मनःपूर्वक प्रेम करून त्यांना मान द्यावा असें माझ्या मनाला वाटेल, असे दुसरे गृहस्थ मला कोणी कधीं आढळले नाहींत. ”

# प्रकरण नववें.

## शेवट.

[ तुरुंगांतील व्यवस्थेसंबंधीं त्यांचे विचार.—तुरुंगाच्या व्यवस्थेंत सुधारणा करण्याची आवश्यकता.—अंदमानबेटांतील स्थिति.—ती सुधारण्यासाठीं त्यांची योजना.—तेथील जमाबंदीच्या व्यवस्थेंत सुधारणा.—अंदमानसंबंधानें हिंदुस्तानच्या तिजोरीवर पडत असलेला बोजा.—हा बोजा कमी करण्याविषयींचे उपाय.—अंदमानचे नवे सुपरिंटेंडेंट यांच्या व्यवस्थेस आरंभ.—मेयो हे अंदमानला जातात.—बेटांची तपासणी.—आरोग्यमंदिरासाठीं जागेची योजना.—मौंट हारियटची ह्या कामासाठीं निवड.—त्या ठिकाणची प्रत्यक्ष पाहणी.—टेंकडीवरून खालीं उतरणें.—व्हाइसराय साहेबांवर हल्ला. त्याचा परिणाम.—प्राणान्त.—तेव्हांचा हृदयद्रावक देखावा.—नंतरचे विधि.—मारेकऱ्याचा शेवट.—त्याचा पूर्ववृत्तांत.—सूड उगविण्यासाठीं त्याचे प्रयत्न.—त्याचें शरीरसामर्थ्य.—अखेरची निरवानिरव.—ह्यांच्या संबंधानें एका ऐरिश वर्तमानपत्रांतील उतारा. ]

देशाच्या आभ्यंतर व्यवस्थेसंबंधीं एका कामांत लॉर्ड मेयो यांनीं विलक्षण कळकळ दाखविली: तें काम म्हणजे तुरुंगांतील शिस्त हें होय. ऐर्लंडच्या चीफ सेक्रेटरीच्या हुद्द्यावर असतांनाच हा प्रश्न त्यांच्या ढळढळीत नजरेस आला होता. पुढें ह्या देशांतील ठिकठिकाणचे तुरुंग पाहिल्यानंतर त्यांनीं आपल्याइकडील रोजनिशांतून ह्या संबंधानें टीका केली असून सूचनाही लिहिलेल्या आढळतात. जिल्हा माजिस्ट्रेट ( कलेक्टर ) हे हुद्द्याच्या नात्यानें जिल्ह्यांतील तुरुंगाचे मुख्य अधिकारी असतात;

व त्यांतील कैद्यांच्या आरोग्याची जबाबदारी सरकारी डाक्टरवर ( सिव्हिल सर्जनवर ) असते. परंतु ह्या दोन अधिकाऱ्यांत कैक दिवस झटापट सुरू असल्याचें त्यांना आढळलें. जिल्हा माजिस्ट्रेट यांचा संकल्प असे कीं, आपल्या जिल्ह्यांतील गुन्हेगार मंडळींना सुखसमाधान लेशही होणार नाहीं, अशा प्रकारची तुरुंगाची व्यवस्था ठेवावयाची. सिव्हिल सर्जन यांचाही उलट असाच दृढ संकल्प असे कीं, हिंदुस्तानांतील तुरुंगांतून मृत्युसंख्येचें जें भयंकर प्रमाण पडतें तें कमी झालें पाहिजे. फार कशाला, ह्या बाबतींत विशेष कळकळ दाखविणाऱ्या डाक्टरांना, तुरुंगांत येतांना कैद्याच्या असलेल्या वजनापेक्षां शिक्षा भोगून सुटतांना त्याचें वजन बरेंच पौंड वाढल्यास विशेष समाधान वाटलें असतें.

तेव्हां अत्यंत कडक किंवा अत्यंत सौम्य विचार बाजूस ठेवून लॉर्ड मेयो यांना एक तृतीय पंथच काढावयाचा होता. हिंदुस्तानांतील तुरुंगांतून अशा प्रकारची शिस्त असली पाहिजे कीं, कारागृहवास म्हणजे एक प्रकारची शिक्षा होय, असें कैद्यांना वाटलेंच पाहिजे; असा त्यांचा पक्का संकल्प होता. परंतु उलटपक्षीं ते म्हणतातः— " ज्याला कांहीं मुदतीची किंवा जन्मठेपेची केवळ कैदेची शिक्षा झालेली आहे, त्याला रोगांनीं ग्रस्त अशा तुरुंगांत ठेवून देहान्त शिक्षा भोगण्यास लावावयाचा कोणाला अधिकार नाहीं. " ज्यांची स्थिति पाहिली असतां मनाला अत्यंत खेद उत्पन्न व्हावयाचा व ज्यांची व्यवस्था आधीं लावणें जरूर, असे कित्येक तुरुंग त्यांच्या नजरेस आलेले

होते. अंदमानबेटांतील कैद्यांची वसाहत ही अशाच प्रकारची होय. ह्या ठिकाणीं १८६७ त मृत्युसंख्येचें प्रमाण हजारीं १०१ वर गेलें होतें. परंतु लॉर्ड लॉरेन्स व लॉर्ड मेयो यांनीं योजिलेल्या उपायांमुळें १८७० त हें प्रमाण हजारीं १० पर्यंत उतरलें. तथापि लॉर्ड मेयो यांनीं केलेल्या चौकशीवरून उघड झालें कीं, तेथील शिस्त फार ढिली असल्यामुळें परिणाम लज्जास्पद घडतील. तेथील कैद्यांच्या वसाहतींत १८७१ त एक अति निर्दयपणाचा खून झाला; व त्याचा कांहींच सुगावा लागेना. तसेंच योग्य अधिकाऱ्यांनीं त्याजबद्दलची हकीगतही वरिष्ठ अधिकाऱ्यांस तांत्रिकच कळविली. ह्यामुळें ह्या वेळापर्यंत सुरू असलेल्या पद्धतींत अथपासून इतिपर्यंत फेरफार केला पाहिजे; अशी लॉर्ड मेयो यांना आवश्यकता वाटूं लागली.

बंगाल इलाख्यापासून ६०० मैलांवर समुद्रापलीकडे असलेल्या कित्येक बेटांच्या ह्या समुदायांत उत्तर हिंदुस्तांनील पक्के बिलंदर असे ८००० कैदी असून त्यांच्या बंदोबस्तास थोडेसे इंग्रज कामगार व थोडेच शिपाई असल्याचें लॉर्ड मेयो यांना आढळून आलें. ह्या कैद्यांपैकीं पुष्कळ सरहद्दीवरील कडव्या जातींचे होते; व बहुतेक कदी जन्मठेपेचे असून त्यांना कशाचीही पर्वा नव्हती; व ह्या लोकीं त्यांना इतःपर कोणत्याही प्रकारची आशा राहिली नव्हती. अशा प्रकारची वसाहत सुरक्षित राहण्यासाठीं तेथील कायदेकानू स्पष्टपणें ठरविले पाहिजेत; कामगार लोक हुकमाप्रमाणें बिनचूक चालतील

अशी तजवीज पाहिजे; व कैद्यांमध्यें कडक प्रकारची शिस्त पाहिजे. लॉर्ड मेयो यांच्या हुकमावरून १८७१ त ह्या वसाहतीसंबंधानें चौकशी झाली. तेव्हां वसाहतीच्या संरक्षणार्थ अवश्य अशा ह्या तिन्ही गोष्टींचा अभाव तेथें दिसून आला. कामगारांत आपापसांत तंटेबखेडे असून त्यांचें वर्तन हुकमांना अनुसरून नाहीं; व कोणत्याही कैद्याला वस्तुतः मनमुराद दारूचा सांठा करूं देऊन तिच्या द्वारें त्याला स्वतःला व त्याच्या सोबत्यांना आणखी गुन्हे करण्यास संधी द्यावयाची, अशा प्रकारची कैद्यांच्या संबंधानें अव्यवस्था होती, असें त्यांना आढळलें. ह्या दुर्व्यसनाचा त्या वसाहतींत सर्वत्र फैलाव झाल्यानंतरच तो खून घडला; व तेणेंकरून व्हाइसराय यांना ह्या वसाहतीच्या व्यवस्थेसंबंधाचा पुनः विचार करावा लागला.

१८७१ सालच्या पहिल्या सहामाहींत लॉर्ड मेयो हे सिमला एथें असतां त्यांचें मन ह्या विषयाकडे गुंतलें होतें. "केवळ जन्मठेपेचे कैदी पाठवावयाचे असा विचार ठरला असतांही जेथील कैद्यांची वस्ती अखेरीस २०००० पर्यंत पोहोंचेल," अशा वसाहतीच्या राज्यव्यवस्थेची योजना आपणांस करावयाची आहे; असें त्यांना दिसून आलें. ह्यास्तव त्यांना प्रथमतः त्या बेटाचा राज्यकारभार कसा चालवावा, ह्या संबंधानें एक योजना ठरवावयाची होती. ती योजना अशी असावी कीं, कोणत्याही कारणानें तेथील राज्यकारभाराची घडी बिघडूं नये; व त्या कारभारासाठीं त्या एका अंगास पाठविलेल्या थोड्याशा इंग्रज कामगारांच्या जीविताला अगदीं धक्का पोहोंचूं नये. त्यांची

अशीही इच्छा होती कीं, वसाहतीच्या ह्या नवीन राज्यपद्धतीमुळें कैद्यांवर नजर विशेष कडक राहून त्यांना शिस्तही कडक लागावी; व काळ्या पाण्याची दहशत कैद्यांना व मुख्यत्वें नवीन येणाऱ्या कैद्यांना विशेष बसावी. तथापि जे उद्योगी व चांगल्या वर्तनाचे असतील, त्यांना ह्या नवीन पद्धतीमुळें अखेरीस कांहीं उद्योगधंदा चालविण्याचें सामर्थ्य यावें, व आपल्या गुन्ह्यामुळें हद्दपार होऊन ज्यांचा आपल्या जन्मभूमीशीं आजपर्यंत असलेला संबंध तुटून पुढेंही मुळींच राहिला नाहीं, अशा त्या कैद्यांना, आपण जणूं काय ह्या नवीन ठिकाणचेच रहिवासी आहों असें वाटूं लागावें; व ह्या ठिकाणचा अभिमान त्यांच्या मनांत उत्पन्न होऊन आपल्या हिताहिताचा संबंध ह्याच वसाहतीशीं आहे, अशी त्यांची समजूत व्हावी.

तिसरी गोष्ट अशी कीं, ह्या वसाहतीच्या जमाखर्चाची व्यवस्था विशेष निर्दोष तत्त्वांवर लावण्याचा त्यांनीं निश्चय केला. तसेंच आपल्या उपायांमुळें ते कैदी पशुतुल्य स्थितींतून निघून तेथें वसाहत करूं लागून आपला चरितार्थ चालविण्याचें सामर्थ्यही त्यांच्या आंगीं येईल; अशी त्यांना आशा होती. त्या वसाहतीसाठीं कायदेकानूंचें पुस्तक त्यांच्या नजरेखालीं तयार झालें; व त्यांत स्वहस्तें त्यांनीं दुरुस्ती केली. राज्यकारभाराचें एखादें बिकट काम पार पाडणें असल्यास त्या कामाला “लायक माणूस पाहिजे,” असें त्यांचें नेहमींचें म्हणणें असे; म्हणून त्या मताला अनुसरून वसाहतीची प्रत्यक्ष पुनः व्यवस्था

लावण्यासाठीं मिळण्यासारखा सर्वोत्कृष्ट कामगार त्यांनीं शोधून काढिला. त्यांनीं पसंत केलेला मनुष्य लष्करी खात्यांतील कामगार असून त्याचें वर्तन बाणेदार होतें, व राज्यकारभारांतील त्याचें चातुर्य अनुभवास आलेलें होतें. ह्या कामगाराबरोबर १८७१ च्या उन्हाळ्यांत ते नवे कायदेकानू देऊन त्याला त्यांनीं तिकडे रवाना केलें.

आपल्या हुद्द्याच्या नात्यानें लिहिलेल्या एका पत्रांत ते म्हणतातः—" मेजर जनरल——हे ज्या कामाला लवकरच आरंभ करणार, तें अति जबाबदारीचें आहे. फार कशाला, ह्या जागीं असलेल्या अधिकाऱ्याला आपलें कर्तृत्व व आपली हिंमत जितकी चांगल्या रीतीनें दाखवितां येईल किंवा जितकी लोकसेवा करितां येईल, तितकी हिंदुस्तान सरकारच्या हाताखालच्या इतर कोणत्याही कामगाराला करितां येणार नाहीं; असें मला वाटतें. अंदमान, निकोबार हीं बेटें व त्याखालीं मोडणारीं इतर ठिकाणें. ह्यासंबंधानें हिंदुस्तान सरकारावर सांप्रत मोठा बोजा पडत आहे. परंतु मला अशी पूर्ण उमेद आहे कीं, त्यांच्या व्यवस्थेमुळें त्या बेटांचा कारभार तेथील उत्पन्नांत भागूं लागण्यास फारसा काळ लागणार नाहीं. ह्या वसाहतीबद्दल दरसाल सरासरीनें १५०००० पौंडांचा बोजा हिंदुस्तानच्या तिजोरीवर पडत आला आहे. म्हणजे काळ्या पाण्यावर पाठविलेल्या प्रत्येक गुन्हेगाराबद्दल ह्या देशाला दरमहा १ पौंड १२ शि. खर्च सोसावा लागतो. " ( बंगाल्यांतील तुरुंगांतील प्रत्येक कैद्याला सरासरीनें दरमहा ११ शि. ५ पे. खर्च येतो. )

ह्या बोजा ज्या उपायांनीं कमी करितां येईल असें त्यांस वाटत होतें, त्यांची सविस्तर हकीगत पुढें दिली आहे. ते उपाय असेः—तांदूळ व डाळदाणा यांची बेटांत योग्य प्रकारें लागवड करण्याची सुरवात करणें; बकऱ्यांची वाढ बेटांत सुरू करणें व मांसाच्या पुरवठ्याला खर्च कमी लागेलसें करणें; तुरुंगांत विणलेल्या कापडाचा उपयोग करणें आणि कपाशी व जवस ह्यांची लागवड करणें; बाह्य प्रदेशांतून आलेल्या सागवानाचा उपयोग न करितां बेटांत उत्पन्न झालेल्याचाच करणें, पूर्वी पोलीसची कांहीं तरी व्यवस्था होती, तिच्या ऐवजीं काळें सैन्य ठेवणें; व हिंदुस्तानशीं दळणवळण थोडया खर्चांत रहावें म्हणून आगबोटीचा उपयोग करणें. ह्या उपायांनीं दरसाल ३०००० पौंडांची शिलक तत्काळ पडूं लागेल, असा योग्य अधिकाऱ्यांचा अंदाज होता. ह्या वसाहतींत देखरेख ठेवण्याची किंवा कैद्यांना शिस्त लावण्याची कांहींच पद्धति नाहीं, असे कित्येक रिपोर्ट अलीकडे झाले होते; त्यांवरही लॉर्ड मेयो यांनीं टीका केली आहे. नंतर कैद्यांच्या वसाहतीचा बंदोबस्त लावण्याच्या महत्त्वाच्या कामीं ज्या मुद्द्यांकडे लक्ष दिलें पाहिजे, ते मुद्दे नीट विचारपूर्वक त्यांनीं थोडक्यांत दिले आहेत.

ह्या कैद्यांच्या वसाहतीची पुनः व्यवस्था लावण्याचें काम लॉर्ड मेयो यांनीं एका नवीन सुपरिंटेंडेंट साहेबांकडे सोंपविलें; व त्यांनीं तें मोठ्या उमेदीनें सुरू केलें. परंतु त्यांना आढळून आलें कीं, राज्यव्यवस्थेंत लॉर्ड मेयो यांनीं सुचविल्याप्रमाणें फेरफार करणें म्हणजे एक नवीन व्यवस्था

सुरू करण्यासारखेंच आहे. सहा महिन्यानंतर ह्यांनीं केलेल्या रिपोर्टावरून उमेद उत्पन्न होण्यासारखी होती खरी. तथापि हें काम किती महत्त्वाचें व किती बिकट आहे तें लॉर्ड मेयो यांनीं स्वतः पहावें; अशी इच्छा त्यांनीं प्रदर्शित केली.

सुपरिंटेंडेंट हे व्हाइसराय यांच्या प्रायव्हेट सेक्रेटरींना लिहितातः—" सुधारणा झाली आहे; तथापि एकंदर घाण मोडण्यास सुरवात करण्यापूर्वीं कसकशी व्यवस्था केली आहे तें लॉर्ड मेयो यांनीं समक्ष पहावें; अशी माझी फार इच्छा आहे. ही वसाहत प्रत्यक्ष पाहीपर्यंत हिची एकंदर स्थिति कोणाच्याही ध्यानांत येणें शक्य नाहीं. " ह्यांना पुढें अनेक अडचणी आल्या, तेव्हां ते पुनः लिहितातः—" ह्या सर्व गोष्टींची सुरळीत व्यवस्था माझ्या मतें गव्हर्नर जनरल यांच्या आगमनानेंच लागणारी आहे. "

ता. २४ जानेवारी १८७२ रोजीं अर्ल ऑफ् मेयो हे हिवाळ्यांतील फिरतीवर निघाले. त्यांचा उद्देश प्रथमतः ब्रह्मदेशांत जाण्याचा होता; व तेथून परत येतांना बंगालच्या उपसागरांतून अंदमान बेटांत जाऊन नंतर ओरिसा प्रांताची तपासणी करावयाची, असा होता. ह्या तिन्ही ठिकाणीं तेथील आभ्यंतर व्यवस्थेसंबंधानें महत्त्वाच्या प्रश्नांचा निकाल लागण्यास त्यांना स्वतः तेथें जाणें अवश्य होतें. ब्रह्मदेशांतील काम होऊन ता. ८ फेब्रुआरी १८७२ रोजीं अंदमान बेटांतील होपटौन नजीक सकाळीं ८ वाजतां त्यांच्या बोटीनें नांगर टाकिला.

राणी सरकारच्या ग्लास्गो नांवाच्या लढाऊ जहाजांतून व्हाइसराय व त्यांच्या पत्नी हीं त्या ठिकाणीं गेलीं. ग्लास्गोच्या जोडीला डाका नांवाची आगबोटही होती. तसेंच कामगार व पाहुणेमंडळी मिळून बराच भपकेदार लवाजमा ह्या दोन्ही बोटींमिळून त्यांच्याबरोबर होता.

सकाळचा फराळ झाल्याबरोबर लॉर्ड मेयो हे बोटींतून उतरले; व दिवसभर व्हायपर व रॉस ह्या बेटांची पुरी तपासणी त्यांनीं केली. अति भयंकर गुन्हेगारांना ह्याच बेटांत ठेविलेलें होतें. व्हाइसराय साहेबांच्या संरक्षणार्थ यथास्थित तजवीज केलेली होती. एका तुकडींतील पोलिस शिपायांना बंदुका दिल्या होत्या; व ते शिपाई गव्हर्नर जनरल व त्यांजबरोबरची मंडळी यांच्या-पुढें मागें व बाजूंनीं चालत होते. कैद्यांना सक्त रीतीनें त्यांचें नेहमींचें काम करण्यास लाविलें होतें; आणि व्हायपर व रॉस बेटांत एकंदर सैन्य सज्ज ठेविलें होतें; कारण थोडाफार धोका काय तो ह्या बेटांत दिसत होता. एक दोन कैद्यांना व्हाइसराय साहेबांस अर्ज देण्याची इच्छा होती; परंतु त्यांनीं प्रत्यक्ष त्यांजवळ न जातां त्यांच्याबरोबरच्या कामगारांच्या हातीं ते दिले. तसेंच व्हाइसरायांच्या आगमनार्थ कांहीं देणग्या वगैरे मिळून कित्येकांस माफी मिळेल; अशी आशा सर्व कैद्यांना उत्पन्न झाली होती. ह्यामुळें आपला थोडा बहुत तरी फायदा होणार असें प्रत्येकास वाटत असल्यामुळें सर्वांस एक प्रकारचें समाधान वाटत होतें.

सुमारें ५ वाजतां हें सरकारी तपासणीचें काम संपलें. तथापि साधल्यास वसाहतींसाठीं एकादें आरोग्यस्थान बनविण्याचा त्यांचा इरादा होता. त्यांचा हेतु असा कीं, ज्या कैद्यांना वरचेवर ताप येत असेल त्यांची त्या रोगापासून सुटका व्हावी. होपटौनच्या धक्क्यापासून बेटांत १॥ मैलावर मौंट हारियट नांवाची ११९६ फूट उंचीची टेंकडी आहे, ती ह्या कामीं उपयोगीं पडेल; असें त्यांना वाटलें. भयंकर प्रकारचे कैदी कांहीं होपटौन एथें ठेविलेले नव्हते. ज्यांचें वर्तन उत्तम ठरलेलें होतें अशा कैद्यांस तिकिटें देऊन त्यांनाच ह्या ठिकाणीं मोकळें सोडिलें होतें. तथापि सुपरिंटेंडेंट यांनीं ह्या मंडळीबरोबर पहारेकरी देऊन त्या पहारेकऱ्यांना होपटौनच्या धक्क्यावर पोहोंचविण्यासाठीं एक बोट दिली.

आरोग्यस्थानाचा हा विचार तडीस नेण्याचा लॉर्ड मेयो यांचा संकल्प असल्यामुळें ते म्हणतातः—"आपल्याला अजून एक तास उजेड मिळेल; सबब मौंट हारियटवर जाऊं." होपटौनच्या धक्क्यावर ते उतरले तेव्हां त्यांच्या बरोबरची आनंदी पाहुणेमंडळी संध्याकाळची थंड हवा खात असलेली त्यांना आढळली. त्यांजजवळून ते गेले तेव्हां प्रत्येकाशीं हास्यमुद्रेनें ते थोडेंबहुत बोलून पुढें गेले. एका बाईना ते म्हणतातः— "तुम्ही टेंकडीवर चलाच. तुम्हाला सूर्यास्ताची विलक्षण मौज दिसेल." तथापि तो चढाव फार अवघड असून रस्ता दाट जंगलांतून होता. ह्यामुळें नवीन एकच गृहस्थ त्यांजबरोबर जाण्यास तयार झाले. खुद्द त्यांच्याबरोबरची

मंडळी पराकाष्ठेची थकली होती. कारण टळटळीत उन्हांत ते सतत सहा तास तंगड्या तोंडीत होते. तथापि ज्या दिवशीं अति काम पडेल त्या दिवशीं तर लॉर्ड मेयो अतिच ताजेतवाने दिसत; त्याचप्रमाणें ते हल्लींही दिसत होते. त्यांनीं त्या थकलेल्या मंडळीपैकीं कित्येकांस आपण परत येईपर्यंत विश्रांति घेण्याविषयीं विनंती केली. तथापि असा कमकुवतपणा दाखविण्यास कोणी कबूल नव्हता हें उघडच आहे. अर्थात् सर्व मंडळी जंगलांत घुसली. मंडळी टेंकडीच्या पायथ्याशीं आली, तेव्हां व्हाइसराय हे आपल्या एका* एड-डी-कानकडे वळले, व त्याला त्यांनीं तेथें बसण्याचा हुकूमच दिला. दिवसभर त्याला आपल्या कामाची काळजी होती; व आतां ती कमी झालेली असून त्याच्या चेहऱ्यावर थकवा स्पष्ट दिसत होता.

सुपरिंटेंडेंट यांस एकच घोडा मिळाला असून तो त्यांनीं टेंकडीवर जाण्यासाठीं पाठविला. तथापि इतर मंडळी पायीं चालत असतां आपण घोड्यावरून जाणें बरोबर नाहीं, अशी हरकत लॉर्ड मेयो यांनीं प्रथम घेतली होती. अर्धी टेंकडी चढून गेल्यावर ते थांबून म्हणाले:— "आतां माझी चालण्याची पाळी आली; तुमच्यांपैकीं कोणी वर बसा." शिखरावर गेल्यावर आरोग्यस्थानाच्या दृष्टीनें टेंकडी कशी काय उपयोगी पडेल, हें त्यांनीं लक्षपूर्वक

---

* गव्हर्नर जनरल, गव्हर्नर, कमांडर-इन्-चीफ इत्यादि वड्या कामगारांचे हुकूम समजून घेऊन ते इतर अधिकाऱ्यांस कळविण्यासाठीं कित्येक लष्करी कामगार ह्या वड्या कामगारांपाशीं असतात; त्यांना एड-डी-कान म्हणतात. (भा. क.)

पाहिलें. तेव्हां वसाहतीच्या आरोग्याची सुधारणा करण्याचा मार्ग आपणांस सांपडला; तसेंच वसाहतीचा बंदोबस्त करण्याचे हे नवे उपाय योजीत असतांच लोकांच्या कल्याणार्थ उपाय योजण्याचा मार्गही आपणांस सांपडला असें त्यांस वाटलें. टेंकडीवरून सभोंवार बेटांच्या समुदायाकडे पाहून ते मोठ्यानें म्हणाले:— " २० लक्ष माणसांस पुरेशी मुबलक जागा एथें आहे. " लागलेच ते खालीं बसले, व समुद्रापलीकडे सूर्य अस्तास जात होता तिकडे त्यांनीं शांतपणानें न्याहाळून पाहिलें. एक दोनदां ते स्वस्थपणानें म्हणाले:—" काय सुंदर देखावा ! " नंतर ते थोडें पाणी प्याले. पुढें पुनः एकदां बराच वेळ पश्चिमेकडे पाहून त्यांनीं आपल्या प्रायव्हेट सेक्रेटरीपाशीं उद्गार काढिले:—" मी आजपर्यंत पाहिलेला अति सुंदर देखावा हाच असें मला वाटतें. " नंतर ते परत फिरले.

टेंकडीवरून उतरतांना मंडळी जपून जवळ जवळ राहून उतरली; कारण तेव्हां काळोख पडला होता. सुमारें तीन हिस्से उतार संपल्यावर व्हाइसराय, त्यांच्या बरोबरचे कामगार व पाहारेकरी यांस होपटौनकडून आलेले मशालवाले भेटले. त्यांच्या बरोबरच्या मंडळीपैकीं दोनजण घाईघाईनें धक्क्यापाशीं जाऊन पोहोंचले होते; म्हणून ह्या मशाली जंगलांतून मार्ग काढीत असतां त्यांना मधून मधून दिसत होत्या. नंतर तेथें घोड्यावरून जाण्यायेण्यापुरताच जो मार्ग होता त्यानें अरण्यांतून एकदम सर्व मशाली बाहेर पडल्या. तेथून धक्क्यापर्यंत

जाण्यास एक मिनिट लागावयाचें. ग्लासगो जहाज धक्क्याच्या डाव्या आंगास असून त्यावरील दिव्यांची मोठी ओळ पाण्याला लागलेली दिसत होती; त्यापलीकडे स्काटिया व डाक्का ह्या बोटी असून त्यांवरही दिवे लागले होते; आणि उजव्या आंगास नेमेसिस नांवाची आणखी एक बोट होपटौनच्या विशेष नजीक असून कोळसा भरून घेत होती. बोटींवरील तासांचे सात नुकतेच वाजले होते. धक्क्याच्या पायऱ्यांजवळ एक वाफेचा पडाव असून त्यांतील वाफ सूं सूं सुटत होती; व त्याजवरील खलाश्यांपैकीं कांहीं मंडळी धक्क्याच्या एका टोंकावर गप्पा मारीत होती. ह्या वेळीं पक्का अंधार पडला होता, व त्या घोर जंगलाची ओळ पाण्यापर्यंत लागली आहेसें दिसत होतें.

धक्क्याच्या पुढील आंगास डाव्या बाजूस कांहीं मोठाले दगड सुटे पडलेले होते; त्यांजवळून व्हाइसराय व त्यांजबरोबरची मंडळी गेली; व धक्क्यावरून पुढें जाऊं लागली. तेव्हां दोन मशालवाले पुढें असून त्या मशालींचा झगझगीत प्रकाश लॉर्ड मेयो यांच्यावर पडला होता. त्या वेळीं त्यांच्या आंगांत एक प्रकारच्या रेशमाचा करड्या रंगाचा कोट होता; व त्यांच्याजवळच पुढच्या व मागच्या बाजूंस त्यांचे प्रायव्हेट सेक्रेटरी व अंदमानचे सुपरिंटेंडेंट हे होते. ह्या मंडळीच्या मागें कांहीं पावलांवर डाव्या आंगास ग्लासगो जहाजावरील निशाणासंबंधीं एक कामगार व दुसऱ्या आंगास एंजिनियर खात्यापैकीं एक कामगार होते; व हत्यारबंद शिपाई त्यांच्या मधल्या बा-

जूस, परंतु व्हाइसराय साहेबांच्या कांहींसे नजीक होते. इतक्यांत दुसऱ्या दिवशीं सकाळीं काय काय कामें करावयाचीं त्याजबद्दल हुकूम देण्यासाठीं सुपरिंटेंडेंट हे व्हाइसराय साहेबांच्या परवानगीनें बाजूस वळले; व जहाजांत जाण्यासाठीं जो जिना उतरावयाचा तिकडे इतर मंडळीच्या आधींच व्हाइसराय पुढें सरले. इतक्यांत त्या सुट्या दगडांच्या राशीमागून एकादें जनावर घुसल्यासारखा आवाज पिच्छाडीच्या लोकांनीं ऐकिला; एकदोघांनीं तर मशालीच्या उजेडांत, एका हातात चाकू असून तो हात एकदम खालीं होतांना पाहिला. एकादा बायबार व्हावा तशासारखा आवाज प्रायव्हेट सेक्रेटरी यांनीं ऐकिल्याबरोबर त्यांनीं तोंड फिरविलें. तेव्हां व्हाइसराय यांच्या पाठीवर वाघासारखा चिकटलेला मनुष्य त्यांना आढळला.

क्षणांत बारा माणसें मारेकऱ्यावर पडलीं, एक इंग्रज कामगार त्यांना ओढूं लागला; व नेटिव्ह पहारेकऱ्यांना आपल्या तरवारीच्या मुठीनें मागें सारूं लागला; नाहींतर त्यांनीं त्या मारेकऱ्याला जागच्या जागींच ठार केलें असतें. ह्या वेळीं मशाली विझून गेल्या होत्या, व व्हाइसराय यांची धक्क्याच्या बाजूवरून पाण्यांत झोकांडी गेली होती. तथापि गुडघाभर पाण्यांतून ते उठत आहेत, व आपल्या भिवईवर आलेले केंस हातानें बाजूला सारीत असून जणूंकाय शुद्धीवर येण्याच्या प्रयत्नांत आहेत, असें अंधक अंधक दिसत होतें. त्याचे प्रायव्हेट सेक्रेटरी त्या लाटांच्या खळखळाटांत क्षणांत त्यांच्या जवळ गेले;

व त्यांना किनाऱ्यावर चढण्यास त्यांनीं मदत दिली. तेव्हां ते आपल्या सेक्रेटरींना हळूच म्हणाले:—“ त्यांनीं मला मारिलें आहे. ” नंतर त्याहून मोठ्या स्वरानें ते पुढील किंवा त्या अर्थाचे शब्द बोलले:—“ कांहीं फिकीर नाहीं; फारशी इजा झाली आहेसें मला वाटत नाहीं. ” हे शब्द धक्क्यावरील लोकांस ऐकूं आले. एका मिनिटांत पुनः मशाली लावून त्यांच्या धुरकट प्रकाशांत धक्क्याच्या बाजूला एका देशी ओबडधोबड खटाऱ्यांत पाय खालीं सोडून ते बसले. नंतर लोकांनींच त्यांना नीट उचलून गाडींत ठेविलें. तेव्हां त्यांच्या विरविरीत कोटाला पाठीमागच्या आंगाला ठिगळाच्या आकाराचा काळा डाग लोकांच्या दृष्टीस पडला. त्यांतून रक्ताचा प्रवाह सुरू झाला; व आपल्या हातरुमालांनीं तो बंद करण्याचा माणसांनीं प्रयत्न केला. पळ दोन पळ ते खटाऱ्यांत बसले; नंतर ताडकन मागल्या आंगास पडले. “ माझें डोकें उचला ” हे त्याचे तेव्हांचे शब्द असून ते चांगलेसे ऐकूं येण्यासारखे नव्हते; ह्यानंतर ते मुळींच बोलले नाहींत.

त्यांनीं लॉर्ड मेयो यांना वाफेच्या पडावावरून ग्लास्गो बोटीकडे चालविलें; तेव्हां त्यांचा प्राणान्त झालेला आहे असें कित्येक मनांत समजले होते. दुसऱ्या कित्येकांना नुसता तर्क करीत बसल्याबद्दल स्वतःचाच राग येऊन त्यांनीं त्यांचा कोट व आंतील सदरा कापून काढिला; व भराभर कापड फाडून त्या तुकड्यांनीं व आपल्या तळहातांनीं ती जखम बंद केली. दुसरे कित्ये-

कजण त्यांचीं पावलें व पाय चोळूं लागलीं. तिघांनीं त्यांचें डोकें सांवरून धरिलें. त्यांच्यापासून थोड्याच हातांवर मारेकऱ्याला बांधिलें असून त्याच्या कानठाळ्या बसून गेल्या होत्या. पडाव काळोखांत तिरासारखे चालू झाले; इतक्यांत पलीकडच्या बोटींवरून ८ वाजले. इकडे ग्लास्गोवरील पाहुणेमंडळी भोजनाची वाट पाहत होती व जेवणासाठीं त्यांनीं एक मासा पकडला होता, त्यावरून त्यांच्यांत थट्टामस्करी सुरू होती. ह्या बोटीजवळ पडाव आल्याबरोबर आंतील प्रकार कोणाच्या ध्यानीं येऊं नये; म्हणून पडावांतील दिवे एकदम मालवून टाकण्यांत आले. मंडळींनीं लॉर्ड मेयो यांस अलग उचलून त्यांच्या खोलींत नेलें; व त्यांच्या पलंगावर त्यांना ठेविलें. तेव्हां सर्वांना कळून आलें कीं त्यांचा प्राणान्त होऊन गेला आहे.

बोटीवरील लोकांना अशा प्रकारची रात्र त्यांच्या हयातींत कधींच गेलेली नव्हती. त्या बोटींत ६०० माणसें असून तीं आतांपर्यंत मोठीं उल्हासांत होतीं; परंतु बोटींतील सर्व गडबड क्षणांत बंद झाली; व असें भासूं लागलें कीं, तशी गडबड पुनः केव्हांच सुरू होणार नाहीं. डाक्टरांनीं प्रेताची तपासणी केली; तेव्हां आढळून आलें कीं, एकाच सुऱ्यानें खांद्यावर दोन भोसके पाडले असून ते थेट छातींतील पोकळ भागापर्यंत पोहोंचले आहेत; व त्यांतील कोणत्याही एका भोसक्यानें देखील प्राणान्त व्हावयाचा. एका बोटीवर पाहुणेमंडळी होती; त्या मंडळींत स्फुंदस्फुंदणें व रडारड सुरू झाली.

परंतु ज्या बोटीवर खुद्द व्हाइसराय साहेबांचें प्रेत होतें, तेथील मंडळींचें दुःख इतकें अपरंपार होतें कीं तें बाह्य उपायांनीं सांगतां किंवा दाखवितां येण्यासारखें नव्हतें. माणसें एकेकटींच रात्रभर इकडे तिकडे फिरत होतीं; व आपापल्या मनांत मोठ्या उद्वेगानें म्हणत कीं, "हा प्रसंग आपल्यापैकीं एकाद्यावर आला असता तर बरें होतें." ज्यांचा पति अशा स्थितींत त्यांना परत मिळाला, त्या बाईच्या तेव्हांच्या विलापांचें वर्णन त्या वेळीं शब्दांनीं करितां येण्यासारखें नव्हतें; व अजामितीसही तें करितां यावयाचें नाहीं."

अरुणोदय होतो तों बोटीवरील निशाणाची दांडी अर्धी पाडलेली; रुंद पांढरा पट्टा शिशाच्या रंगासारखा काळसर केलेला; सर्व दोरखंडें सैल सोडिलेलीं; व शिडाला सावरून धरणाऱ्या कांठ्या वेड्यावांकड्या अडकून लोंबत असलेल्या; असा अशुभ देखावा बोटीवर दिसूं लागला. तेणेंकरून दुसऱ्या बोटीवरील पाहुणेमंडळींपैकीं रात्रभर ज्यांचीं मनें दुःखातिशयामुळें वरचेवर उचंबळून ज्यांना वारंवार वाटे कीं, व्हाइसराय हे जिवंत असावे; त्यांच्या खरा प्रकार नजरेस आला. खुद्द व्हाइसराय यांच्या बोटीवर मुकाट्या मुकाट्यानें व गंभीरपणानें कांहीं कृत्यें सुरू होतीं. हिंदुस्तान सरकारच्या प्रमुख कामगारांपैकीं त्या वेळीं बोटीवर असलेले कामगार व्हाइसरायचें काम कोणाकडे द्यावयाचें; त्याची तजवीज लावण्यासाठीं एकत्र*

* सर ब्यारो एलिस ( कौन्सिलचे सभासद ) हे ह्या प्रसंगीं अध्यक्ष असून मि. सी. यू. एचिसन, सी. एस्. आय, परराष्ट्रसंबंधीं खात्याचे सेक्रेटरी व इतर कित्येक हजर होते.

जमले. थोड्याच तासांनीं कौन्सिलचे सभासद एका बोटींतून त्वरेनें बंगाल्याकडे निघून गेले; व दुसरींतून परराष्ट्रसंबंधीं खात्याचे सेक्रेटरी यांनीं, ऍक्टिंग गव्हर्नर जनरलचें काम पाहण्यासाठीं मद्रासहून लॉर्ड नेपियर ऑफ् एट्रिक यांस आणण्यासाठीं तिकडचा मार्ग सुधारला. इकडे लॉर्ड मेयो यांचें प्रेत कुजूं नये म्हणून त्यांत मसाला* वगैरे भरण्याचें डाक्टरांचें काम अद्यापि सुरूच होतें.

ग्लास्गो बोट मात्र एकटीच समुद्रांत असून तिजवर सामसूम होतें. त्या रात्रीं ९॥ वाजतां अर्धं मुर्धं मसाला भरून झालेलें त्यांचें शव बोटीच्या वरच्या मजल्याच्या मुख्य डोलकाठीजवळ तात्पुरत्या तयार केलेल्या पेटींत ठेविलें; व इंग्लिश साम्राज्याचें निशाण [ यूनियन जॅक ] त्याजवर पसरलें.

मारेकऱ्याची रीतीप्रमाणें चौकशी होऊन त्याला त्याच्या गुन्ह्याबद्दल योग्य शिक्षा मिळाली. त्यानें ज्यांचा बळी घेतला त्या व्हाइसराय साहेबांना ज्या पडावांतून ग्लास्गो बोटीवर आणिलें, त्याच पडावांतून त्यालाही बोटीवर आणिलें. पुढें लवकरच, हें कृत्य करण्यांत तुझा हेतु काय, असा प्रश्न परराष्ट्रसंबंधीं सेक्रेटरी यांनीं त्याला

---

* इंग्रज लोकांत प्रख्यात पुरुषांचीं प्रेतें ताबडतोब न पुरतां कित्येक दिवस ठेवीत असतात. तीं नासूं नयेत म्हणून त्यांचीं आतडीं काढून घेऊन त्या जागीं सुवासिक मसाले व इतर औषधी द्रव्यें भरितात.

( भा. क. )

केला. त्यानें एवढेंच उत्तर दिलें:—" ईश्वरानें आज्ञा दिली. " ह्या कामांत तुला कोणी मदतगार आहे कीं काय, असा प्रश्न केला; तेव्हां त्यानें उत्तर दिलें:—"माणसांत मला कोणी मदतगार नाहीं; ईश्वर मला मदतगार आहे. " दुसऱ्या दिवशीं सकाळीं तेथील म्याजिस्ट्रेटपुढें रीतीप्रमाणें पहिली तपासणी झाली. तेव्हां तुला गुन्हा कबूल आहे किंवा नाहीं असा सवाल केला असतां तो म्हणाला:—" होय, मीं हें कृत्य केलें. " हें कृत्य प्रत्यक्ष ज्यांनीं पाहिलें होतें, त्यांचा साक्षीपुरावा दाखल करण्यांत आला; व आरोपी-वर खुनाचा चार्ज ठेवून त्याचा खटला चौकशीसाठीं सेशन कोर्टाकडे पाठविण्यांत आला. त्या वसाहतींतील मुख्य न्यायाधीश ह्या नात्यानें तेथील सुपरिंटेंडेंट यांनीं त्याच दिवशीं तिसऱ्या प्रहरीं खटल्याची चौकशी केली. तेव्हां आरोपीनें, " मीं गुन्हा केला नाहीं, " एवढाच जबाब दिला. तथापि खून घडला तेव्हां प्रत्यक्ष पाहिले-ल्या माणसांनीं प्रत्येक गोष्ट शाबीत केली; आणि रक्त-बंबाळ झालेल्या व्हाइसराय साहेबांच्या पाठीवरून आरोपीला ओढून काढल्याचें व तेव्हां त्याच्या हातांत रक्तानें लाल झालेला सुरा असल्याचें शाबीत झालें, तेव्हां आरोपीला फांशीची शिक्षा झाली. खटल्याचे कागदपत्र रीतीप्रमाणें कलकत्ता हायकोर्टाकडे पाहण्यासाठीं पाठवि-ण्यांत आले. ता. २० फेब्रुआरी रोजीं त्या वरिष्ठ कोर्टानें

---

१. खुदानें हुकूम दिया.

२. मेरा शरिक कोई आदमी नहीं; मेरा शरिक खुदा है.

३. हैं, मैने किया.

शिक्षा कायम केली; आणि ता. ११ रोजीं ह्या मारेकऱ्याला व्हायपर बेटांतील नेहमींच्या ठिकाणीं नेऊन फांशीं देण्यांत आलें.

हा मारेकरी हिंदुस्तानच्या वायव्य सरहद्दीपलीकडच्या पहाडांत राहणारा असून त्यानें पंजाबच्या पोलीस खात्यांत नौकरी धरलेली होती; व त्यानें आपल्या पिढीजाद हाडवैऱ्याचा ब्रिटिश मुलखांत खून केल्याचा गुन्हा त्याजवर शाबीत झाला होता. तथापि न्यायाधीशानें त्याच्या गुन्ह्याचा मेहेरनजरेनें विचार करून त्याला अंदमान बेटांत जन्मठेपेची सजा दिली. पुढें कित्येक वर्षांनीं फांशीं जातांना त्यानें कबूल जबाब दिला. त्यांत सांगितलें कीं, प्रत्यक्ष वार जरी आपण केला नव्हता, तरी खुनाच्या मसलतींत आपण होतों. तथापि आपल्या पिढीजाद वैऱ्याचा आपण देहभानावर असतां अशा प्रकारें खून करणें, हा कांहीं त्याच्या दृष्टीनें गुन्हा नव्हता; व १८६९ त त्याला शिक्षा झाली तेव्हांपासूनच तो नेहमीं म्हणत असे कीं, " एकाद्या बड्या युरोपियनाला ठार करून ह्याजबद्दल सूड उगविण्याचा आपल्या मनाचा संकल्प ठरला आहे. " म्हणून काळ्या पाण्यावर असतां त्यानें मुद्दाम अशा प्रकारचें वर्तन ठेविलें कीं, हा शांतपणानें व कसाही प्रसंग आला तरी उत्तम रीतीनें वागणारा माणूस आहे, अशी अधिकाऱ्यांची समजूत झाली. म्हणून योग्य मुदतीनंतर चांगल्या वर्तनाच्या कैद्यांस तिकिटें देऊन होपटौन एथें मोकळें सोडितात; त्याप्रमाणें ह्यालाही न्हाव्याचा धंदा करण्यासाठीं सोडून देण्यांत आलें.

हीं तीन वर्षें तो उदासवृत्तीनें चांगलीशी शिकार साधण्याची वाट पाहात होता. ता. ८ फेब्रुआरी रोजीं सकाळीं व्हाइसराय यांच्या सन्मानार्थ सुटलेल्या तोफा त्याच्या कानीं पडल्या. तेव्हां आपली संधी आतां साधणार असें त्याला वाटलें; व त्यानें एक सुरा पाजळला. त्यानें सुपरिंटेंडेंट व व्हाइसराय ह्या दोघांसही ठार करण्याचा निश्चय केला. तथापि लॉर्ड मेयो यांनीं दिवसभर बेटांची पाहणी केली; तेव्हां कडक पाहरा असल्यामुळें त्या बेटांस जाण्याची संधी त्याला मिळाली नाहीं. तथापि संध्याकाळ झाली तेव्हां ध्यानीं मनीं नसतां त्याची शिकार आयतीच त्याच्या तावडींत सांपडली. तेव्हां तो जंगलांत घुसला; व व्हाइसराय चालले त्याच घोरणानें मौंट हारियट टेंकडीवर जंगलांतून तो चोरून गेला. नंतर मंडळी परत फिरल्यावरही काळोखांत त्यानें पाठलाग केला. परंतु त्याला अद्यापपर्यंत संधी मुळींच मिळाली नाहीं. पायथ्याशीं आल्यावर तो बहुतेक निराशच झाला; व दुसऱ्या दिवशीं सकाळीं संधी साधण्याचा त्यानें निश्चय केला. तथापि व्हाइसराय हे धक्क्यावरून चटकन पुढें सरले; तेव्हां त्यांच्या खांद्यावर करड्या रंगाचा कोट असून ते मशाली-च्या उजेडांत स्पष्टपणें दिसत होते. तत्क्षणीं मारेकऱ्याच्या अंतःकरणांत आतांपर्यंतच्या निराशेमुळें एकदम चेव भरला. त्यानें जिवाची सर्व आशा सोडिली; पहारेकऱ्यांना गिरकी देऊन तो पुढें घुसला; व क्षणांत व्हाइसरायांच्या पाठीवर चढला.

हा डोंगरी माणूस असून मोठा धिप्पाड व शक्तिमान्ही

होता. शिक्षा झाल्यानंतर ह्याला जड बिड्या घालून तुरुंगांतील कोठडींत ठेविलें. तेव्हां पायांत बिडी असतांही घोट्यानें त्यानें दिवा पालथा करून दिला; इंग्लिश पहारे-कऱ्याला केवळ आंगबळाच्या जोरावर पाडून दिलें; व हातांत बिडी असतांही त्याची संगीन त्यानें मुरगाळून घेतली. आपल्या कृत्याबद्दल पश्चात्ताप झाल्याचें त्यानें मुळींच दर्शविलें नाहीं; व व्हाइसराय साहेबांचा खून आपण केल्यामुळें आपला फोटो काढून घेतल्याबद्दल त्याला पोरकटपणाचा अभिमान वाटत होता. ( उत्तर हिंदुस्तानांत पोलीसला तपास करितां यावा म्हणून हा फोटो घेतला होता. ) वास्तविक पाहिलें असतां वरच्यांपैकीं कित्येक गोष्टींची माहिती एका नेटिव्ह कामगारानेंच त्याच्याजवळून काढून घेतली. आपल्या देशांतील लोकांना तुझ्या कृत्याचा पोवाडा गातां यावा, म्हणून तो तयार करण्यासाठीं कांहीं माहिती पाहिजे; असा कावा त्या कामगारानें लढविला. ह्या मारेकऱ्याच्या नांवाचा, तसेंच त्याच्या गांवाचा किंवा जातीचा उल्लेख ह्या पुस्तकांत व्हावयाचा नाहीं.

ह्या प्रसंगीं सर्व हिंदुस्तान संतप्त होऊन दुःखाचा व क्रोधाचा एथें मोठा कहर उसळला; खून झालेल्या ह्या व्हाइसरायांना पुनः राजधानीच्या शहरांत त्या प्रसंगाला साजेशा लष्करी थाटानें नेण्यांत आलें; तेथें त्यांचें शव सरकारी इतमामानें खोलींत ठेविलें असतां लोकांस वर-चेवर रडयाचे हुंदके आले; पुढें एर्लंडला त्यांचें शव नेत असतां तेथपर्यंतचा जलप्रवास झाला; व अखेर त्या

भूमातेनें आपल्या मृतपुत्राचें गंभीरपणानें स्वागत केलें. हे सर्व प्रकार त्या वेळेला साजण्यासारखेच होते; व ते होऊनही गेले.

डब्लिन एथील एका वर्तमानपत्रकारांनीं तेव्हां लिहिलें आहेः—" काल आम्हीं एक सरकारी प्रेतविधि पाहिला. वस्तुतः त्या व्यक्तीच्या मृत्यूनें सर्व ऐर्लंडाला कळवळा उत्पन्न झाल्यामुळें त्या समारंभाला विशेषच स्वरूप आलें होतें. कारण एकंदर प्रजाजनांची कळकळ विशेष मार्मिकपणाची असते. ऐर्लंडांत सरकारी नौकराच्या प्रेतविधीसंबंधानें सरकार व प्रजा यांचें मतैक्य क्वचितच आढळतें. एकाद्या प्रेतविधीला सरकारी भपका विशेष असल्यास तेव्हां प्रजाजन* उदासीन असतात. परंतु त्याच्या संबंधानें प्रजाजनांकडून मनःपूर्वक पूज्यबुद्धि प्रदर्शित करण्यांत आल्यास सरकारी डगलेवाली मंडळी तेथें हजर नसावयाची, व त्यांचीं तोंडें तेव्हां बंद व्हावयाचीं. हा अशुभ नियम काल तरी मोडला गेला. सरकार व प्रजा ह्या उभयतांनींही एका प्रख्यात ऐरिश गृहस्थासंबंधानें काल एकमतानें पूज्यबुद्धि प्रदर्शित केली." हिंदुस्तानांतील अनेक जातींच्या लोकांना झालेल्या अनावर दुःखाचा उल्लेख भिन्न भिन्न भाषांतून इकडील वर्तमानपत्रांतून झाला; इंग्लंडांतील पत्रें त्यांच्यासंबंधीं उदात्त प्रकारच्या

*" **नरपतिहितकर्त्ता द्वेष्यतां याति लोके । जनपदहितकर्त्ता त्यज्यते पार्थिवेन ॥** " अशा प्रकारची स्थिति असतांही दोन्ही तंत्रें संभाळून लोकहित करणारे मुत्सद्दी खरोखर धन्य होत. ( भा. क. )

लेखांनीं भरून गेलीं; व त्यांच्या मृत्यूमुळें झालेल्या राष्ट्र-हानीविषयीं पार्लमेंटांतील पुढाऱ्यांनीं योग्य प्रकारचा उल्लेख त्या सभेंत केला. तथापि त्या समुद्रवेष्टित-टेंकडीच्या शिखरावर बसून पश्चिम दिशेस सूर्यास्त होत असतां त्या पलीकडच्या आपल्या प्रिय जन्मभूमीकडे लॉर्ड मेयो यांनीं नजर लाविली होती. तशा स्थितींत, आपल्या देशबांधवांनीं एक विचारें प्रदर्शित केलेल्या ह्या शोकाची किंमत इतर हरएक स्तुतिलेखापेक्षां त्यांना जास्त वाटली असती. त्यांनीं आपल्याच शेतजमिनीवरील पसंत करून ठेविलेल्या एकान्त ठिकाणच्या श्मशानभूमींत अखेरीस त्यांना पुरिलें.

समाप्त.